# प्रस्तावना

मधुकर आणी जीवन-दृष्टी प्रमाणे माझी काही भाषणां च्या आणी लेखां च्या संग्रह करणारें हें नवीन पुस्तक ग्राम-सेवा-मंडळ प्रकाशीत करीत आहे। या त काही नेहमी चा अुपयोगा च्या वीषय आहे। ता बरोबर काही केवळ आज़ चा गरजे च्या ही वीषय आहे। स्थायी आणी तात्कालीक साहीत्या ची मीसळ न झालेली बरी असा ही अेक वीचार आहे। पण अमीर्‍ांअन्ना त ज़से काही गुण असतात, तसें खीचडी त ही काही गुण असतात। नीत्य नैमीत्तीक दोन्ही मीळून वीचार अधीक सुगम आणी हृदयंगम होतो। म्हणून अशी मीसळ मान्य करण्या स हरकत नाही। पण या त दोन-चार लेख असे ही आहेत की ज़े स्वराज्य-पूर्व काळा शी संबद्ध आहेत, ते घेतले नसते तरी चाललें असतें। पण घेतले च आहेत तर तां च्या ही बचाव होअू शकतो। अेक तर ते थोडे च आहेत, आणी शीवाय ता त ही वीचारा च्या असा काही भाग आहे की ज़ो केवळ अैतीहासीक महत्त्वा च्या च नव्हे तर नीत्या चा अुपयोगा च्या ही आहे।

लेखन-भाषणादी जेवढें टाळू शकत नाही तेवढें च मी करतो । आणी तें ही मागाहून वारकाओी ने पाहून जाणा ची फुरसत मला नेहमी मीळत नाही । पण अुद्योगमय आणी प्रयोगमय जीवना तून सहज सुचलेले हे वीचार 'असला मुळे ता त अगांठनीय काही असणार नाही, अशी मला खात्री आहे । वाचकां नी दरेक वीषय मनन-पूर्वक वाचावा आणी तां ना ता त काही कुठे वीचारावें सें वाटलें तर सरळ मज कडे पृच्छा करावी ।

सेवाग्राम )

वीनोबा

# अनुक्रमणिका


| | | पृष्ठ |
|---|---|---|
| | प्रस्तावना | |
| १ | कोर्टासमोरील निवेदन ... ... | १ |
| २ | सरकारच्या आह्वानास उत्तर ... | ३ |
| ३ | आजच्या जगांत समत्व हा च रस्ता आहे ... | १३ |
| ४ | युद्धाचें रोणपे लक्षण ... ... | १८ |
| ५ | अहिंसेचा सिद्धांत आणि व्यवहार ... | २९ |
| ६ | नकली तूप ... ... | ३९ |
| ७ | वाणीचा सदुपयोग ... ... | ४२ |
| ८ | व्यवस्थापकांनो कृपा करून चालते व्हा ... | ४४ |
| ९ | विधायक क्रांति-दर्शन ... ... | ५३ |
| १० | सोन्याची खाण ... ... | ५९ |
| ११ | विसरलेलें सेवा-क्षेत्र ... ... | ६२ |
| १२ | देवळें मोकळीं करा ... ... | ६४ |
| १३ | पैदास पाहिजे, पैसा नको ... ... | ६६ |
| १४ | धान्य-धारणा ... ... | ६९ |
| १५ | नई तालीम ... ... | ७३ |
| १६ | जीवन हें च शिक्षण ... ... | ७५ |
| १७ | रचनात्मक कार्यक्रम प्रेमाचा कार्यक्रम आहे ... | ७९ |
| १८ | हिंसेतून अहिंसेकडे ... ... | ८६ |
| १९ | ग्राम सेवकांना सूचना ... ... | ९१ |
| २० | लोकमान्यांच्या चरणीं श्रद्धांजलि ... | ९५ |
| २१ | सत्ता आणि सेवा ... ... | १०६ |
| २२ | शिक्षणाचें सूत्र ... ... | १०९ |
| २३ | क्रांति करायची तर अजून बाकी आहे ... | ११२ |
| २४ | स्त्री-पुरुष अभेद ... ... | ११६ |
| २५ | आत्म-निष्ठ व्हा ... ... | १२१ |
| २६ | आशंका-निरसन ... ... | १२३ |

२७ मुलामुलींचें शिक्षण ... ... १२७
२८ देवस्थान-सुधारणा ... ... १२८
२९ सत्य हें च ब्राह्मणपण ... ... १३०
३० जीवनाचा उलगडा ... ... १३२
३१ एकराचें कोष्टक ... ... १३५
३२ स्वाध्यायाची आवश्यकता ... ... १३९
३३ ज्ञानदेवाचा गीतार्थ ... ... १४३
३४ शाळेंतील धर्म-शिक्षण ... ... १४७
३५ आमची मूर्तिपूजा ... ... १४९
३६ निष्ठेची उणीव ... ... १५२
३७ सर्वधर्म-समभाव ... ... १५५
३८ गरिबांशीं तन्मयता ... ... १५७

३९ प्रासंगिकें १६१

१ मृत्यूची देणगी ... ... १६१
२ गीता आणि लोकशाही ... ... १६३
३ प्रेमाचा आधार ... ... १६४
४ निसर्ग-सेवनाची दृष्टि ... ... १६५
५ सत्य आणि सौंदर्य ... ... १६७
६ नदी ईश्वराची वाहती करुणा ... ... १६९
७ निर्भयतेचे तीन प्रकार ... ... १७०
८ स्वातंत्र्याचा गुलाम ... ... १७२
९ मुहूर्तं ज्वलितं श्रेयः ... ... १७३
१० वृत्त लिहा ... ... १७५

# क्रांत दर्शन

## : १ :

### कोर्टासमोरील निवेदन*

मागच्या खेपेला ह्या कोर्टासमोर उभा राहण्याचा मान आणि आनंद मला लाभला त्यावेळीं काँग्रेसनें माझ्यावर सोंपविलेल्या कामगिरीला मी काहींसा नवखा होतों परंतु जेलमधील सुमारें तीन महिन्यांच्या एकांत चिंतनानंतर त्यावेळीं टाकलेलें पाऊल बिनचूक होतें याबद्दल मी विशेष च निःशंक झालों आहें

काहीं म्हटलें तरी कॉंग्रेसची प्रवृत्ति जगातील आजच्या ह्या अदृष्टपूर्व मारामारीच्या काळात निःसंशय शांतीची प्रवृत्ति आहे सगळे कांग्रेसवादी एका च हेतूनें प्रवृत्त झालेले नाहीत, असें सुचविण्यात येतें परंतु कॉंग्रेसच्या भूमिकेच्या समर्थनार्थं ह्या आक्षेपाचा प्रतिवाद करण्याची गरज नाहीं एक्याचं स्वरूप सत्याग्रह करणाराच्या कृतीवरून ठरेल, व्यक्तीच्या हेतुभेदावरून ठरणार नाहीं मला हें म्हणायचें आहे कीं कॉंग्रेसनें दाखविलेल्या मार्गाचा संपूर्ण हिंदुस्थाननें जर अवलंब केला तर ह्या कलहाचा आपोआप च शेवट येणार आहे आणि मग ब्रिटिश साम्राज्य वादाला जर अवकाश राहणार नाहीं तर नाझीवाद किंवा फाशीवाद तर नामशेष च होईल कारण जगातील जवळ जवळ एकपंचमांश मानव-समाजानें आचरिलेल्या जिवंत अहिंसेचा महिमा त्यावेळीं श्रद्धाहीन जगाला कळून चुकला असेल

पण कॉंग्रेसवादी हें जाणतात कीं युद्धाची प्रगति अटकविणारा असला चमत्कार घडून येण्याचा सहसा संभव नाहीं पण संबंध हिंदुस्थानचें मत-परिवर्तन होऊं शकणार नाहीं ह्यास्तव कॉंग्रेस आपलें पवित्र कार्य सोडू

* व्यक्तिगत सत्याग्रहात दुसऱ्यांदा शिक्षा झाली, त्यावेळीं कोर्टांत दिलेलें स्टेटमेंट

शकत नाहीं. कॉंग्रेसला आपल्या ध्येयाविषयी निष्ठा असल्यामुळे ती निष्ठा सविनय कायदेभंगाच्या मार्गानें हिंदुस्थानला आणि जगाला जाहीर करण्याची ही च खरी वेळ आहे. ह्या ध्येयाचा माग घेण्यांत च हिंदुस्थानचें म्हणजे च हिंदुस्थानच्या आम जनतेचें स्वराज्य सांपडणारें आहे. आणि हिंदुस्थानच्या मुक्तींत पृथ्वीवरील अन्य शोषित जातींची त्याच प्रमाणे नाझींच्या फाशींच्या विळख्यांत गुरफटत चाललेल्या छोट्या-छोट्या युरोपियन राष्ट्रांची सुटका अंतर्भूत आहे.

म्हणून कॉंग्रेसच्या आजच्या प्रतिकाराने झोटिंग राष्ट्रांना मदत होते असें म्हणणें म्हणजे कॉंग्रेसची बदनामी करणें आहे. ब्रिटिश-साम्राज्यवादाचा जर कॉंग्रेस आज प्रतिकार करीत आहे तर झोटिंगशाहीचा तर ती अधिक च तीव्र प्रतिकार करीत आहे. परंतु कॉंग्रेसचा प्रतिकार पूर्णपणें अहिंसात्मक आहे आणि म्हणून तो निरुपद्रवी आहे. निरुपद्रवी अशा अर्थानें की एका हि मानव व्यक्तीचें ती अहित इच्छीत नाही.

म्हणून जोपर्यंत ब्रिटिश सरकारला ह्या सोन्यासारख्या पण साध्या सत्याचें दर्शन होत नाहीं, उलट त्याच्या प्रचाराला सरकार गुन्हा समजतें, तोपर्यंत माझ्यासारख्या कॉंग्रेसवाल्यांनीं ह्या मानव-कल्पित गुन्हा केल्याबद्दलची शिक्षा आनंदानें स्वीकारली पाहिजे. कारण ह्या गुन्हा करणें आम्ही एक सामाजिक व राजकीय पुण्य कार्य समजतों.

सब-जेल, वर्धा
२३-१-४१

ग्रामसेवा-वृत्त
१५ फेब्रुवारी १९४१

: २ :

## सरकारच्या आह्वानास उत्तर*

जेव्हां जेव्हां मी जनसमूहापुढें बोलायला उभा राहतों तेव्हां तेव्हां माझ्या हृदयामध्यें नेहमीं अत्यंत उत्साह भरून येतो. तुम्हां बंधुभगिनींच्या दर्शनामध्यें एक प्रकारची पावनता नेहमीं अनुभवाला येते. परंतु हें कबूल केलें पाहिजे कीं आजच्या प्रसंगीं तुमच्या समोर बोलतांना नेहमींचा उत्साह किंवा आनंद अनुभूत होत नाहीं. याचें कारण असें कीं ज्या रीतीनें आमची सुटका झाली व तुमच्याशीं बोलण्याचा प्रसंग लाभला, त्यांत उत्साह उत्पन्न होण्याला साधन नाहीं, उलट उदासीनतेला कारण आहे. आपले बंधु तुरुंगांतून सुटून येत आहेत, आपल्याला पुन्हां भेटतील, अशा कल्पनेनें तुमच्यापैकीं कित्येकांना आनंद झाला असेल. परंतु परिस्थिति विपरीत असली तर भेटण्याचा आनंद देखील विरघळून जातो. थोडा विचार केला असतां तुमच्या लक्षांत येईल कीं आजची ही भेट आनंदाचा विषय नाहीं.

सरकारनें सत्याग्रही कैद्यांना सोडलें याच्या मुळाशीं जर त्याची सद्भावना प्रगट झाली असती तर वेगळी गोष्ट होती. पण आजपर्यंत ॲमरी साहेबांचीं जीं प्रवचनें ऐकलीं तीं लक्षांत घेतलीं असतां वेगळेंच दृश्य दृष्टीस पडतें.

आम्ही आपण होऊन जेलमध्यें गेलों. आमच्यापुढें भाषण-स्वातंत्र्याचा फार महत्त्वाचा मुद्दा होता. त्या मुद्दयाचा निर्णय लागला नाहीं तोंपर्यंत बाहेर राहणें हें निपापासारखें आहे. परंतु सरकारनें एक जाळें पसरून ठेवलें आहे. आम्हाला सोडण्यांत त्याची अशी कल्पना व इच्छा दिसते कीं आम्ही, जीं माणसें भाषण स्वातंत्र्याच्या लढ्यांत सत्याग्रह करून तुरुंगांत गेलों तीं, बाहेर आल्यावर लोपून जाऊं व सरकारचें काम आपोआप होऊन जाईल. असें

* व्यक्तिगत सत्याग्रहांतील शेवटल्या (तिसऱ्या) अटकेंतून सुटल्यानंतर वर्धा येथें ता० ७-१२-४१ ला गांधी चौकात दिलेलें भाषण ]

मोठें चातुर्याचें काम सरकारनें केलें आहे. म्हणून आम्हांला आमचा लढा बंद करणें शक्य नाहीं. उलट सरकारच्या जाळ्यांत न अडकतां तो पूर्वीपेक्षां अधिक तीव्रतेने चालविला पाहिजे. अहिंसेचे उपासक या नात्यानें जगांत चाललेल्या हिंसेचा विरोध करण्याचा आमचा हा मूलभूत हक्क व कर्तव्य जोंपर्यंत सिद्ध होत नाहीं, म्हणजे जनतेपुढे आपले विचार अहिंसक रीतीनें व्यक्त करण्याची मोकळीक जोपर्यंत आम्हांला मिळत नाहीं, तोंपर्यंत हा लढा लढवीत राहणें आपलें कर्तव्य आहे. म्हणजे पूर्वीपेक्षां अधिक निकरानें लढावयास पाहिजे असा अर्थ निघतो. पण अधिक निकरानें लढवीत राहणें म्हणजे काय ?

हिंसेच्या व अहिंसेच्या युद्धांच्या परिभाषेंत भेद आहे. हिंसेच्या लढाईत आपण काय करतो ? तर दुसऱ्याच्या औजारांसमोर आमचीं औजारें जेव्हां असमर्थ ठरतात तेव्हां आपण पूर्वीच्या औजारांपेक्षां ज्यास्त भयानक औजारें शोधून काढतों आणि त्यांचा प्रयोग करतों. ही प्रक्रिया युरोपच्या लढाईत आज प्रत्यक्ष चालू आहे. चर्चिल म्हणतो, ' ह्या वर्षीपेक्षां पुढल्या वर्षीं मनाई दिढीनें हत्यारें, रणगाडे वगैरे तयार करूं. हिटलरच्या रणगाड्यांपेक्षां अधिक हिंसक व ज्यास्त संख्येंत रणगाडे तयार करूं म्हणजे आमचा जय होईल. ' ह्याप्रमाणें दोन्ही पक्ष एकमेकांपेक्षां अधिक हिंसक शस्त्रें तयार करण्यांत गुंतले आहेत.

अहिंसक युद्धाची रीत वेगळी आहे. आम्हांला सोडून देऊन जणूं काय इंग्रज सरकार आम्हांला म्हणतें, " अरे हिंदुस्थानांतील सुटलेल्या गुलामा, जर तुला स्वातंत्र्य हवें असेल तर अधिक निकरानें लढ." पण अहिंसेच्या पद्धतीनें याला कसें उत्तर द्यावयाचें ? अहिंसक लढा अधिक निकरानें चालविण्याची तऱ्हा हिंसेच्या पद्धतीहून वेगळी पडते. हिंसक युद्धांत साधनांची हिंसकता वाढवायची असते व अहिंसक युद्धांत साधनांची शुद्धता वाढवायची असते. आपल्याला आपल्या साधनांची शुद्धता वाढवून अधिक आत्मशुद्धि करण्याची संधि मिळाली आहे. आमच्या सुटकेच्या वाट्टांतून या चांगल्याचा लाभ झाला आहे. ईश्वराच्या कृपेनें इंग्रज-सरकारला आम्हांला तुरुंगांत टाकण्याची प्रेरणा झाली आम्हीं शुद्ध समजून ज्या साधनांचा स्वीकार केला त्यांतील अशुद्धि-निरीक्षण व आत्म-परीक्षण

करण्याची संधि जेलमध्यें मिळते पण मला दु:खानें कबूल केले पाहिजे की जेलमध्यें हवी तितकी मर्यादा व संयमशीलता आमच्यापैकी पुष्कळ लोक पाळू शकले नाहींत. कदाचित् म्हणून च ईश्वरानें आपलीं औजारें अधिक शुद्ध कशीं करावीं याचा विचार करण्याची ही संधि आम्हाला दिली असावी जेलमध्यें सूट मिळाली किंवा सवलती देण्यात आल्या तरी आमचा संयम विवेक व तपश्चर्या यांचा सरकार अधिकारीवर्ग आणि इतर हाच्यावर अनुकूल परिणाम झाला पाहिजे पण आम्ही तर जेलमध्यें जे मिळतील ते सर्व भोग घेतले अशा स्थितींत हा लढा निकरानें चालवायचा असेल तर आम्हाला अधिक शुद्ध कसोटीला उतरून सत्याग्रह करीत राहिलें पाहिजे तर च आमच्या भावी सत्याग्रहांत ज्यास्त शक्ति येईल. आम्ही जर पुढील लढा अधिक शुद्ध मनानें अधिक शुद्ध जनानें आणि अधिक शुद्ध योजनेनें चालविला तर तो नि:संशय यशस्वी होईल

एक प्रश्न असा विचारण्यांत येतो, की सरकारनें आम्हाला सोडून दिलें ही सद्भावनेची खूण नव्हे काय ? सरकारची सद्भावना जाणून आपण आपल्या कार्यक्रमात बदल का करूं नये ? अशा वेळीं मला रविबाबूंच्या

युद्ध सुरू केले तो मुद्दा सोडून देण्यासारखा नाही। पुष्कळम हक्क असे असतात की ते न वापरले तरी चालतात. पण हा हक्क न वापरून चालणार नाही। आपण स्वातंत्र्य हा फक्त आमचा हक्क नसून धर्म हि आहे धर्माचे पालन नेहमी केलें पाहिजे आम्हाला आज जी थोडी-फार शक्ति लाभली आहे ती गेल्या वीस वर्षांच्या अहिंसेच्या महान् साधनेंतून मिळाली आहे आपल्यापैकी जे माझ्या पेक्षा मोठे किंवा माझ्या वयाचे असतील त्याना माहीत आहे की गेल्या २० /२५ वर्षांपूर्वी हिंदुस्थानचा काय स्थिति होती ? त्यावेळी आम्हाला "वंदे मातरम्" म्हणण्याची भीति वाटत होती 'स्वराज्य पाहिजे' म्हणणें भयानक होतें शरीर कमाविण्याकरिता आखाड काढले तर ते हि भयानक समजले जात असत वीस पचवीस वर्षांपूर्वी आमची अशी हीन दीन दशा होती का होऊ नये ? दोनशे वर्षांपासून आम्ही नि शस्त्र व परतंत्र होतों बुद्धि शक्ति आणि लक्ष्मी उरलेली नव्हती अशा स्थितींत आम्ही समर्थ कसे झालों ? एवढ्या मोठ्या सरकारचा विरोध करणारी कॉंग्रेस-सारखी सस्था कशी उत्पन्न झाली ? ती कशाच्या जोरावर आज पन्नास वर्षे भाडत आहे ? हा कोणत्या शक्तिचा प्रताप आहे ?

परवा एक जर्मन वक्ता बोलला तो मोठ्या अभिमानानें सांगत होता कीं आता सगळें युरोप नि शस्त्र झालें आहे. आम्ही रणगाड्या-च्या जोरावर आता शांततेचा प्रचार करू शकू रिबेनट्रॉपला असा विश्वास वाटू लागला याचे कारण असें कीं त्याला वाटतें कीं आपल्या रणगाड्यापुढें नि शस्त्र प्रजेचें काय चालणार ? तिनें हूं का चूं केलें तर आपण दडपून टाकू ! इंग्रजाची हि हीच श्रद्धा होती. त्याना वाटत होतें कीं आपण हिंदुस्थानला नि शस्त्र बनविलेंच आहे आता तो आमच्या ताब्यात राहील. आम्ही आपल्या शस्त्रास्त्रांच्या जोरावर नि शस्त्र हिंदुस्थानात सहज शांततेचा प्रचार करू शकू पण अशा वाईट स्थितीत असलेल्या देशात हि कॉंग्रेससारखी सस्था उत्पन्न होऊन वीस पचवीस वर्षे सरकारला यशस्वी रीतीनें सामना देऊ शकते हा अहिंसेचा च चमत्कार आहे अहिंसेंत माणसे एकत्र करण्याची फार मोठी शक्ति आहे हें सघशक्तीचें युग आहे पूर्वी एक दोन व्यक्तींच्या बळानें भागत असे पण या युगात प्रचंड संघटनेशिवाय सत्ता मिळ्

शकत नाहीं युरोपमध्यें हिंसेच्या पायावर संघटन होतें तरी तेथें देखील राष्ट्रव्यापी संघटन करावें लागतें तेव्हा च सामना देता येतो रशियाकडे पहा त्यानें एक कोटि सैन्य उभारलें आहे ही काहीं लहान-सहान गोष्ट नाहीं तरी त्याचे पाय डळमळू लागले आहेत हिंसेंत समोरच्या माणसाच्या संघटनेपेक्षा अधिक प्रचंड संघटना करावी लागते किरकोळ हिंसक संघटना व्यर्थ आहे एकतर अत्यंत व्यापक आणि तीव्र स्वरूपाची संघटना केला पाहिजे किंवा मुळींच करूं नये तिसरा मार्ग नाहीं दोन चार खून करून गुप्त संघटना केल्यानें जय मिळणार नाहीं राष्ट्रांतील सर्वं लोकांनी त्या च कामाला लागलें पाहिजे इंग्लंडकडे पहा तेथें स्त्रिया देखील सैन्यांत जात आहेत १८॥ वर्षांवरील वयाच्या सर्व स्त्रियांना, ज्यांना मुलें नसतील अशांना, जबरी करण्यात येत आहे सोळा ते साडे सतरा वर्षांच्या तरुण तरुणींना हि उत्तेजन प्रेरणा आणि प्रोत्साहन देण्यात येत आहे इतकी भयानक संघटना केला तर च जय मिळण्याची आशा बाळगता येते हा एक मार्ग आहे इतकी भयानकता करण्याची तयारी नसेल तर गुलाम बनून दुसऱ्या समोर खुशाल डोकें टेकावें युरोपात हे दोन च मार्ग आज आढळतात

परंतु गांधींनी आमची संस्कृति आणि परिस्थिति लक्षात घेऊन आम्हाला एक नवें शस्त्र दिलें आहे ते म्हणजे अहिंसा यात जागृतीची आणि संघटनेची केवढी विलक्षण शक्ति आहे हें आमच्यासारख्या निःशस्त्र व पराधीन देशाच्या आजच्या निर्भयतेनें सिद्ध होत आहे ही शक्ति चोरट्या मारट्या हिंसेंत नाहीं एवढ्या साठी अहिंसेची शक्ति गमावून बसायचें काय ? ती गमावून इंग्रजांना शरण जायचें काय ? आम्ही एवढें मोठें शस्त्र मुळीं च सोडणार नाहीं तें जास्त तेजस्वी बनविल्याशिवाय आम्ही चुपचाप कसे बसूं ? जगात एवढ्या मोठ्या प्रमाणावर हिंसा होत असताना, जग उद्ध्वस्त होत असताना, आणि आमचा देश हि बळजबरीनें त्यात खेचला गेला असताना, आम्ही गप्प कसे बसूं ? या लढाईंत सामील होऊं नका असें लोकांना सांगितल्यावाचून कसे राहूं ? यावेळीं आम्ही गप्प बसलों तर खचा होऊन जाऊं, नेहमींकरता गुलाम बनूं म्हणून म्हणतो, भाषण-स्वातंत्र्य हा मामूली हक्क नाहीं, तें महान् कर्तव्य आहे ते पार पाडण्याचा हक्क जोपर्यंत

मि[illegible] नाहीं। तोपर्यंत फक्त सुटकेच्या जाळ्यातून आम्ही आपला ग्हा बद कसे करू ? हा शुद्ध, म्हणजे आत्मिक, अहिंसेच्या दृष्टीनें विचार झाला

दुसरी हि एक दृष्टि आहे काहीं लोक म्हणतात, आम्हाला हिंसाहिं ची चाड नाहीं। आम्ही साम्राज्यवादी युद्धाला मदत करू इच्छीत नाहीं जोपर्यंत फक्त इंग्लंडापुरता च प्रश्न होता तोपर्यंत त्याना मदत न करणे योग्य होते पण आता रशिया युद्धात सामील झाल्यामुळे युद्धाचे स्वरूप च पालटलें आहे रशिया साम्राज्यवादी राष्ट्र नाहीं, समाजवादी राष्ट्र आहे तेव्हा चालूयुद्ध साम्राज्यशाहीकरिता च आहे ? असें कसें म्हणता येईल त्यामुळें इंग्लंडच्या युद्धाला मदत करू नये असे म्हणणारानीं आता चूप का बसू नये ?" येथे एक प्रश्न उभा राहतो इंग्लंड व रशिया याच्या मैत्राचा काय अर्थ होतो ? रशियाशीं दोस्ती करून पुन्हा इंग्लंडने आपला साम्राज्यवाद सोडला असावा किंवा रशियानें तरी नमतें घेतलं असलें पाहिजे आतापर्यंत ज्या घडामोडी झाल्या त्यावरून असे दिसून येतें की रशियाचें ध्येय पालटलें च होतें आजच्या घटकेला तें पालावत चालारत चालले आहे याची थोंडें रशियन क्रांतींत च हें ती रशियन क्रांतीत हिंसक शक्ति होती च ती आता वाढत आहे हिंसक शक्तीचा निरोध करणे हें कॉंग्रेसचें ब्रीद आहे तरी पण साम्राज्यवादाच्या मुद्द्यावर जो विरोध होता तो कायम च राहतो कारण कीं इंग्लंडच्या साम्राज्यवादी मनोवृत्तींत कोणता च फरक झालेला नाहीं तसा बदल झाला असता तर त्याचा प्रकाश येथें पडला नसता काय? इंग्लंडच्या वृत्तींत कोणताहि फरक झालेला नसून त्या साम्राज्यवादी राष्ट्राशीं रशियानें मैत्री केली आहे म्हणून त्या हि मुद्द्यावर आम्हाला सत्याग्रह चालू ठेवला पाहिजे

पुन्हा काही लोक असे हि म्हणतात की पार्लमेंटरी कार्यक्रम (दरबारी राजकारणाचा कार्यक्रम) पुन्हा सुरु करण्यास हरकत काय आहे ? या कौन्सिलाचा मोह राष्ट्राच्या हातात खरीखुरी सत्ता असली म्हणजे योग्य आहे आज ती सत्ता कुठें आहे ? आज पार्लमेंटरी कार्यक्रम पुन्हा सुरू करावयाचा म्हणजे इंग्रज सरकारच्या जाळ्यात सापडायचें असा

हि त्याचा अर्थ आहे. असेंब्लीमध्यें जाऊन सरसेनापतीचें पुराण चुपचाप ऐकायचें आणि तो सांगेल त्याला संमति द्यायची! ज्याप्रमाणें आपल्या यज्ञयागादिक धार्मिक विधींत पति संकल्प सोडतो आणि पत्नी त्याच्या हाताला हात लावते, तसा हा प्रकार होईल. म्हणजे हिंदुस्थाननें खुशीनें आपलें जनधन इंग्रजसरकारला अर्पण करावयाचें. सरकारच्या दरबारांत जाऊन वेव्हल साहेबांचीं प्रवचनें ऐकून हिंसक कार्यांत सरकारला मदत करावयाची. मग अहिंसेनें स्वराज्य मिळविण्याचें जें कांग्रेसचें ब्रीद आहे त्याचें काय करावयाचें? त्यावरील विश्वास उडाला असला तर तें बदलून घेतलें पाहिजे. पण गांधीजी व माझ्या सारख्या असंख्य लोकांना हिंसेनें स्वराज्य मिळेल ही गोष्ट पटत नाहीं. म्हणजे पार्लमेंटरी प्रोग्राम ( दरबारी राजकारण ) पटत नाहीं.

आम्हांला एक च मार्ग पटतो तो अहिंसेचा. म्हणून ह्या युद्धाला जितका होईल तितका विरोध करणें आपलें कर्तव्य आहे. अर्थात च आम्हांला पूर्वीपेक्षां अधिक शुद्ध साधनें वापरावीं लागतील. जेलमध्यें जाणारांची संयमशीलता, कर्तव्यनिष्ठा व भक्ति वाढली पाहिजे. त्यांच्या वागणुकीचा इतरांवर चांगला परिणाम झाला पाहिजे. इतक्या दक्षतेनें व काळजीपूर्वक आम्हांला पुढें पाऊल टाकलें पाहिजे. पण जेलमध्यें जाणाऱ्यांत युद्धाच्या प्रतिकाराची शक्ति कोठून येईल? तुमचें सहकार्य व पाठिंबा आम्हांला आहे, तुमच्यातर्फे आम्ही तेथें जातों, तुमचे प्रतिनिधि म्हणून जातों, असें असेल तेव्हां च आमच्या विरोधांत शक्ति येईल. आमच्यांत व तुमच्यांत एकसूत्रता पाहिजे. आमच्या विचारांच्या मागें तुमचें पाठबळ असेल तर च सत्याग्रहांत प्रचंड शक्ति येईल. नुसते हात वर करून संमति दिल्यानें काम भागणार नाहीं. तिकडे युरोपकडे पहा. ते आपल्या स्वातंत्र्याकरतां किती त्याग करीत आहेत? लाखों माणसांचा व कोट्यवधि रुपयांचा बळि दिला जात आहे. तुमचें हि आम्हांला प्रत्यक्ष सहकार्य हवें, जिवंत सहकार्य हवें. तें सहकार्य लाखों लोक विधायक कार्यक्रमांत भाग घेतील तेव्हां च मिळेल. नुसते हात वर करण्याच्या त्यागानें मिळायचें नाहीं. तुमचें सहकार्य सजीव आणि व्यापक असेल तर जेलमध्यें जाणारे आम्ही मूठभर च लोक असलों तरी यश मिळवूं. मारुतीचें उदाहरण तुम्हांला माहीत आहे. त्या महाबलवान् राक्षसांमध्यें तो एकटा जाऊन

उभा राहिला. हा पराक्रम त्यानें बाबाच्यांतून मिळविलेला पराक्रम नव्हे. जेव्हां त्याला या निर्भयतेचें कारण विचारण्यांत आलें तेव्हां तो म्हणाला कीं माझें खरें बळ शरीरबळ नाहीं. हा रामचंद्राच्या पाठबळाचा पराक्रम आहे. मी रामचंद्राचा दास आहे. आपल्यात म्हण आहे कीं पांचामुखीं परमेश्वर असतो. जनता ही च जनार्दन आहे. त्या देवाचें पाठबळ हें च आमचें खरें बळ आहे. तें पाठबळ विधायक आचाराच्या द्वारें च मिळू शकतें. हिंसक युद्धाच्या तयारीत हि अखंड विधायक कार्यक्रमाची गरज असते. हिंसक युद्धांत नुसती सेना लढत नाहीं. संबंध राष्ट्राला विधायक कार्यांत गुंतवावें लागतें. प्रचंड विधायक संघटना होते तेव्हां च हिंसक युद्धाची तयारी होत असते. युद्धाची सामुग्री तयार करण्याकरतां मोठमोठाले कारखाने काढणें, रस्ते व पूल तयार करविणें, कपडे तयार करविणें, शेतीची व खाद्य पदार्थ तयार करण्याची व्यवस्था करणें इत्यादि कामें मुलांमुलींना शाळा सोडून करावीं लागतात. बायकांना घरचें काम सांभाळून युद्धाच्या या विधायक तयारीला मदत करावी लागते. याप्रमाणें उत्पादन वाढवावें लागतें. हिटलरला विचाराल तर तो म्हणेल कीं मला चौदा आणे विधायक कार्य करावें लागतें आणि दोन आणे प्रत्यक्ष लढाईचें काम. हिंसात्मक युद्धात जर जनतेच्या एवढ्या मोठ्या विधायक सहकार्याची आवश्यता असते तर त्यावांचून अहिंसेच्या लढाईला जोर कण कसें शक्य आहे ?

केवळ युद्धविरोधाला यश कसें येणार ? युद्धविरोधी सत्याग्रह तर दिव्याला काडी लावून पेटविण्यासारखा आहे. पण ती पेटलेली ज्योत कशाच्या जोरावर प्रकाश पाडते ? वातीच्या व तेलाच्या जोरावर. ती नसली तर दिव्याचा प्रकाश पडणार नाहीं. सबंध वातीला तेलाचें पोषण मिळत असतें. काडी तर निमित्तमात्र होते. एका टोकाला काडी लावली की दिवा तेवत राहतो. त्याचप्रमाणें फक्त युद्धविरोधाच्या काडीनें चालणार नाहीं. जोंपर्यंत विधायक कार्याचें तेल व वात मिळणार नाहीं तोंपर्यंत ज्योतीचा प्रकाश पडणार नाहीं. तेल व वात मिळत राहतील व वातीला तेलाचें पोषण नीट मिळत राहील तर युद्धविरोधाचा कार्यक्रम यशस्वी होईल, तेजस्वी होईल.

हें तेलाचें कोठार अखंड राखण्याकरितां हिंदु-मुसलमानांची एकी पाहिजे. पण ती कशी व्हावी? आम्हांला एकमेकांवर विश्वास करायला शिकलें पाहिजे. हजार-हजार, बारा-बाराशें वर्षें आम्ही एकत्र राहिलों तरी आमच्यांत अविश्वास व भीति आहे. ती नाहींशी केली पाहिजे. दुसरी महान् विधायक प्रवृत्ति हरिजन-सेवा आहे. हरिजनांना जवळ केलें पाहिजे. त्यांच्याशीं आपल्या कुटुंबियांप्रमाणें वागलें पाहिजे. घरोघर चरखा चालला पाहिजे. आमचें राष्ट्र गरीब आहे. तें दोन्ही हातांनीं काम करील तेव्हां च आमची भूक शांत होईल. एक गृहस्थ मला म्हणाला, " माझ्या येथें ६–७ खातीं तोंडें आहेत." ईश्वराच्या वाणीप्रमाणें माझ्या तोंडून निघालें—"त्यांत भिण्यासारखें काय आहे? सात तोंडें आहेत तर चौदा हात हि आहेत. एका तोंडाला दोन हात अशी ईश्वराची प्रेमळ व दयाळु योजना आहे, दोन तोंडांना एक हात नाहीं. " आपण चाळीस कोटि आहोंत. ही आपत्ति नाहीं, आपलें हें मोठें सद्भाग्य आहे. आपल्या ८० करोड हातांत महान् लक्ष्मी आहे. दोन्ही हात कामाला लावा.

साधें सूत कांतण्याचें काम आहे. लढाईमुळें गिरणीचें कापड महाग झालें आहे. ही लढाई किती दिवस चालेल हें कुणी सांगूं शकत नाहीं. मला वाटतें, ती पुष्कळ दिवस चालणार आहे. अशा स्थितींत महागाईमुळें कदाचित् कापडाकरतां थंडींत कुडकुडत पडावें लागेल. परावलंबी लोकांची अशी च दुर्दशा होत असते. पण कांतण्याचें काम तर लहान मुलें, म्हातारे व अशक्त माणसें हि करूं शकतात. स्वावलंबनाखेरीज दुसरी एक दृष्टि आहे. दररोज देशासाठीं कांहीं तरी प्रत्यक्ष क्रिया केली पाहिजे. ती कोणती असूं शकते? लहानपणीं आमची आई सांगे कीं दररोज तुळशीला पाणी घाल. अशा रीतीनें प्रत्यक्ष क्रियेच्या द्वारें घरोघर मुलांच्या मनांवर धर्मप्रीतीचा संस्कार करण्यांत येत असे, लहान मुलांना उपासना शिकविली जात असे. देशप्रीतीचें प्रतीक म्हणून आम्हांला हि लहान मुलांकडून दररोज कांहीं तरी प्रत्यक्ष कार्य करवून घेतलें पाहिजे. कांतणें हें अशा प्रकारचें कार्य आहे. राष्ट्रप्रीतीच्या या उद्योगांत आम्हांला अभिमान वाटला पाहिजे.

त्याचप्रमाणें सर्व प्रकारची व्यसनें सोडायला पाहिजेत लक्षात ठेवा कीं जर सगळे लोक विधायक कार्यक्रम जोरानें चालवितील तर आमच्या सत्याग्रहाच्या लढ्यात इतकी शक्ति येईल कीं ती कोणाला च दडपून टाकतां येणार नाहीं आम्हाला पराजय हा शब्द देखील माहीत होणार नाहीं शेवटीं आम्हाला यश येणार याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं माझ्या मित्रांनो, फक्त आमच्या मागें तुमचें सक्रिय पाठबळ असू द्या

ग्रामसेवा वृत्त
डिसेंबर १९४१

: ३ :

## आजच्या जगांत समत्व हा च राजा आहे*

हिंदुस्थानची आजची स्थिति फार कठिण आहे एका बाजूनें कांही सत्ता आपल्या लोकांच्या हातीं आल्याबरोबर हिंदुस्थानात काय काय प्रकार होऊं लागले आहेत ते सर्व तुम्हाला माहीत आहेत च आज स्वराज्य अगदी जवळ आल्यासारखें आहे. तें आतां दूर जातें की काय अशी शंका वाटू लागली आहे म्हणून मी म्हणतों कीं हिंदुस्थानच्या स्वराज्याचा प्रश्न म्हणजे हिंदुस्थानच्या सामाजिक ऐक्याचा प्रश्न आहे जर आम्ही एक होऊन राहू, तर स्वराज्य आमच्या हातांत आहे तें कधीं जाऊं च शकत नाहीं परंतु जर आम्ही फुटलों तर स्वराज्य दूरापास्त आहे

गांधीजींनी आपल्या जीवनानें गेलीं पंचवीस वर्षें ही च गोष्ट आम्हास सांगितली परंतु इतक्या दिवसांचा त्यांचा प्रचार आणि प्रयत्न असून देखील आपण असें पाहतों कीं हिंदुस्थानचे लोक अजून जागे झालेले नाहींत गांधीजींनीं आपणाला एक शब्द दिला—'अहिंसा' अहिंसा म्हणजे निष्क्रियता नव्हे च अहिंसा ही एक महान् शक्ति आहे शक्तीची उपासना करावी लागते अहिंसेची उपासना म्हणजे काय? जितके लोक आपण हिंदुस्थानांत राहतों त्या सर्वांनीं भाऊ भाऊ म्हणून राहिलें पाहिजे परस्पराशीं प्रेमानें वागायला पाहिजे कुणाला हि नीच मानायचें नाहीं कुणाला हि उच्च मानायचें नाहीं कुणाला हि दाबायचें नाहीं कुणालाहि भ्यायचें नाहीं ही अहिंसेची उपासना आहे अशा तऱ्हेनें आपण अवश्य बलवान् होऊं शकतों मग हिंदुस्थानला कोणत्या हि शस्त्राची गरज उरणार नाहीं परंतु याच्या उलट

* हरिजनांना हॉटेलें उघडीं करण्याच्या प्रश्नावर वर्धा येथें ४ १२-४६ रोजीं दिलेलें व्याख्यान

जर आम्ही आपसांत प्रेमानें वागलों नाहीं तर हिंदुस्थानांत जे जे प्रश्न उत्पन्न होतील त्यांचा उकल मारामाऱ्यांनीं करावा लागेल. म्हणजे तिऱ्हा-इताचें राज्य रहावें असें च होईल.

म्हणून माझा तर शस्त्र-शक्तीवर लेश हि विश्वास नाहीं. शस्त्र दुर्बल असतें. त्याला स्वत.चे बळ नाही. आम्ही आमचें बळ त्याला देतों तेव्हां त्याला बळ येतें. मग आमचें बळ त्या शस्त्राला देण्यापेक्षां आम्ही स्वत.ला च तें कां देऊं नये ? म्हणून ही आत्मशक्ति गांधीजींनीं आमच्या पुढें ठेवली. आणि तिची कसोटी करायला आज ते नोआखालीमध्ये जाऊन पोंचले आहेत.

लोक म्हणतात," हिंदु-मुसलमान, हरिजन-सवर्ण, इत्यादि भेद आहेत त्यांचा इंग्रज गैर फायदा घेत आहेत. पण मी म्हणतों, आम्ही त्यांना असा गैर फायदा घेऊं कां द्यावा ? आम्ही हे भेद कां मिटवू नयेत ? हरिजनांतील व सवर्णांतील भेद-भाव दूर व्हावा म्हणून बत्तीस सालीं गांधीजींनीं उपवास केला होता. त्याला आज चवदा वर्षे झालीं पण एवढ्या काळांत अस्पृश्यता किंचित् ढिली झाली असली तरी पूर्णपणें नाहींशी झाली नाहीं. अजून माझ्या सारख्याला येथें येऊन त्यासंबंधीं व्याख्यान द्यावें लागत आहे. मला असें वाटतें कीं यावेळीं आमच्या लोकांचें मन तयार झालें आहे. थोडासा प्रयत्न झाला तर अस्पृश्यता दूर होऊं शकेल अशी आज परिस्थिति आहे.

सर्व-सामान्य जनतेंत नेहमींच एक प्रकारची जडता असते. हिला शास्त्रांत ' इनर्शिया ' म्हणतात. इनर्शिया समाजाच्या स्थैर्याला थोडा लाभचा हि असतो. इनर्शिया म्हणजे पूर्वस्थिति कायम राहणें. यंत्र बंद पडलें कीं बंद फिरत राहिलें कीं फिरत राहिलें. त्यामुळें जनतेला स्वतंत्रपणें कांहीं सुचत नसतें. पण पुढाऱ्यांनीं चालना दिली म्हणजे जनता हालचाल करूं लागते. एका गांवचें मंदिर सर्वांना उघडें झालें, कारण तेथील मोठी मंडळी अनुकूल होती. जवळच्या गांवचें उघडें झालें नाहीं, कारण तिथली मोठी मंडळी अनुकूल नव्हती. पण अशानें आमचें काम होणार नाहीं मी असें ऐकतों की मद्रास व ओरिसा प्रांतांत कांहीं देवळें हरिजनांना उघडीं

करण्यांत येत आहेत. महाराष्ट्रांत हि कांहीं ठिकाणीं उघडीं केलीं जात आहेत. पण या वेळीं सगळींच्या सगळीं देवळें उघडलीं पाहिजेत. मी आज गणितानें काम करायला तयार नाहीं. ही क्रांतीची वेळ आहे. क्रांति हळूं हळूं होत नाहीं. सगळीं देवळें, सगळीं हॉटेलें, सर्व सार्वजनिक स्थानें हरिजनांना एकदम मोकळीं व्हायला पाहिजेत.

माझें असें भविष्य आहे कीं ज्या दिवशीं हिंदुस्थानांतून अस्पृश्यता दूर होईल त्या दिवशीं हिंदु-मुसलमान भांडणें हि आपोआप नाहींशीं होतील. इतिहास जाणणारांच्या हें लक्षांत येण्यासारखें आहे. परवां कर्नाटकचे एक गृहस्थ म्हणत होते, ' आमच्या येथें लिंगायत-ब्राह्मण हा वाद फार आहे. ' महाराष्ट्रांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर-वाद आहे. पण ज्या दिवशीं अस्पृश्यता दूर होईल त्या दिवशीं हे सर्व प्रश्न आपोआप सुटतील. जे लोक सर्वांत जास्त दुःखी आहेत, दबलेले आहेत, त्यांना वर घेतल्यानें इतर भेद सहज च मावळणार आहेत. त्या साठीं स्वतंत्र प्रयत्न करण्याची गरज राहणार नाहीं.

हॉटेलवाले म्हणतात " हरिजनांना आंत कसें येऊं द्यावें ? " मी म्हणतों, " अरे बाबा, तूं तर सेवक आहेस ना ? सेवकाचा धर्म काय ? हॉस्पिटल मध्यें येणाऱ्या माणसाची जात डॉक्टर लोक विचारतात का ? आलेल्या रोग्याची सेवा हा च त्यांचा धर्म. तसें च भुकेला आला कीं त्याला खाऊं घालणें हा हॉटेलवाल्यांचा धर्म आहे. जेवूं घालण्यांत जन-सेवा आहे. मेहनतीचे पैसे घेतले म्हणून ती सेवा नाहींशी होत नाहीं. ह्यांत जात विचारण्याचा प्रश्न च उभा राहतां कामा नये. बरें, समजा तुम्हीं एखाद्याला जात विचारली आणि त्यानें 'महार' असून 'मी मराठा' म्हणून सांगून दिलें तर तुम्हांला कसें कळणार ? म्हणून जात विचारणें मी केवळ वाह्यात प्रकार समजतों. खरा धार्मिक वृत्तीचा मनुष्य असेल तो भुकेल्याला कळकळीनें जेवूं घालील. तो त्याची जात पाहणार नाहीं. दुःखी माणसाचें दुःख दूर करण्याशिवाय इतर कांहीं हि पहावयाचें नाहीं अशी दयाळू माणसांची रीत आहे. आमची ही जुनी परंपरा आहे.

ज्या प्रमाणें हॉटेलांचें त्याच प्रमाणें देवळांचें. ईश्वर तसा सगळी च कडे आहे. पण मनुष्य आपल्या भावनेनें देवळांत ईश्वर-दर्शनासाठीं येतो. पुजाऱ्यांना असें वाटलें पाहिजे कीं जर एक माणूस देवाला भेटायला आला आहे तर देव-भक्तांची भेट घालून देणें एवढें च माझें काम आहे. मंदिरांत पाप्यानें हि यावें, आपल्या पापाबद्दल क्षमा मागावी. भक्तानें यावें, भक्ति-भावानें प्रणाम करावा. " अमक्यानें यें, आणि अमक्या नको " हें म्हणणारा मी कोण? हरिजन पंढरपूरला जातो, पांडुरंगाचें दर्शन हि त्याला होऊं शकत नाहीं. देवळाचा कळस पाहून परततो, आणि मांस खाणें सोडून देतो. असे हरिजन मीं अनेक पाहिले आहेत. पण त्यांना मंदिरांत प्रवेश नाहीं. उलट इतर जातींचे लोक, जे मांस हि खात असतील, त्यांना प्रवेश आहे. हा कोणचा न्याय?

हा सर्व प्रकार विवेकाच्या अभावीं होत आहे. माझें तर स्पष्ट म्हणणें आहे कीं जे धर्म, ज्या संस्कृति, जे पंथ आहेत त्या सर्वांची आज समत्वाच्या एका च कसोटीवर परीक्षा होणार आहे. जो विचार समत्वाला अपुरा पडेल त्याचा टिकाव लागायचा नाहीं. निरनिराळ्या युगांत निरनिराळ्या गुणांची सत्ता असते. आजच्या जगांत समत्व हा च राजा आहे. म्हणून धर्मांच्या नांवावर भेद ठेवावेत, ही गोष्ट जगाला आज मुळीं च सहन होणारी नाहीं. मला पुष्कळ हिंदुसभावाले भेटतात व सांगतात कीं 'काँग्रेस हिंदूंचें रक्षण करूं शकत नाहीं.' मी विचारतों, तुम्ही कां करीत नाहीं? मुसलमानाच्या द्वेषावर आपली इमारत उभी करण्याऐवजीं तुम्ही हिंदु-समाजला लागलेली भेदाची कीड नाहींशी करण्याकडे शक्ति कां लावीत नाहीं? सबंध हिंदुस्थानांत आतां भेद म्हणून राहतां च उपयोगी नाहीं.

पण मी जेव्हां " भेद दूर करा " म्हणतों तेव्हां वैशिष्ट्यें नाहींशीं करा असें मला म्हणावयाचें नाहीं. " सरगम " च्या स्वर भेदांतून ज्या प्रमाणें सुंदर संगीत निघत असतें, त्या प्रमाणें आपल्या येथील असंख्य वैशिष्ट्यांतून एक सुंदर संगीत निघालें पाहिजे. हिंदुस्थानात अनेक धर्म, अनेक जाती, अनेक भाषा, अनेक पंथ भरले आहेत. लोक विचारतात, "हा काय गोंधळ आहे?" मी म्हणतों, "हा गोंधळ नाहे, हें घराणें आहे."

रवींद्रनाथांनीं तर याला महासागराची उपमा दिली आहे. महासागरावर ज्या प्रमाणें असंख्य लाटा उसळत असतात त्याप्रमाणें येथें अनेक मानव-समाजांचीं आंदोलनें होत आहेत हें आमचें वैभव आहे. देवानें मला हात, पाय, कान, नाक, डोळे, इत्यादि विविध अवयव न देतां नुसतां एकच एक मांस-पिंड दिला असता, तर माझी काय गत झाली असती ? उलट पक्षीं माझ्या या विविध अवयवांत भांडण लागलें तर माझी गत काय होईल ?

हिंदुस्थानात भेद अनेक आहेत, कारण हिंदुस्थान फार प्राचीन देश आहे. याच्या समोर हीं तुटकळशीं पाश्चात्य राष्ट्रें पोरें आहेत. हिंदुस्थानांत हूण आले, शक आले, यहुदी आले, पारशी आले, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादि सर्व आले आता तर चिनी देखील आले आहेत. हें एक मोठें संग्रहालय आहे नाना शास्त्रें, विद्या, भाषा, कला येथें विकसित झालेल्या आहेत. म्हणून म्हणतों कीं हा एक मोठा वैभवशाली देश आहे. परंतु हृदयांत प्रेमाचा उदय पाहिजे. म्हणजे शक्ति प्रगट होईल.

शक्तीवरून मला शक्ति-देवीची आठवण होते. शक्ति-देवीला अनेक भुजा असतात, पण हृदय मात्र एक च असते. विराट पुरुषाचे सहस्र हात वर्णिले आहेत. पण हृदय मात्र एकच सांगितलें आहे. तसें आपल्या सर्वांचें हृदय एक बनलें पाहिजे असें झालें तर स्वराज्य हातांतच आहे एरव्हीं तें हातचें गेलें म्हणून समजा.

( मराठी हरिजन, ता. ८ डिसेंबर १९४६ )

## : ४ :

# युद्धाचें टोपणें लक्षण *

माझ्या मित्रांनो,

मला कल्पना नव्हती कीं या ठिकाणीं मला माझ्या अधिकाराचें च काम मिळणार आहे. परंतु सुरवातीच्या येथील आचार्यांचें जें भाषण ऐकलें त्यावरून दिसलें कीं माझ्या अधिकारांतल्या च कामावर मी आलों आहे. आजचा हा या कॉलेजपुरता शेवटचा च प्रसंग. कारण यानंतर हें कॉलेज नागपूरला जाणार आहे असें आतां च कळलें. शेवटचा प्रसंग साजरा करणें हा मला माझा अधिकार वाटतो. मी जेव्हां हयलें आमंत्रण स्वीकारलें तेव्हां माझ्या जवळपासच्या मंडळींना वाटलें कीं हा कुठला प्राणी अन् कुठें जाणार! ज्ञानदेवानें लिहिलें आहे ना, एक जंगलांतलें जनावर पकडून राजसजलेल्या राजमहालांत आणलें. त्याला वाटलें, कुठल्या शून्य जागीं आपण आलों! "रानींचें राउळा नेलिया। दाही दिशा मानी सुनिया" तशी माझी ह्या ठिकाणीं दशा व्हायची. कारण कॉलेजसारख्या ठिकाणीं वेगळ्या प्रकारचें वातावरण आणि आमचें वेगळें वातावरण. ह्यामुळें त्यांच्या शंकेला अवकाश वर होता. परंतु मला तसली शंका मुळीं च नव्हती कारण विद्यार्थी—मग तो कोठला हि असो— माझ्या वृत्तीशीं जमणारा, मला माझा आत्मा च वाटतो म्हणून वातावरण किती हि वेगळें असलें तरी समोर विद्यार्थी असल्यावर त्यांच्यात आणि माझ्यात फरक उरणार नाहीं, याबाबत मी निःशंक होतो. म्हणून हें आमंत्रण मी स्वीकारलें.

---

* वर्ध्याच्या वासुदेव आर्ट्स् कॉलेजच्या स्नेहसंमेलन प्रसंगीं ता. १४-१२-४१ ला अध्यक्षपदावरून दिलेलें भाषण.

तुम्ही कॉलेजचे विद्यार्थी आहां तेव्हां वर्तमान स्थितीकडे तुमचें लक्ष असेल असें गृहीत धरलें पाहिजे. पहा, आजचा काळ कसा आला आहे ! मानव-समाजाला एका भयंकर पोटदुखीच्या वेदना होऊन राहिल्या आहेत. पृथ्वीच्या पोटांतहि असा च भयंकर स्वरूपाच्या वेदना होतात आणि भूकप वगैरे-सारखे उत्पात होतात. तसे ह्या भयानक वेदनांतून कोणते उत्पात जगात होणार आहेत ते आज सांगतां येत नाहीं. मानव-समाजाचा इतिहास दहा पांच हजार वर्षांपूर्वीचा आहे अशी कल्पना केली जाते. तुम्ही जी इतिहासाची पुस्तकें वाचतां त्यांचा प्रारंभ जेमतेम दोन तीन हजार वर्षांपासूनचा आहे. तत्पूर्वीची हजार-दोन हजार वर्षांची माहिती अनुमानानें सांगितली जाते. पण वस्तुतः मानव-समाजाचा इतिहास निदान दहा लाख वर्षांचा आहे. त्यामुळे इतिहास म्हणून जो सांगितला जातो तो मानव-समाजाच्या एवढ्या मोठ्या इतिहासाचें इकडचें टोक आहे. एवढ्या अवकाशांत अनेक क्रांत्या झाल्या असतील, अनेक पोटदुख्या झाल्या असतील. परंतु मागच्या सबंध इतिहासांत इतकी भयानक पोटदुखी आजपर्यंत कधीं च आली नसेल. आजच्या ह्या युद्धांत सबंध जग च सामील झाल्यासारखें आहे. 'सबंध' जग मी म्हणतों, तें लाक्षणिक किंवा आलंकारिक अर्थानें नव्हे; तर अगदीं अक्षरार्थानें सबंध जग युद्धांत सामिल आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. आजचे हें युद्ध सर्व जगाचें संकुल युद्ध आहे ("टोटल वार" साठीं हा शब्द मीं योजला आहे, म्हणजे ज्यांत सबंध राष्ट्रांचीं राष्ट्रें दुसऱ्या राष्ट्रांचें शत्रु समजलीं जातात. इकडल्या झाडांचें तिकडल्या झाडांशीं वैर; इकडल्या औजारांचें, जडपदार्थांचें, पुरुषांचें, बायांचें तिकडल्या औजारांशीं, जडपदार्थांशी, पुरुषांशीं, बायांशीं वैर; सरळ, वांकडे, तिरपगडे, वरून, खालून, चारी-बाजूनें–सर्व उभयान्वयी आणि शब्दयोगी अव्ययें वापरून सर्व प्रकारें एका राष्ट्राचें दुसऱ्या राष्ट्राशीं वैर. याला दुसरे विधिनिषेध कांहीं च नाहींत. जेणेंकरून विजय होईल तो विधि आणि जेणेंकरून पराजय होण्याचा संभव तो निषेध. म्हणून मी जें म्हणतों कीं सबंध जग युद्धांत सामील आहे तेव्हां तें अक्षरशः तसें समजायचें आहे. परवां च वाचलें. इंग्लंडच्या सबंध इतिहासांत आतांपर्यंत जी गोष्ट झाली नाहीं ती आतां त्यांनीं केली आहे.

१८ वर्षांच्या वर ज्या अविवाहित स्त्रिया असतील त्यांना, आणि विवाहित असून ज्यांना मूल नाहीं त्यांना, युद्धात सामील झाले पाहिजे असा कायदा झाला आहे आणि असा १६ लाख बाया मिळतील अशी गणना केली आहे एवढयानें त्यांचें समाधान नाहीं झालें ते म्हणतात, १६ व १८ वर्षांचा जो मधला काळ, उरला त्या वयातल्या स्त्रियांनी युद्धावर याव म्हणून त्यांना प्रोत्साहन दिलें जाईल त्याच्यासाठी कायदा नाहीं। पण त्यांना उत्तेजन दिलें जाईल आपल्याकडे नाहीं का "प्राप्ते तु षोडश वर्षे पुत्रं मित्रवदाचरेत्" तसे १६ वर्षे झालीं कीं बाई युद्धावर यायला लायक झाली! तिकडे रशियानें हि ह्याबरोबर एक हुकूम च जाहीर केलें आहे गेल्या पाच महिन्याच्या त्याच्या लढाईंत रणांगणावर मेलेले, जखमी झालेले, पकडलेले मिळून लढाईला नालायक झालेले एक कोटि सैनिक आहेत असें बोललें जात १८ कोटींच्या राष्ट्रात कोणत्या हि प्रकार धरले तरी लढाईला लायक अशीं साडे चार कोटींहून अधिक माणसं असण्याची शक्यता नाहीं। आणि त्यातून सगळीं च काहीं लढाईवर पाठविता येत नाहीत प्रत्यक्ष लढाईवर एक शिपाई गेला म्हणजे त्याच्या मागें तीन जण तरी ठेवावे च लागतात वीज पुरविण्याचें काम, पाणी पुरविण्याचें, रस्ते बांधण्याचं, औजारें तयार करण्याचें वगैरे अनेक कामें असतात म्हणजे प्रत्यक्ष शिपाई आणि त्याचे मदतीस ह्यांचे प्रमाण तीन हें प्रमाण धरून हिशेब केला तर सव्वा कोटीहून अधिक सैनिक युद्धावर दाखल करणे शक्य नाहीं फार तर दीड कोटि असतील ह्या सव्वादीड कोटींपैकीं पाउण कोटि किंवा एक कोटि शिपाई युद्धाला नालायक झाले ह्याचा अर्थ असा कीं आता त्यांना माणसं अपुरीं पडू लागलीं। म्हणून ते हरणारे नाहींत त्यांनीं जाहीर केलें कीं ज्या पुरुषाला किंवा स्त्रीला मुलगा नाहीं तिच्यावर कर, विवाहाची जी एक वयाची मर्यादा ठरली असेल त्या वयात ज्याने विवाह केला नाहीं त्याच्यावर कर, संताना-नतर च या करांतून मुक्त मिळायची ह्याचा अर्थ असा कीं टक कमी पडले म्हणजे जशी कारखान्यांत त्याची उत्पत्ति वाढवायची तसं सरायला माणसें कमी पडू लागलीं म्हणून ही मनुष्य निर्मितीची योजना! ह्या योजनेनें तत्काळ माणसें मरायला मिळतील असे नाहीं च निदान १५-१८ वर्षे तरी

लागतील च. पण तेव्हां कां होई ना, पण माणसांचा तुटवडा पडूं नये म्हणून ही योजना. अशी ही भयानक परिस्थिति आहे.

ह्या भयानक स्थितीतून काय निष्पन्न होणार आहे ? ह्या पोटदुखी-नंतर हिच्यांतून पुढें जी भविष्यकाळची स्थिति निर्माण व्हायची त्या स्थितीला ह्या लोकांनीं "नवीन रचना" असें नांव दिलें आहे. त्यांचें आजचें हे जे विध्वंसनाचें कार्य च चललें आहे तें, आपल्या शेतांत जसें निंदाईचें काम चालतें आणि मग त्यांतून नवीन पीक निर्माण होतें, तसें निंदाईचें काम चाललें आहे. ह्या युद्धानंतर मानव-समाजाची वेगळी रचना व्हावयाची आहे असें त्यांचें म्हणणें ठीक आहे. पण आपोआप जें होईल तें आपल्याला पाहिजे आहे की आपण जें योजून ठेवूं त्याप्रमाणें च व्हायला पाहिजे, ह्याचा नीट विचार करून घ्या. ह्या युद्धानंतर आज आहे ती काही मानव-समाजाची स्थिति राहणार नाहीं हें निश्चित. परंतु ज्यांनीं युद्ध सुरु केलें त्याना युद्ध सुरू करणें सोपें होतें. पण एकदा युद्धाची प्रगति होत गेली म्हणजे मग हे युद्धाला करीत नाहींत पण युद्ध च यांना करतें. त्या वेळीं हे युद्धाचे नियामक राहत नाहींत, हे च युद्धाचे नियम्य बनतात.

युद्धाच्या मागें मागें यांना जावें लागतें. हिटलर सर्वांत सरस योजना-कुशल आहे असें म्हटलें जातें. पण आज चाललेलें जागतिक युद्ध त्याच्या योजनेप्रमाणें चाललें आहे असें म्हणणें शक्य नाहीं. याचा अर्थ असा होतो कीं आतां ह्या युद्धाच्या शेवटीं जे निघेल तें खरें ! पण इतक्या भयंकर क्षयानंतर आणि त्यागानंतर जें निघेल तें प्राप्त करून घेण्याच्या लायकीचें तरी ठरेल का ? कांहींतरी निघणार च आहे. प्रचंड भूकंप झाल्यानंतर इकडचा समुद्र तिकडे, तिकडचा पर्वत इकडे अशी कांहींतरी उलथापालथ होते च. अनेक क्रांत्या होतात. पण त्या क्रांत्या मानवांनीं केलेल्या नसतात. ती जी क्रांति होते ती नियोजित होत नाहीं पण स्वैर क्रांति होते. तसें आजच्या चालू लढाईतून आपल्याला पाहिजे तो बदल घडवून आणता आला तर तो नियोजित म्हणतां येईल. नाहीं तर आपोआप बदल तर घडून येणार च

आहे. मग आजचें स्वरूप पालटून कांहीं तरी नवें स्वरूप यावें एवढ्यासा च का ही लढाई सुरू केली ? एवढी भयानक लढाई सुरू केली तर काय निश्चित निष्पत्ति योजनेप्रमाणें मिळणार असेल तर ना ? पण आज हें स्पष्ट दिसत आहे कीं हे मोठमोठे म्हणविलेले लोक यांच्या हातात युद्ध न राहतां हे च युद्धाला वश झालेले आहेत. इतकें भयानक हें युद्ध, पण तें पचवायला मी तयार आहे. पण या युद्धानंतर मी म्हणेन तसा फरक घडवू आणता आला तर च; नाहींतर जें निघेल तें निघेल असें म्हणण्याची पाळी यायची. तें परवा लॉर्ड हॅलिफॅक्सनें जें उत्तर दिलें तें च पहा. त्याला विचारलें "या युद्धाचा उद्देश काय आहे ?" त्यानें उत्तर दिलें, 'जय मिळविणें हा च या युद्धाचा उद्देश.' पूर्वी तर आम्ही लोकशाहीसाठीं लढत आहोंत वगैरेसारखी भाषा होती. पण आता खरा शब्द त्याच्या तोंडातून निघाला. दुसरा काय उद्देश लागणार होता ना ? लढाई जय मिळविण्याच्या खुशा साठीं च का केवळ लढायची असते ? लढाईसाठीं उद्देश लागतात. पण लढाई सुरू करताना उद्देश ठरला असला तरी आता लढाईचें चक्र एकदा पाठीशीं लागल्यानंतर त्याला वेग देणाऱ्याचा च हात त्या चक्रात सापडला. चक्र त्याच्या ताब्यात राहिलें नाहीं. आपल्याला इष्ट, निश्चित, नियंत्रित अशी निष्पत्ति जर ह्यांतून व्हायची नसेल तर मग ह्या युद्धात भाग तरी कशाला घ्यायचा ? तो अमका युद्धात पडला, हा अमका पडला, तर आता मी हि पडतो असें म्हणणें शहाणपणाचें होणार नाहीं. शहाण्या लोकांनीं—मी हिंदुस्थानच्या च लोकांनीं म्हणत नाहीं. पण कुठल्या हि शहाण्या लोकांनीं—विचार केला पाहिजे कीं ज्यांत आपण ठरवू त्याप्रमाणें निष्पत्ति होत नाहीं अशा ह्या [illegible], स्वैर, जड, युद्धात आपण दाखल व्हावें कीं होऊ नये ? याचें उत्तर एक च मिळू शकतें कीं दाखल होणें योग्य नाहीं. दाखल होऊ नये हें एकदा ठरल्यावर मग पुढचा प्रश्न येतो कीं आपण तटस्थ राहून प्रेक्षक होणें योग्य आहे काय ? आपले सर्व बांधव अशा युद्धांत पडले कीं जें युद्ध त्यांच्या हातांत राहिलें नाहीं उलट त्यांच्या छातीवर च बसलें आहे अशावेळीं आपण तटस्थ राहून बघत बसणें योग्य आहे कीं काय ? ह्या

प्रश्नाचें शहाण्या माणसाला हें च उत्तर द्यावें लागेल कीं तटस्थपणें बघत राहणें योग्य नाहीं.

मग आतां दोन गोष्टी पक्क्या झाल्या. तुम्ही कॉलेजचे विद्यार्थी आहांत. तुमच्या च हातांत पुढें दुनिया जायची आहे. तुम्ही या प्रश्नाचा तटस्थपणें विचार करून योग्य निर्णय द्या. पण तुम्हांला हें पटतें का ? हें युद्ध अत्यंत हिंसक आहे ही गोष्ट आपण तूर्त बाजूला च ठेवूं. परंतु जें युद्ध मानवाच्या हातांत राहणारें नाहीं, उलट मानव च ज्याला वश आहे अशा त्या युद्धांत आपण दाखल होणें योग्य नाहीं—सिद्धांत पहिला. तसें च दाखल झालेल्यांचा विनाश स्पष्ट दिसत असतांना या युद्धांत दाखल न झालेल्या व शिल्लक राहिलेल्या शहाण्या लोकांनीं तटस्थपणें बघत राहणें हि योग्य नाहीं— सिद्धांत दुसरा. हे दोन सिद्धांत निश्चित झाले.

मग पुढें काय ? तटस्थ बसायचें नाहीं तर मग करायचें काय ? याचा विचार करूं लागलें असतां आम्ही सत्याग्रही आज जें करून राहिलों आहोंत त्याची योग्यता लक्षांत येईल. हें युद्ध निर्माण करून जगांत विचाराची एक भूमिका उभी केली गेली आहे. तद्विरोधी सद्विचाराची भूमिका निर्माण करणें हें कर्तव्य ठरतें. लोक विचारतात, ' एवढे सगळे लोक या युद्धांत सामील झाले असतांना तुम्ही मूठभर लोकांनीं प्रतिकार करीत राहण्यानें काय होणार आहे ? ' मी म्हणतों, 'यानें काय होणार आहे तें मागाहून ठरवूं. आधीं आपलें कर्तव्य तर ठरवा.' युद्धाच्या भूमिकेला विरोधी भूमिका निर्माण करणें कर्तव्य ठरतें ना ? जर ठरतें तर तें अवश्य करूं या. त्यानें पुष्कळ कार्य होईल. कां होणार नाहीं ? विरुद्ध भूमिकेचा सक्रिय विचार तर उभा करा ! विचाराच्या शक्तीवर भरंवसा कां नाहीं ? विचाराची अशी क्रियात्मक भूमिका उभी केल्यानें आजचें युद्ध आवरेल असें मी म्हणत नाहीं. तशी माझी अपेक्षा हि नाहीं. परंतु समंजस माणसांनीं विरुद्ध विचाराची मांडणी मनांत आणि जगांत पक्की केली तर मानसिक शक्तीची ही एक 'फ्रंट' तयार होईल. ही एक आघाडी निर्माण होईल. आणि मग जेव्हां युद्ध थकेल आणि थांबेल त्यानंतर तुमच्या विचाराची भूमिका जागृत होईल.

आणि मानव-समाजाची रचना करण्याचें काम त्या वेळीं तुमच्या च हातांत येण्याचा संभव राहील. त्या वेळच्या साठीं आज ही तयारी करायला नको का ? केली च पाहिजे. पण तशी आग्रही करूं लागलों म्हणजे सरकार म्हणतें ' आम्ही ती करूं देणार नाहीं. ' परंतु आम्हांला अशी ही भूमिका निर्माण करणें कर्तव्य वाटतें. अशी एक फळी निर्माण करणें अगत्याचें वाटतें कीं जी युद्ध-समाप्तीनंतर परिस्थितीला नेमक्या मार्गानें घेऊन जाईल. हे येडपे लोक युद्धांत दाखल झाले आहेत. यांच्या हातांत युद्ध राहिलेलें नाहीं, निश्चित निष्पत्ति होण्याचा संभव नाहीं. म्हणून जे बाहेर राहूं इच्छितात त्यांनीं अशी युद्ध-प्रतिकाराची भूमिका रचली पाहिजे. कारण, युद्धानंतर त्या लोकांचीं शरीरें जशीं थकतील तशी बुद्धि हि थकेल आणि शरीरापेक्षां बुद्धि च अधिक थकेल. ते लोक सहज च तुमच्यापासून मार्गदर्शनाची अपेक्षा राखतील. म्हणून यांत संख्येचा मुद्दा नाहीं. ज्यांची बुद्धि शाबूत आहे त्यांचा मार्गदर्शन करण्याचा अधिकार आहे. नियोजित समाजरचना करण्याचें कार्य त्यांच्या च कडे येणार आहे. म्हणून युद्धविरोधी विचाराची सक्रिय भूमिका निर्माण करणें हें त्यांचें कर्तव्य ठरतें.

पण हें कर्तव्य आम्हांला सुखासुखीं कोण करूं देतें ? चालू राज्य-कर्ते आणि व्यवस्थापक आमचें दंडन आणि दमन करणार च. पण तसें ते करतील तर तो हि एक अन्याय च ठरेल. आणि अन्याय होत असेल तो तर सहन करतां च कामा नये. म्हणून अन्याय सहन न करणें — शिकवण पहिली. आणि त्या अन्यायाचा प्रतिकार वेगळ्या तऱ्हेनें म्हणजे वेगळ्या हत्यारानें करणें — शिकवण दुसरी; अशा दोन शिकवणी गांधींनीं या जगाला दिलेल्या देणग्या आहेत. अन्यायाचा प्रतिकार करण्याची त्यांची तऱ्हा जगानें स्वीकारली असती तर आज युरोपमध्यें जें दृश्य दिसतें तें दिसलें नसतें. तो रिबेन्ट्रॉप म्हणाला ना, " आतां युरोपमधील शांतता भंग होण्याचें कारण च नाहीं. कां ? तर सर्व युरोपची प्रजा निःशस्त्र करून टाकलेली आहे आणि तिच्या विरुद्ध जर्मनीचे टँक जिकडे तिकडे पसरले आहेत." ह्या उन्मत्त लोकांनीं हा गुरुमंत्र इंग्रजांपासून च घेतला. इंग्रजांनीं हिंदुस्थानचीं हत्यारें

काढून घेतली आणि मग यांना वाटलें, आतां आपण सुरक्षित झालों. यांच्या जवळ शस्त्रें नाहींत आणि आपण शस्त्रास्त्रांनीं सज्ज. आतां वाटेल तसें राज्य करायला हरकत नाहीं. तो हि तें च म्हणतो. आणि याचें जें सूत्र तें च इतर सर्वांचें आहे. मधांतर किरकोळ फरक असोत, परंतु सूत्र तें च—शांतते साठीं प्रजेला निःशस्त्र करायचें आणि व्यवस्थापकांनीं सुसज्ज व्हायचें.

कार्लमार्क्सनें एक सिद्धांत मांडला आहे. तो सांगितला म्हणजे गांधींनी दिलेल्या विचाराचा महिमा तुम्हांला कळेल. कार्लमार्क्सचें नांव तर तुम्हांला माहीत च आहे. त्याचीं पुस्तकें हि तुम्हीं स्त्रियांनीं वाचलीं असतील. त्याचा सिद्धांत असा आहे कीं जगांत कोणतें हि प्रमेय काम करीत असतांना त्याचे कांहीं फायदे असतात आणि कांहीं तोटे हि असतात. फायद्याचें प्रमाण अधिक आणि नुकसानीचें कमी असा येत असतो तों पर्यंत तें प्रमेय चालतें. परंतु त्यांतून फायद्या पेक्षां नुकसान च अधिक निघूं लागलें कीं तद्विरोधी एक दुसरें प्रमेय जगांत उत्पन्न होतें आणि पहिल्या प्रमेयावर हें दुसरें प्रमेय हल्ला चढवितें. आणि मग यांच्या ह्या हल्ल्यांतून एक तिसरें च तत्त्व निघतें. आणि यांत पूर्वींच्या दोन्ही तत्त्वांचे दोष टळून गुण तेवढे शिल्लक राहतात. उदाहरणार्थ समाजांत वेगवेगळे गट वेगवेगळ्या कार्यक्षमतेचे असतात च. या गटांकडे त्यांच्या त्यांच्या भूमिकेप्रमाणें व्यवस्था सोंपविली जाते. याला वर्ण-व्यवस्था म्हणतात. या व्यवस्थेंत गुण दोष दोन्हीं हि असतील च. परंतु जोंपर्यंत गुणांचें प्रमाण अधिक असेल तोंपर्यंत ही व्यवस्था चालेल. मग जेव्हां आणि जर उच्चनीच-भाव, परस्पर हितांतला विरोध वगैरे सारखे दोष प्रगट होऊन वळावूं लागतील तेव्हां आणि तर एक तत्त्व 'अभेद' 'अभेद', 'साम्य' 'साम्य', म्हणून जोरदार रीतीनें पुढें येईल. या दोघांचें युद्ध चालेल आणि मग वर्ण-व्यवस्थेंतील गुण आणि अभेदांतील गुण असलेलें एक तिसरें तत्त्व अस्तित्वांत येईल. आपण कलम नाहीं का करीत लिंबावर मोसंब्याचें ? म्हणजे लिंबांतला गुण आणि मोसंब्यांतला गुण मिळून तिसरें च एक आंबटगोड भंम्याचें फळ निर्माण होतें. तसें हें आहे. पण ही सामाजिक प्रक्रिया कोणी योजनापूर्वक करीत असतो असें हि नाहीं. आपोआप च होते.

प्रत्येक तत्त्वाच्या पोटांत लपलेले दोष प्रगट होत होत त्याच्या च पोटांतून तद्विरोधी दुसरे तत्त्व निर्माण होतें. युद्ध म्हणतो तसें होतें : "तद्दुरूढाय समेव प्पादति" त्यांतून निर्माण होऊन त्याप्त च प्रातें. तशी ही प्रतिकाराची नवीन तऱ्हा इतिहासाच्या च पोटांतून निघाली आहे. त्याला निमित्तमात्र गांधी झाला आहे. आजपर्यंतची पद्धत म्हणजे सशस्त्रांना पराभ्त करून आपण विशेष संघटित आणि विशेष सुसज्ज रहायचें. त्यांतून दुसरी पद्धत ही निघाली कीं समोरच्याला पूर्ण निःशस्त्र करून आपण सशस्त्र रहायचें. आणि आतां त्यांतून च ह्या शस्त्रहीन केलेल्या लोकांना प्रतिकाराची ही नवीन युक्ति सुचली. ही सुचायला निमित्त गांधी झाला. पण तो झाला नसता तर दुसरा कुणीतरी झाला असता. ३०।३५ कोटि लोक जर कायमचे च परतंत्र रहायचे तर ते मानव च नसले पाहिजेत. आणि जर ते मानव असतील तर त्यांना स्वतंत्र होण्याचा मार्ग असला च पाहिजे. तो त्यांना सुचतो ही च त्यांची मानवता. वरील सिद्धान्ताला वितर्कवाद म्हणतात. सामान्य तर्काहून हा विशेष आणि वेगळा असल्यामुळे याला "वितर्क" ही पारिभाषिक संज्ञा आहे. मूळच्या तर्काला विरोधी असा तर्क निघून आणि मग त्या दोघांचा समन्वय होऊन त्यांतून तिसरा तर्क निघतो ही वितर्काची प्रक्रिया.

ज्या लोकांनीं सबंध राष्ट्राला निःशस्त्र बनविलें आणि वर त्याच्या बचावाची जबाबदारी स्वीकारली त्यांनीं तो एक फार च धोक्याचा प्रयोग केला असें म्हटलें पाहिजे. आणि आज इंग्लंडमधल्या लोकांस आपण हें केलें हें शहाणपणाचें काम झालें नाहीं असें जरूर वाटत असलें पाहिजे. म्हणून च ते आतां म्हणूं लागले आहेत कीं "चला युद्धावर. आम्ही तुम्हांला हत्यारें वापरायला शिकवितों." पण त्यांचा हा उपद्व्यापी प्रयोग एकपरी फार लाभाचा ठरला असें म्हटलें पाहिजे. कारण म्हणून च या निःशस्त्रांना हें प्रतिकाराचें निराळें शस्त्र सुचलें. म्हणून गांधी बोलतो म्हणजे तें तोंड बोलतें आहे. हिंदुस्थानची सबंध प्रजा तें बोलते आहे. वीस वर्षेपर्यंत त्यांनीं या नवीन शस्त्राचा महिमा लोकांना शिकविला, तलवारीचें बळ तरी का स्वतंत्र बळ आहे ? लोकांच्या लक्षांत येत नाहीं पण तलवार म्हणजे शेवटीं लोखंड

च ना ? ते खाणींत पडलें च आहे. त्यावर कारागिरी केली. त्याला उपयुक्त आकार दिला तरी लोखंड तें लोखंड च. घडा आणि माती वेगळी का आहे ? त्या शस्त्राच्या मागें चैतनशक्ति आहे म्हणून त्या शस्त्रांत बळ. एरव्ही शस्त्र हें जड च. चेतनशक्ति त्याच्या पाठीशीं नसतांना ती तलवार किंवा बंदूक आपण च उठून तर काम करीत नाहीं ना ? पूर्वी हें लक्षांत येऊं शकत नव्हतें. पण परिस्थितीच्या प्रेरणेनें गांधींच्या हे लक्षांत आलें कीं चैतन्या वर च हत्याराची शक्ति अवलंबून आहे. नाहीं तर हत्यार असून सुद्धां कशी स्थिति होते ह्याची एक गोष्ट आमचे मित्र सांगतात. एकाच्या घरी चोर आले. चोरांना पाहून तो घाबरून ओरडूं लागला—" अरे माझी बंदूक आणा बंदूक. " बंदूक शब्दाचा उच्चार सुद्धां धड त्याच्या तोंडांतून निघे ना. मग त्याला आतां काय त्या बंदुकीचा उपयोग ? उपयोग च व्हायचा तर त्या चोरांना—जर ते आपली बंदूक घेऊन आले असले तर—नेमका व्हायचा. भावार्थ काय, तर शस्त्रें स्वतंत्र काम करीत नाहींत. हें पृथक्करण पूर्वी कळलें नव्हतें. परिस्थिति निरपेक्ष कल्पना सहसा सुचत हि नाहींत. गांधींना च कल्पना सुचली यांत त्यांच्या बुद्धीची हि कांहीं विशेषता मानतां येईल. परंतु ही स्फूर्ति व्हायला वास्तविक कारण हिंदुस्थानची परिस्थिति च आहे. ही जी स्फूर्ति गांधींना झाली त्याचा मोडका-तोडका अंमल आम्हीं गेलीं वीस वर्षें केला आणि इतका अनुभव जरूर आला कीं या युक्तीनें निःशस्त्र असतांना हि लढतां येतें.

पण लोक विचारतात, "याचा परिणाम कितीसा झाला ? " मी म्हणतों, "अहो परिणामवाद्यांनो, जरा सबूर तर करा ! दहा दहा हजार वर्षें हिंसेचे प्रयोग होत आलेले तुम्हीं पाहिलेत. अजून ते व्हायचे शिल्लक च राहिले आहेत का ? इतकीं वर्षें झालीं तरी पुन्हां पुन्हां शस्त्र उचलावें च लागतें ना ? आम्ही लहानपणीं घोकत होतों, "चढणीराला रोज कसा घोंट घोंट घोटितो " तसे हे आपले हजारों वर्षें तलवार घांस घांस घांसीत च राहिले आहेत. या लोकांना जर इतका वेळ दिला, इतका मोका दिला तर, तसा आपल्याला तर अजून वीस च वर्षें झालीं आहेत आम्हांला हि प्रयोग करायला कांहीं अवकाश पाहिजे कीं नाहीं ? नागपूर जेलमध्यें असतांना

आमची ही चर्चा चाले. तिथे जमलेले सगळे सत्याग्रही च होते, मिथ्या कुणी च नव्हता! पण आम्ही विचार करीत असूं कीं आमच्या सारख्या सकलादी साधनांच्या द्वारा जो प्रयोग केला, अथवा जें प्रयोगाचें सोंग केलें, त्या सोंगाचा हि जर — जो काय झाला तितका — परिणाम होऊं शकला तर स्वतः ती वस्तु च प्रगट झाल्यावर किती प्रचंड कार्य करूं शकेल? दहा हजार वर्षें हिंसेचा प्रयोग करून हि आज त्यांची ही दशा; आणि आमचा मोडका-तोडका वीस वर्षांचा प्रयोग, पण त्यानें आम्ही इतका प्रतिकार करूं शकलों! तर मग आम्हीं थोडी उमेद बाळगायला हरकत कोणती? निदान अशी शंका तरी उत्पन्न व्हायला पाहिजे कीं कदाचित् हिंसेची च शक्ति अपेशी ठरेल आणि अहिंसेच्या मार्गानें च पुष्कळ कार्य होईल. एवढी शंका जरी तुमच्या मनात उत्पन्न झाली तरी माझ्या व्याख्यानानें पुष्कळ च कार्य झालें असें मी म्हणेन.

(ग्राम-सेवा वृत्त, डिसेंबर, १९४१—पुरवणी)

: १५ :

## अहिंसेचा सिद्धांत आणि व्यवहार*

**प्रश्न—** पूर्ण अहिंसेची आपली काय कल्पना आहे ?

**उत्तर—** अहिंसेची पूर्ण कल्पना सध्या करता येणें शक्य नाहीं. अहिंसेच्या दिशेनें कोठवर आणि कोणत्या पद्धतीनें आपण जाऊं शकतों इतकेंच आज आपण पाहूं शकतों. आपली अहिंसेची कल्पना अजून मनुष्य-समाजा-पलीकडे गेलेली नाहीं तसें पाहिलें तर अहिंसेला मनुष्य-समाजाची मर्यादा असण्याची कांहीं गरज नाहीं. आणि ह्या मर्यादेत राहून तिचें समाधानहि होणार नाहीं संपूर्ण सृष्टीला अहिंसा स्वत.मध्यें समाविष्ट करील तरच तिचें समाधान होऊं शकेल. दिशा-सूचक म्हणून असें म्हणतां येईल कीं निर्भयता समता आणि दया-भाव ह्या गुणाच्या विकासानें अहिंसा पूर्ण होऊं शकते.

**निर्भयता—** आपण कोणालाही भ्यायला नको. आणि भिण्या-सारखें असें कोणाजवळ काहीं असणें शक्य नाहीं. आत्मा अमर आहे, शरीर बाह्यरूप आहे. आत्मा त्यात लिप्त होत नाहीं. समोरचा जो शत्रु म्हणून आपण म्हणतो तो देखील परिशुद्ध आत्म्याचेंच रूप आहे. आणि म्हणून स्वतःमध्यें आणि दुसऱ्यात फरक करण्याचें कारण नाहीं. आई मुलाशीं एकरूपता अनुभवते.

---

* समग्र ग्रामसेवा विद्यालय सेवाग्राम येथें काशी विश्वविद्यालयाच्या प्रवासी विद्यार्थ्यांशीं झालेलें संभाषण तारीख २९।१०।४५.

आईची ही अनुभूति व्यापक नाहीं. परंतु दृष्टांत म्हणून घ्यायला हरकत नाहीं. आपण देशील एकरूपतेचा असा अनुभव घेतला पाहिजे. मग भिण्यासारखें कांहीं उरणार च नाहीं. हिंसावाद्यांनी एकापेक्षा एक वरचढ विनाशक शस्त्रे बनविलीं आहेत. परंतु समोरचा समाज आपल्याला भीत च नाहीं, असें ह्या जुलूम करणाऱ्यांना दिसून आलें तर त्यांच्या हातांतून हत्यारें गळून पडतील.

समता—उच्चनीच भाव आपल्यांत पुष्कळ आहे. श्रमिकांना आपण हलके समजतों. श्रमिकांचा फायदा घेण्याची आमची वृत्ति असते. त्याच्या श्रमाचा उपयोग करून उलट त्याच्यावर च उपकार दाखविण्याची आपली वृत्ति असते. आम्ही स्वतःला श्रमिकांचे आश्रय-दाते समजतों. हें सर्व चूक आहे. आम्हीं परिश्रमनिष्ठ झालें पाहिजे. कांहीं तरी उत्पादक परिश्रम केला स्वतः पाहिजे. त्याशिवाय मी तरी कोणाला भाकरी देणार नाहीं. मग तो न्यायाधीश असो कीं प्रोफेसर असो. शारीरिक परिश्रमाशिवाय अहिंसा सिद्ध होणें शक्य नाहीं. श्रम करण्यांत च मानवाची मानवता आहे. इतरांच्या खांद्यावर चढून त्यांची सेवा करतां येणें शक्य नाहीं. आतांपर्यंत लोकांनीं असें च केलें. परंतु या पुढें हें चालणार नाहीं. स्वतः मजूर झाल्याशिवाय मजुराची सेवा होणार नाहीं.

दया— कोठें हि अन्याय पाहिला कीं आपणाला क्रोध येतो आणि आपण त्याचा प्रतिकार करण्याचा विचार करतो. क्रुद्ध होऊन केलेला प्रतिकार ही हिंसा च होय. मग आपण शस्त्राची मदत घेतली असो किंवा नसो. शिक्षकाला मुलाच्या अज्ञानाची दया येते. अशा तऱ्हेच्या अन्यायाच्या प्रतिकारांत दयेची भावना असली पाहिजे. कारण मनुष्य चूक करतो तो मोहानें किंवा अज्ञानवश होऊन करतो. म्हणून दोषाचें निवारण किंवा प्रतिकार करतांना द्वेषाची भावना ठेवण्याची आवश्यकता नाहीं. त्याकरतां दया-भावनेची आवश्यकता आहे. अशा प्रकारें ह्या तिन्ही गुणांच्या विकासानें अहिंसेचें दर्शन होऊं शकतें.

प्रश्न २—गांधीजींच्या दृष्टीविषयच्या यावतींत आपलें काय मत आहे ?

उत्तर—गांधीजी जुने शब्द वापरतात त्यामुळें गैरसमजाला वाव मिळतो. मी ह्या शब्दाचा गांधीजीइतका उपयोग करीन नाहीं. कारण ते जुन्या जमान्यांत जन्मलेले आहेत, तर मी नव्या जगांत जन्मलो आहे.

ट्रस्टीशिप हा एक मोठा विचित्र शब्द आहे. चार्चिल ट्रूमन टोजो हे सर्व लोक वापरूं शकतील असा हा शब्द आहे. हा दुर्दैवी शब्द इतका कुचकामाचा झाला आहे कीं त्यांत नवा अर्थ भरणें जवळ जवळ अशक्य झालें आहे. अहिंसक विचारकांनें सद्भावनासूचक जुन्या शब्दांचा स्वीकार केला पाहिजे. तदनुसार गांधीजींनीं हा शब्द चांगल्या अर्थानें वापरला आहे. सध्यांच्या समाजांत कांहीं लोकांना दुसऱ्यांच्या मार्गदर्शनाची आणि रक्षणाची गरज हरघडी लागते. 'प्राप्ते तु षोडषे वर्षे पुत्रे मित्रवत् आचरेत्' ह्या वाक्याप्रमाणें मुलाला कमींत कमी पंधरा वर्षें वया पर्यंत तशी गरज असते च. ह्या वयांत आई-बाप मुलांचे ट्रस्टी च असतात. समाजाची रचना आपण किती हि बदलली तरी देखील आई-बाप मुलांचे ट्रस्टी च राहतील. मग आपल्या पायावर उभे राहिल्या नंतर मुलांना ह्या ट्रस्टींच्या सल्ल्याची गरज राहली नाहीं तर न राहो. आतां हा विचार संपूर्ण मानव-समाजाला लागू करणें जरी शक्य नसलें तरी मी हें उदाहरण अशाकरितां दिलें आहे कीं असा सल्ल्याची गरज समाजांत थोडी तरी राहीलच. लहानपणीं मुलांना मोठ्यांचें जसें संरक्षण मिळालें, तसें च मोठेपणीं ते आपल्या लहान मुलांना संरक्षण देतील. हा च ट्रस्टीशिपचा माझ्या मतें अर्थ आहे.

सर्व इस्टेट सार्वजनिक समजली गेली पाहिजे आणि तिच्या व्यवस्थेचे कांहीं नियम असले पाहिजेत. ट्रस्टी जर नियमांप्रमाणें इस्टेटीची देखरेख करीत नसतील तर त्यांची ट्रस्टीशिप रद्द करण्याचा अधिकार प्रजेला असला पाहिजे. ज्यांच्या हातांत संपत्ति आहे, ते त्या संपत्तीचा उपयोग सार्वजनिक कामाकरितां करीत नसले तर त्यांच्या हातांतून ती धनदौलत हिसकून घेतली पाहिजे. माझ्या मतें ट्रस्टीच्या व्याख्येंत ही गोष्ट गृहीत च आहे. परंतु ह्या हिसकून घेण्याच्या प्रकारांत हिंसेचा संबंध राहणार नाहीं. ज्याच्याजवळ हजार एकर जमीन आहे, तो त्या जमिनीची मशागत एकटा थोडा च करूं शकतो? त्याला दुसऱ्याच्या मदतीनें च शेती करावी लागते. तेव्हां मी म्हणेन कीं कोणत्या हि शेतकऱ्यानें आठ तासांपेक्षां जास्त काम करावयास नको आणि दोन रुपये रोजा पेक्षां कमी मोबदला घ्यावयास नको. त्यामुळें मालकाला जर शेतींत कांहीं शिल्लक राहणार नसेल

तर तो शेती सांभाळण्याचें सोडून देईल आणि आपखुशीनें जमीन लोकांना म्हणजे सरकारला देऊन मोकळा होईल. सरकार हि त्या जमीनीचा स्वीकार करील. आपल्या देखरेखीखाली जमीन ठेवून शेतकऱ्यांना सल्लामसलत देण्याची जमीनदारांची इच्छा असेल तर मी त्यांच्या ताब्यात ती राहूं देईन. त्यांच्या व्यवस्था-शक्तीचा मी उपयोग करून घेईन. सरकारतर्फे त्या ट्रस्टेटीचे व्यवस्थापक म्हणून ते काम पाहतील. परंतु त्यांची वृत्ति बरोबर नसेल तर सर्व जमीन त्यांच्या हातांतून काढून घेण्यांत येईल.

प्रश्न ३—परंतु कायदा ही देखील हिंसा च आहे ना ?

उत्तरः— नाही; जो कायदा लोकमत व्यक्त करतो आणि चांगला हि आहे, तो अहिंसेचें चिह्न च आहे. सैन्याच्या बळावर बनविलेला कायदा हा मात्र हिंसारूप म्हणावा लागेल. चोरी न करण्याचा कायदा हिंसा नाही. उदाहरणार्थ दारू-बंदी घ्या. अमेरिकेंत निवडणुका देखील वेट (ओली) आणि ड्राय (सुकी) अशा मुद्दावर होतात. सध्या तेथें ओल्यांचे राज्य आहे. हिंदुस्थानांत दारूविरोधी इतकें पक्कें लोकमत आहे कीं दारू-बंदीचा कायदा हिंसेंत समाविष्ट होऊं शकत नाहीं. परंतु कायद्यानें केलेली दारू-बंदी अमेरिकेंत कदाचित् अहिंसेच्या मर्यादेंत बसूं शकणार नाहीं.

प्रश्न ४—परंतु मग जमीनीवर मालकी कोणाची राहील ?

उत्तर— हा प्रश्न बरोबर नाहीं. कारण शेवटपर्यंत शिल्लक राहतो कोण ? शेत कसणारा म्हणून जो म्हणतात तो हि राहत नाहीं आणि मालक म्हणून जो म्हणतात तो ही राहत नाहीं. शिल्लक राहते फक्त जमीन. आणि तिची च मालकी आपणा सर्वांवर आहे. हवेवर कोणाची सत्ता आहे ? ज्याला नाक आहे त्यानें हवा घ्यावी. परंतु हवा स्वत. मात्र स्वतंत्र च आहे. कांहीं म्हणावयाचें असेल तर असें म्हणतां येईल कीं जो जमीनीची सेवा करील त्याची ती समजली जावी. जमीनीवर सत्ता कोणाची च बसूं शकत नाहीं, म्हणून जरूरीपेक्षां जास्त जमीन ठेवण्याचा आणि तिची मालकी ठरविण्याचा प्रश्न च उद्भवत नाहीं जमीन हिसकून घ्या असें आज च मी म्हणणार नाहीं. योग्य पण कमींत कमी खंड

देण्याला मी तयार आहें. इतक्यानें जमीनदाराला समाधान होणार नसेल तर मग मी म्हणेन कीं 'काम करा'. आणि जर तो काम करण्याला नकार देईल तर मी सर्व जमीन सरकार-जमा करीन, आणि लोकांना जरूरीप्रमाणें वांटून देईन.

प्रश्न ५—परंतु ज्यांनीं आतांपर्यंत जमिनीचा दुरुपयोग केला आहे, त्यांच्याकडे जमीन कां राहूं द्यावी ?

उत्तर—तें पहावें लागेल. त्या लोकांच्या पूर्वजांनीं कांहीं हि केलेलें असलें तरी त्यांच्या बुद्धि-शक्तीचा उपयोग आपण अवश्य करूं शकतों. जुन्या शिक्षकांना ट्रेनिंग देऊन त्यांचा आपण मूलोद्योगी शिक्षणा मध्यें जसा उपयोग करून घेतों तसा च ह्या जुन्या मालकांचा देखील मी उपयोग करून घेईन. हां, जर ट्रेनिंगनंतर देखील ते निरुपयोगी ठरले, तर गोष्ट वेगळी. परंतु त्यांना संधी तर द्यायला च पाहिजे ना ? त्यांनीं काळ ओळखला नाहीं तर ते सर्वस्व गमावून बसतील.

प्रश्न ६—परंतु ह्या बाबतींत लोकांत जागृति कशी उत्पन्न करावी ?

उत्तर—ती करतां येणें शक्य आहे. जमीनदारांना ठार करण्याची गोष्ट सांगून जर जागृति उत्पन्न करतां येते, तर त्यांचा उपयोग करून घेण्याची अहिंसात्मक गोष्ट देखील लोकांना समजुन सांगतां येणें शक्य आहे. आणि स्वतः मजुरी करूं लागल्याशिवाय मजुरांमध्यें जागृति उत्पन्न करतां येणार नाहीं. आणि आपण मजूरी करूं लागलों कीं पगार आपोआप वाढणार च. सुशिक्षित लोक भंग्याचें काम करूं लागले कीं भंग्याचें वेतन वाढेल, लोकांना स्वच्छतेचें शिक्षण मिळेल आणि कायदे हि बनतील. त्यामुळे सुधारणा वेगानें होतील. आपण मजूर झाल्यामुळे मजुरांमध्यें देखील जागृति होईल. अशा प्रकारें शिक्षित वर्गाचे लोक मजूर बनले तर एकतर मजुरांच्या जीवनाची पातळी वाढेल आणि मालक देखील नाहीसे होतील.

प्रश्न ७—शेत कसणारे च जमीनीचे मालक आहेत असें गांधीजी म्हणतात. हें अहिंसेनें कसें होणार ?

उत्तर—ह्यांत शंका कसली ? गांधीजींनीं तर ही क्रांतीची गोष्ट सांगितली. लोक म्हणतील जमीन गांववाल्यांची आहे, सर्व मिळून खाऊं.

जमीनीचा मालक म्हणून कोणी पुढें येईल तर त्याला हि म्हणूं कीं काम कर आणि खा. जमीनदार आज शेतसाऱ्याचा पुष्कळसा हिस्सा स्वतःकरितां ठेवतो. ही लांच आहे. गांववाल्यांनीं शेतसारा देण्याचें नाकारलें तर जमीनदाराला निरुपाय होऊन सरकारला म्हणावें लागेल कीं ही जमीनदारी मला नको. खरें म्हणजे राष्ट्रीय सरकार जनतेचें च सरकार होणार असल्यामुळें सर्व जमीन जनतेची च होणार, वांटप देखील सरकार म्हणजे जनता च करणार आणि त्यासंबंधीं जें काय ठरवायचें तें सरकार म्हणजे लोक च ठरवणार.

प्रश्न ८—मग रशिया आणि हिंदुस्थान यांत फरक काय राहील ?

उत्तर— फरक हा असेल कीं आम्ही येथें लोकांशीं बोलूं, त्यांच्या अडचणी समजून घेण्याचा प्रयत्न करूं आणि त्या दूर करूं. जमीनीचे मालक होण्याचें किंवा तीव्र हक्क सांगण्याचें धाडस आमच्या येथें कोणी करणार नाहीं. परंतु रशियन लोक जसे डोक्यांत धोंडा घालण्याला तयार होतात तसें आम्हांला होतां येणार नाहीं. यांत शंका नाहीं कीं रशियाचा रस्ता 'शॉर्ट कट' म्हणजे जवळचा आहे. परंतु माझ्या मतें हा 'शॉर्ट' कट पुष्कळ 'लॉंग' आहे. रशियानें च जर्मनीची निर्मिति केली आणि आतां तर खुद्द रशिया च जर्मनी बनत आहे. शेवटीं आमचीं सरकारें देखील सर्वांचे ट्रस्टी बनतील आणि जमीनदाराच्या इतर जबाबदाऱ्या हि सांभाळतील.

प्रश्न ९—परंतु शेवटीं सत्तेचें हस्तांतर योग्य तऱ्हेनें कसें होईल ?

उत्तर— सत्तेचें हस्तांतर याचा अर्थ एका सर्वाधिकाऱ्याच्या हातांत सत्ता जाणें असा नाहीं. सामान्य जनतेंत मुलें म्हातारे स्त्रिया सर्वांचा च समावेश होतो. त्यांच्या जवळ कोणती शक्ति आहे ? विशिष्ट वर्गांत जी बुद्धि असते ती सामान्य जनतेंत असत नाहीं. त्यामुळें हिंसेची परवानगी असेल तर एका वर्गाला पराधीन च रहावें लागेल. स्त्रियांना पुरुषांच्या, मुलांना मोठ्यांच्या, अधीन रहावें लागेल. ह्या हिंसेच्या परवानगीमुळें लढाईत मुलांचा आणि म्हाताऱ्यांचा कांहीं उपयोग होणार नाहीं. रशियांत शेवटीं डिक्टेटरशिप च चालू आहे. स्टॅलिन आणि अकबर यांमध्यें काय फरक आहे ? स्टॅलिन देखील चांगला बादशहा आहे, असें च लोक म्हणतील.

खरोखर स्वराज्य फार सोपें आहे. लोकांना तें समजलें मात्र पाहिजे. मोटांचें चरून आणि शेतसारा देणें बंद झालें कीं सरकार संपलें च. त्या वेळीं लोकांवर बाँब अवश्य पडतील; परंतु ते किती लोकांवर ? मुंबई-पुण्यांत राहणाऱ्या मूठभर लोकांवर. खेड्यांतील बहुसंख्य लोक आपआपल्या गांवांत मजेंत राहतील. समाजवादी म्हणतात, सरकार शेवटीं गळून पडणार च आहे. मात्र गळून पडण्यापूर्वी अतिशय मजबूत सत्ता स्थापित होणें जरूर आहे. परंतु हें म्हणणें परस्पर-विरोधी आहे. हिंदुस्थानचे लोक सरकार संपलें असें ज्यावेळीं समजतील त्याचवेळीं सरकार संपलें म्हणून समजा. परंतु अजून ही गोष्ट त्यांच्या डोक्यांत शिरत नाहीं.

प्रश्न १०—परंतु हें सर्व घडून कसें येणार ?

उत्तर— कॉलेजांतून निघाल्यावर सरळ खेड्यांत गेल्यानें हें होऊं शकतें. तेथें च तुम्हाला उत्तर-स्नातक (पोस्ट ग्रॅज्युएट) अभ्यासक्रम पूर्ण करावयाचा आहे. असें समजा, इंग्रज उमजले आहेत कीं आतां कोणत्या तरी दिवशीं हिंदुस्थान आपल्या हातांतून जाणार हें नक्की. एक तर तो स्वतंत्र होईल, किंवा रशिया त्याला घशात घालील. म्हणून अर्धी किंवा पाव सत्ता देऊन आपल्या च लोकांकडून इंग्रज आपल्याला झोडून काढतील. आणि शेतसारा देऊं नका असें आम्हांपैकी कोणी बोलूं लागला, तर त्याला कँग्रेसचें सरकार च तुरुंगांत बंद करील. म्हणून चार आणे सत्ता घेण्याऐवजीं सोळा आणे क्रांति करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

प्रश्न ११— गाईंप्रमाणें तुम्ही बकरीच्या दुधाचा हि पुरस्कार कां करीत नाहीं ?

उत्तर— येथील सर्व काम ग्रामोद्योगाच्या दृष्टीनें चालू आहे. केवळ दुधाच्या नांवावर बकरीला जगवितां येणार नाहीं. लोकांना बकरीचें दूध चालतें तसें बकऱ्याचें मांस हि त्यांना आवडतें. म्हणून आम्ही सध्यां फक्त मर्यादित क्षेत्रांत काम सुरू केलें आहे. भगवान् बुद्धानें बकऱ्याला वांचविण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्याला ते साधलें शकले नाहींत. कारण बैगंबनाणें बकऱ्यांचा

दुसरा कांहीं उपयोग होत नाहीं. एक तर त्यांना जंगलांत सोडून द्यावें लागतें किंवा खाऊन टाकावें लागतें. हिंदुस्थानात बकऱ्याचा खाण्याकडे च उपयोग होत आहे. तेव्हा बकऱ्याचें कातडें व्यर्थ का जाऊं द्यावें ? मी सुरवातीला च सांगितलें आहे कीं आज आपली अहिंसा मनुष्यापुरती मर्यादित आहे. आणि आज मनुष्यजाति आपसांत च लढत आहे. आपल्या अहिंसेचा विकास झाल्यावर ती प्राणिमात्राला व्याप्त करूं शकेल. जगातील अनेक देशात लोक आज गाईचें दूध पीत आहेत, परंतु बैलाचा मात्र ते खाण्याकडे च उपयोग करतात. आणि गाईला देखील सुकली म्हणजे कत्तलखान्यात रवाना करतात. हिंदुस्थानात हि अशा प्रकारें लाखो गाईंची कत्तल होते. म्हणून च आम्ही आधीं गाईला वांचविण्याचा प्रयत्न करीत आहों. बकरीला वांचविण्याचें काम पुढें येणाऱ्या पिढ्यांकरिता ठेवलें आहे. सर्व काम एका च पिढीत कसें होऊं शकेल ? आज आम्ही गाय वाचविली तर पुढे तुम्ही च बकरी वाचविण्याचा विचार कराल. उपयोगाशिवाय प्राण्याला केवळ भूतदयेच्या नावावर जगविणें कठिण आहे. आज गाय आणि बैल यांचा च पूर्ण उपयोग आपण करूं शकतों.

प्रश्न १२— हें अहिंसेपासून दूर जाणें नव्हे का ?

उत्तर— ते कसें ? आज हिंदुस्थानांत गाय आणि बकरी या दोहोंची कत्तल होत आहे. बळि देणें बंद केलें तरी बकऱ्यांचें मांस कोण थांबवणार नाहीं. परंतु हिंदुधर्मानें गोभक्षण मात्र सोडलें आहे. आणि ह्यामुळें च गाय-बैलाला वांचविण्याचा प्रयत्न आम्ही करीत आहोत. हा केवळ प्रारंभ आहे. नदीच्या उगमाप्रमाणें हें देखील अहिंसेचें उगम-स्थान आहे. आणि म्हणून च ते लहान आहे. तसें पाहिल्यास पूर्ण अहिंसक जीवन अशक्य च म्हणावें लागेल. खाण्यापिण्यांत च नव्हे तर श्वास घेण्यांत देखील हिंसा होते आणि म्हणून हिंदु-धर्मानें त्याला युक्ति संगत रूप दिलें आणि म्हटलें कीं शरीराचा च त्याग करा. म्हणजे शरीराची आसक्ति सोडून द्या. ही च मुक्ति आहे. अहिंसेच्याद्वारें च समाज मुक्तीकडे प्रगति करूं शकेल. ह्या दिशेनें हिंदुस्थानाइतकी दुसऱ्या देशानें मजल मारलेली नाहीं.

प्रश्न १३—इथे गोपुरीत चरखे बनविण्याकरिता यंत्राचा हि उपयोग करण्यात येत आहे, तो का ?

उत्तर— यंत्राचा आम्हाला तिरस्कार करावयाचा नाहीं यंत्रें तीन प्रकारची असतात एक यंत्र मारक असतें त्याची आम्हाला गरज नाहीं दुसरें पूरक असतें, त्याची मदद आपण घेऊं शकतो तिसरें मनुष्य-शक्तीला सो देणारें असतें, त्याचा हि आम्ही स्वीकार करूं शकत नाहीं पाचश वर्षांनंतर आम्हाला पुन्हा ह्याचा विचार करावा लागेल म्हणजे प्रत्येक वेळीं आपणाला सारासार विचारानें काम घ्यावें लागेल वीज खेड्याला देता आली तर मी अवश्य देईन परंतु शर्त ही असेल कीं त्यामुळें मनुष्य बळ आणि पशुबळ बेकार होता कामा नये आपण रेल्वेचा आणि छापखान्याचा उपयोग करीत नाहीं का ? बनारसहून तुम्ही आगगाडीनें आला, ते ठीक आहे परंतु येथें सेवाग्रामला किंवा पौनारला जाण्याकरिता तुम्ही मोटारीचा उपयोग न करता पायीं गेलें पाहिजे, असें मी म्हणेन ग्रामोद्योग-संघातील लोकांशीं या बाबतीत मी चर्चा केलेली नाहीं, परंतु आपणाला पल्प बनवून देता आला तर खेड्यात घरोघर कागद तयार होऊं शकेल. असा पल्प यंत्रानें देखील बनविता येईल आपल्या बैलाना पुरेसें काम असेल व ते बेकार होणार नसतील तर आवश्यकतेनुसार यंत्र-शक्तीची मदत घ्यायला हरकत नाहीं याचा च अर्थ यंत्राचा आम्ही द्वेष करीत नाहीं. आजच्या परिस्थितींत यंत्राचें स्थान कितपत आहे, कोठें आहे, आणि कोठें नाहीं, ह्या बाबतींत सारासार विचारानें काम घेतलें पाहिजे

प्रश्न १४— लोक हिंसेकडे का जातात ?

उत्तर— परिश्रम न करता दुसऱ्याचा फायदा घ्यावा अशी मनुष्याची वृत्ति आहे परंतु तरी देखील प्रकृतींत मात्र प्रेम च भरलेलें आहे पाडल्या करड्यावर लहानसा डाग देखील मोठा आणि खराब दिसतो इतकी मोठी लढाई पाच वर्षें चालली होती, तरी पण बहुसंख्य लोक शांतिपूर्वक जीवन व्यतीत करीत होते लढणाऱ्यांची संख्या त्याच्या पुढें अगदीं च कमी होती, लढाई मनुष्य-स्वभावाच्या विरुद्ध आहे म्हणून च ती वारंवार लक्ष वेधते, कम्युनिस्ट कधीं मला असा प्रश्न विचारीत च नाहींत. कारण त्यांच्या कल्पनेंत

शेवटीं राज्य देखील राहणारें नाही. मनुष्य-स्वभाव चांगला च आहे. हिंसा ही मात्र कृत्रिम आहे. हें आम्हांला मान्य केलें पाहिजे.

**प्रश्न १५—** इतर लोकांच्या किंवा देशांच्या तुलनेंत हिंदुस्थानांत *अहिंसा जास्त कां दिसते ?*

**उत्तर—** हिंदुस्थानच्या लोकांची दुसऱ्या लोकांबरोबर तुलना करणें कठिण आहे. असें असले तरी दुसऱ्या देशांतील लोकांची देखील हिंसेपेक्षां अहिंसेकडे च जास्त प्रवृत्ति आहे. तसें नसतें तर कुटुंब व्यवस्था त्यांच्यात निर्माण च झाली नसती पशूंत कुटुंब-व्यवस्था नाहीं. मांसाहारांतून अन्नाहाराकडे जाणारा मनुष्य अहिंसेच्या दिशेनें च जात नाहीं का ? विझण्या आधीं दिवा जसा मोठा होतो तसा च हा ॲटम बॉम्ब देखील हिंसेच्या विझण्याच्या आधींचें चिह्न आहे. आणि म्हणून च मी म्हणतों कीं विज्ञान खूप वाढवा. कारण विज्ञान म्हणतें कीं एकतर मला वाढवा किंवा हिंसेला वाढवा. तुम्ही आम्हा दोघांना बरोबर च वाढवूं शकत नाहीं. कारण आम्ही दोघें मिळून तुमचा पूर्ण नाश करूं. तेव्हां आम्हांला विज्ञान पसंत असेल तर हिंसेला सोडावें च लागेल आणि आपण प्रगति चाहतों म्हणून विज्ञान तर सोडूं शकत नाहीं, तेव्हां मग हिंसेला च सोडणें भाग आहे.

( खादी जगत्‌ आगस्ट १९४६ )

: ६ :

## नकली तूप*

नकली तुपासंबंधानें जनतेच्या हिताचा पक्ष प्रतिपादणारी ही पत्रिका योग्य वेळीं प्रकाशित होत आहे. नकली तुपांत तुपाचे कोणते च गुण नाहींत. रूप आणि रंग तुपासारखा असल्यामुळें तुपापेक्षां कमी दाम देऊन आपण जणूं तूप च खात आहोंत असा आनंद गिऱ्हाइकांना, आणि तुपाची नक्कल करून गिऱ्हाइकांकडून भरपूर पैसा लुटण्याची संधी भांडवलवाल्यांना यानें दिली आहे. वाघाचें चामडें पांघरलेल्या गाढवाची गोष्ट लहानपणीं आम्हीं इसापनीतींत वाचली होती. परंतु ती कल्पित कथा होती, ही सत्यकथा आहे.

तुपाच्या उपयुक्ततेसंबंधींचा आमचा हजारों वर्षांचा अनुभव "आयुर् वै घृतं" या वैद्यक शब्दांत आयुर्वेदानें मांडला आहे. 'वनस्पती'द्वारा तशी च जीवनदायी शक्ति जनतेला देऊं करून तिला तेलाच्या आपत्तींतून सोडविण्याचा दावा नकली घीं वाले करूं लागले च आहेत. तुपांत जी जीवनदायी शक्ति आहे ती नकली तुपांत मुळीं च नाहीं, या विषयीं कोणाला हि शंका नाहीं. कित्येक शास्त्रज्ञांनी आपलें तसें मत स्पष्ट शब्दांत जाहीर केलें आहे. याच्या उलट जीवन-हानि करणारीं तत्त्वें नकली तुपांत आहेत असें हि सांगण्यांत आलें आहे. त्याचें खंडन करण्याची खटपट भांडवलवाल्यांनीं

---

* गो सेवा-संघानें प्रकाशित केलेल्या 'नकली घी' नावाच्या पुस्तिकेला लिहिलेली प्रस्तावना.

चालविली आहे त्या कामीं वैज्ञानिकांची मदत मिळविण्याचा हि त्यांचा इरादा आहे. संभव आहे, ती त्यांना मिळेल हि, आणि नकली घी गुणवान् सिद्ध होईल. कारण 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते' हा जुना च अनुभव आहे.

आहारांत प्राणिजन्य वस्तु मुळीं च नसावी या विचारानें कांहीं वर्षांपूर्वी मीं दोन वेळा सतत दोन तीन वर्षे पर्यंत दूध तूप आदि वर्ज्य करून पाहिलें होतें. त्या प्रयोगांत कोकोजेमचा उपयोग पूर्वग्रहरहित बुद्धीनें जवळ जवळ चार महिनें पर्यंत केला. प्रयोग सफल झाल्यास सार्‍या आश्रमाला तो लागू करण्याचा हि विचार होता. तो जर सफल झाला असता तर मी कोकोजेमचा उत्तम प्रचारक बनलों असतों, परंतु मला त्या निर्जीव वस्तूपासून यत्किंचित हि लाभ झाला नाहीं. उलट कांहीं दिवसांनंतर बैलघाणीच्या ताज्या जवसाच्या तेलाचा खूप उपयोग करून पाहिला आणि त्यानें मला बरा च लाभ झाला. आमच्या येथें अनेकांनीं तें पाहिलें आहे. इतकें च नाही तर दुसर्‍या हि अनेक मित्रांनीं तो प्रयोग करून पाहिला आणि त्यांना हि तसा च लाभ झाला. या प्रांतांत जवसाचे तेल अनायासें मिळतें म्हणून प्रयोगासाठीं तें घेतलें. तिळाच्या किंवा खोबर्‍याच्या ताज्या तेलांत हि ती च शक्ति असल्याचें आढळून येईल.

हा अनुभव या ठिकाणीं एवढ्यासाठीं दिला आहे की बनावटी "वनस्पती" मध्यें तुपासारखें जीवन तर नाहीं च नाहीं, पण बैलघाणीच्या ताज्या तेलाची बरोबरी देखील तें करूं शकत नाही, हा मुद्दा चांगला लक्षांत यावा. तेल म्हणें ही एक आपत्ति आहे, आणि तींतून जनतेचा उद्धार करायचा आहे असल्यासारख्या दंभयुक्त भाषेचा उपयोग करणारे बैलघाणीच्या ताज्या तेलाशीं तुलना च करीत नाहीत. तशी ती केली तर नकली तुपाच्या प्रचारानें 'तेल गेलें तूप गेलें, धुपाटणें हातीं आलें' अशी स्थिति आमच्या जनतेची होईल याचा प्रत्यय येईल.

नकली तुपाच्या माहात्म्यानें हिंदुस्थानभर व्यापारी भेसळ चालली आहे, आणि त्यानें जनतेची पोषणहानि, धनहानि, आणि सत्यहानि होऊन राहिली आहे. म्हणून आज चालणार्‍या किंवा नजीकच्या भविष्यकाळांत चालविल्या

जाणाऱ्या कारखान्यांतील यंत्रांचें काय होईल ही चिंता सोडून नकली तुपाला कायद्यानें एकदम बंदी घालावी, आणि त्या यंत्रांचा काय उपयोग करतां येईल याचा मागाहून सावकाश विचार करावा या निर्णयावर आल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आमचें स्वराज्य-सरकार याकडे तीव्रतेनें आणि त्वरित लक्ष देईल अशी मी आशा राखतों.

: ७ :

## वाणीचा सदुपयोग

वाणी ही माणसाला देवाची एक मोठी देणगी आहे. माणसाच्या चिंतनाचें ते फलित आहे, आणि त्याच्या चिंतनाचें साधन हि तें च आहे. चिंतनाशिवाय वाणी नाहीं वाणी शिवाय चिंतन नाहीं. दोहों शिवाय माणूस नाहीं.

माणसाच्या जीवनाचें समाधान समतोल वाणीच्या संयमावर आणि सदुपयोगावर अवलंबून आहे. माणसाचीं सारीं चिंतन शास्त्रें वाणीवर उभारलेलीं आहेत. दर्शनाची सारी धडपड विचार वाणींत नीट मांडण्यासाठीं आहे. वाणी हे विचाराचें शरीर च आहे. अमुक एक विचार अमुक एका शब्दांत च नेमका मावतो, म्हणून खोल विचार करणारे नेमकी वाणी शोधीत असतात.

पतंजलीची अशी कहाणी सांगतात कीं त्यानें चित्त-शुद्धीसाठीं योग-सूत्रें लिहिलीं, शरीर शुद्धीसाठीं वैद्यक लिहिलें, आणि वाक्-शुद्धीसाठीं व्याकरण-महाभाष्य लिहिलें. हीं तिन्ही लिहिणारा पतंजलि एक च होता, कीं वेगवेगळे होते, हा ऐतिहासिक मुद्दा आपण सोडून देऊं, पण वाणीची शुद्धि हें व्याकरणाचें उद्दिष्ट मानलें गेलें आहे ही महत्त्वाची गोष्ट आहे.

भक्ति-मार्गांत वाणीनें हरिनाम घेत जावें, ही मुख्य शिकवण असते. देह संसारांत वागत असला तरी वाणींत संसार भरूं नये. वाणीचा खोल संस्कार मनावर उमटत असतो. एखादें सुंदर भजन ऐकून निजावें तर सकाळीं उठल्या बरोबर सहजगत्या तें च आठवतें. इतका तो नाद झोपेंत हि मनांत घुमत असतो. तुलसीदासजींनीं म्हटलें आहे, "आंतील आत्मा आणि बाहेरील जग या दोन्हींच्या मधील हा उंबरठा आहे. जर आंत आणि बाहेर दोहींकडे तुला

उजेड हवा असेल तर उंबरठ्यावर रामनाम-रूपी विन तेलावातीचा मणि-दीप ठेवून दे."

धार्मिकांनीं पहिला आदेश " सत्यं वद " हा दिला. सारे व्यवहार वाणीवर अवलंबून. ती वाणी च ज्यानें चोरली, त्यानें सर्व चोरी एकदम च केली; असा मनूचा यावर खुलासा आहे. "सत्य, पूर्ण सत्य, केवळ सत्य" अशी कायद्याची हि घोषणा आहे.

वाणीनें सख्य साधतां येतें, वाणीनें वैर बांधतां येतें. वाणीचें वैर जितकें टिकतें, तितकें शस्त्रांचें हि टिकत नाहीं. म्हणून सर्व विश्वाशीं मैत्री करूं इच्छिणाऱ्या विश्वामित्राची प्रार्थना आहे–"अमृतं मे आसन्" माझ्या वाणींत अमृत असावें. पण कळकळीचीं माणसें कटु बोलतात, असा आजचा अनुभव आहे. वास्तविक उतावळीं माणसें कटु बोलत असतात. कळकळीच्या माणसांना अक्कल नसली म्हणजे तीं उतावळीं बनतात, आणि कटु बोलूं लागतात. अक्कल असली तर मित मधुर बोलतात आणि कामाला लागतात.

मधुर हें सत्याचें अनुपान आहे, आणि मित हें त्याचें पथ्य आहे. जिला आम्ही नेमकी वाणी म्हणतों ती मित मधुर आणि सत्य मिळून बनलेली असते आणि ती च परिणामकारक होते. समाजाचें हित यांत आहे तें समजणें एखादे वेळेस जड जाईल. पण नेमक्या वाणीनें च तें साधेल हें समजणें जड जाऊं नये.

पण आज तें च जड जाऊन राहिलें आहे. समाजाच्या हिताच्या नांवानें कार्यकर्त्यांची वाणी दूषित झालेली आहे. अर्थात् मन च दूषित झालें आहे. मग कृति कोठून भूषित होणार ?

लेखनाचीं आणि भाषणाचीं साधनें आज सुलभतम झालीं आहेत. पण म्हणून च कीं काय, सम्यग्वाणी दुर्लभ झाली आहे. सम्यग्वाणी गमावून सुलभ साधनें कमावणें म्हणजे, कवीच्या भाषेंत, नेत्र विकून चित्र खरेदण्या सारखें आहे. सुलभतम साधनें संपादन करणें एवढा च मानवाचा महिमा नाहीं. सुलभतम साधन संपादून त्यांचा कुशलतम उपयोग करणें यांत मानवाची महत्ता आहे.

( मराठी हरिजन, ता. ३० मार्च १९४७)

: ८ :

## व्यवस्थापकांनो, कृपा करून चालते व्हा ! *

माझा आज व्याख्यान देण्यासाठीं येण्याचा इरादा नव्हता. जे गृहस्थ पहिल्याने मजकडे आले त्यांना मीं परत हि लावलें. ते म्हणाले, अमुक अमुक सज्जन आले व त्यांनीं आम्हाला अमुक अमुक विषय समजावून सांगितले. पण मी विचार केला कीं जर इतके लोक येऊन गेले च आहेत, तर आपण जाण्याची जरूर नाहीं. म्हणजे ज्या कारणासाठीं ते गृहस्थ मला येण्यास सांगत होते, ते च कारण माझ्या दृष्टीनें न येण्याचें होतें. पण गोपाळरावांनीं फार आग्रह केला म्हणून मी आलो.

मी न येण्याचें दुसरें हि एक कारण होतें. आजकाल जितकीं तोंडें तितके विचार बोलले जातात. मतभेदांचा बाजार भरल्यासारखा आहे. अशा स्थितींत इतक्या लोकांनीं आपलीं मतें मांडल्यानंतर मी आणखी आपलें एक मत मांडणें म्हणजे, कदाचित्, तुमच्या बुद्धीला ज्यास्त भ्रमांत टाकण्यासारखें झालें असतें. गीतेंत भगवंतांनीं अर्जुनाला म्हटलें कीं फार ऐकून ऐकून तुझी बुद्धि भ्रमांत पडली आहे; ह्या भ्रमजालांतून ती निघेल तेव्हां च तुला खरें ज्ञान होईल. तुमच्याकडे आतांपर्यंत दहा लोक आले असतील तर अकरावा मी येऊन कदाचित् तुम्हांला ज्यास्त च घोटाळ्यांत टाकीन. पण आग्रहामुळें मला यावें लागलें.

जवाहरलालजी पुन्हांदां सध्यांच्या सरकारवर कडक टीका करीत असतात. ते म्हणतात, " ह्या सरकारचा कारभार इतका अव्यवस्थित व कुच-

* ता. २५ मे १९४२ रोजीं वर्धाला राष्ट्रीय युवक संघाच्या शिबिरांत राष्ट्रीय युवक संघ, काँग्रेस सेवादल आणि प्रांतीय संरक्षक दल ह्यांच्यापुढें केलेलें भाषण.

कामाचा आहे वा त्यापेक्षा ज्यास्त कुचकामाचा कारभार असू च शकणार नाही ह्या सरकारच्या नालायकीला अंत नाही " त्याची टीका मला पूर्ण मान्य आहे पण माझ्या मते हिंदुस्थान सरकारची च ही स्थिति नाही, तर दुनियेंतील सर्व सरकारांची स्थिति ही च आहे पण हिंदुस्थान सरकारचा एक विशेष आहे त्यानें येथील प्रजेला नि शस्त्र करून ठेवले आहे म्हणून ते निश्चित होऊन मोठ्या आरामान राज्य करीत होते आता समोर सक्त दुश्‍त म्हणून उभे राहिलें आहे त्याचा सामना करण्याची बुद्धि किंवा शक्ति आमच्या सरकारात नाहीं पण हें आमच्या सरकारचें वैशिष्ट्य झालें आज जगातलीं सर्व च सरकारें कुचकामाचीं ठरलीं आहेत त्याचें एक कारण आहे ते तुम्ही लक्षात घेतलें पाहिजे

यंत्राची क्षमता जसजशी वाढते तसतशी बुद्धिची क्षमता कमी होते त्यामुळे जिकडे पहावें तिकडे अव्यवस्थेचें साम्राज्य पसरलेलें आहे अमेरिके मारखें प्रतापी रा ट युद्धात पडलें तेव्हापासून युद्धाचा सर्व कारभार त्याच्या म—यान चालला आहे अमेरिका म्हणते, " या चोवीस हजार मैल लांब रुंद दुनियेचा व्यवहार आम्ही चालवू आमच्या सल्ल्यानें इकडचें सामान तिकडे जाईल युरोपचा उद्धार आमच्या हातून होईल हिंदुस्थानचें रक्षण आम्ही करू आस्ट्रेलियाला मदत आम्ही करू अमेरिकेच्या तर्फे तिचे अध्यक्ष रुझवेल्ट असे बोलत आहेत जो सर्वात बुद्धिमान असतो तो च अध्यक्ष निवडला जातो अस नाहीं जु या काळीं राजाचा मुलगा राजा होई नशिबानें कधीं कधीं तो बुद्धि-मान निघे त्याच प्रमाणे आज हि निवडलेल्या माणसातून नशिबानें च कोणी ज्यास्त बुद्धिमान् निघतो बहुधा निवडलेला मनुष्य ज्यास्त बुद्धिमान नसायचा च ज्याच्यात बुद्धि कमी पण अहंकाराचे प्रमाण ज्यास्त, ते च बहुधा निवडले जातात कारण, ते च असल्या व्यवहारात पडतात बुद्धिमान् लोक तर दूर दूर च राहतात कारण, दुनियेवर कमीत कमी सत्ता गाजविण्यात ते खरी बुद्धिमत्ता मानतात आणि म्हणून, आपल्या ह्या निष्ठेला अनुसरून, ते राजकारणात कमीत कमी दखलंदाजी करतात त्यामुळे बहुधा लोकांचे जे पुढारी बनतात ते बुद्धीनें श्रेष्ठ नसतात त्या देशातल्या सामान्य जनतेपेक्षा कदाचित् त्याची बुद्धि कमी नसेल कदाचित् थोडी ज्यास्त हि असेल तरी तेवढ्यावरून ते बुद्धिमान् ठरत नाहींत

ह्याखेरीज दुसरी गोष्ट अशी कीं विचारलेल्या प्रश्नांना त्यांना ताबडतोब जबाब द्यावे लागतात. ताबडतोब जबाब देण्याची साधनें फार वाढलीं आहेत. पांचदहा मिनिटांत सर्व जगाच्या कारभाराबद्दल सल्ला देणें, ही कांहीं चेष्टा नव्हे. पण बिचारे करतात काय? सुचेल तसें उत्तर देऊन मोकळे होतात. म्हणून मी म्हणतो, कारभार बुद्धिनें चालत नाहीं, सर्व नशिबाचा खेळ आहे.

म्हणून, अमेरिका युद्धांत पडली तेव्हांपासून माझी खात्री झाली आहे, कीं *आतां हे युद्ध मानवाच्या हातांत राहिलेलें नसून मानव च युद्धाच्या* ताब्यांत गेला आहे. जावा व मलाया येथें जेव्हां ह्यांची मति कुंठित झाली व हे गांगरून गेले, तेव्हां सामान्य मनुष्याला हि अशी शंका येऊं लागली कीं एवढ्या मोठ्या साम्राज्याचा कारभार चालविणारांचें डोकें इतकें पोकळ कसें व त्यांच्यांत व्यवस्था-शक्ति इतकी कमी कशी? सिंगापूर व ब्रह्मदेशांत तर ह्यांची आणखी च दुर्दशा झाली.

ते म्हणूं शकतात कीं "तुम्ही लढाईपासून दूर दूर राहतां म्हणून अशा गोष्टी करता. आम्हांला जसें सुचतें तसें आम्ही करतों. तुम्ही आमच्या जागीं असतां व इतकी मोठी जबाबदारी तुमच्या शिरावर असती, तर तुम्ही आमच्यापेक्षां हि ज्यास्त भयंकर घोडचुका केल्या असत्या." मी कबूल करतों कीं आम्हीं पुष्कळ चुका केल्या असत्या. पण मी विचारतों कीं ही जबाबदारी तुमच्या डोक्यावर लादली कोणी? ते म्हणतात, "इतिहासानें". आधीं ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाली. ह्या देशाशीं व्यापार झाला. क्लाइव्हनें साम्राज्याचा पाया घातला व वॉरेन हेस्टिंग्जनें सनदशीर राज्यकारभार सुरू केला. अशा प्रकारें इतिहासानें ही जबाबदारी आमच्या शिरावर दिली आहे. आम्ही म्हणतों, "तुम्ही इतक्या लांबून जसे येऊं शकतां, तसे जाऊं हि शकत नाहीं काय? इतिहासाचीं पृष्ठें तुम्हांला जाण्यास मनाई करतात काय? येण्याचा जसा इतिहास बनला, तसा जाण्याचा हि इतिहास बनूं शकतो. येण्याचा इतिहास घाणेरडा व भयंकर आहे. परत जाण्याचा इतिहास उज्ज्वल आणि उदात्त बनेल. त्यांत सौंदर्य आणि नैतिकता असेल. तुम्ही ऐतिहासिक जबाबदारीच्या ओझ्याखालीं उगा च कां दडपले जात आहांत?" इतर राष्ट्रें हि ह्या च ऐतिहासिक जबाबदारीच्या भ्रमजालांत गुरफटलीं आहेत. त्यांना माहीत नाहीं कि शेवटीं इतिहास मान-

याची च कृति आहे. इतिहास आम्हांला घडवितो हें कांहीं अंशीं खरें असलें, तरी आम्ही इतिहास बनवितो हें हि तितकें च खरें आहे.

व्यवस्थापक-वर्ग म्हणतो, व्यवस्था करण्यासाठीं आमची आवश्यकता आहे. आम्ही विचारतों, आमच्या कोणत्या गरजा तुम्ही भागवितां ? आम्हांला भूक लागते. परमेश्वरानें दिलेल्या जमिनींत आम्ही शेती करतों. व्यवस्थापक वर्ग कांहीं शेती करीत नाहीं. शेती करून पीक काढण्याची कला परमेश्वराच्या कृपेनें आणि दहा लाख वर्षांच्या अनुभवानें आम्हांला प्राप्त झाली आहे. म्हणून भूक शमविण्याच्या कामीं तुमची कांहीं च आवश्यकता नाहीं. तहान भागविण्याच्या कामीं हि तुमची गरज भासत नाहीं. पाऊस पडतो, जलाशयांत पाणी भरतें. अशा प्रकारें जमीनींतून अन्न आणि आकाशांतून पाणी मिळतें. आतां राहिली हवा. तिच्यासाठीं हि व्यवस्थेची गरज नाहीं. परमात्म्यानें प्रत्येकाला एक एक नाक दिलें आहे. दहा जणांना मिळून एक नाक दिलें नाहीं. एकानें नाकांत हवा सांठवावी आणि ती दहा जणांना वांटावी, असें कांहीं घडत नाहीं. आपापसांतल्या व्यवहाराची हि गोष्ट अशी च आहे. लग्न करून कुटुंब-संस्था बनविण्यास आम्हांला नीतिशास्त्रानें शिकविलें आणि शेजाऱ्यावर प्रेम करण्यास संतांनीं शिकविलें.

अशा रीतीनें जीवनाचीं सगळीं कार्यें व्यवस्थापक वर्गाच्या मदती-शिवाय चालू शकतात. तेव्हां व्यवस्थापक-वर्ग म्हणतो, "आम्ही तुम्हांला शिक्षण देतों, तुमचें संरक्षण करतों आणि मालाची ने-आण करतों."

ह्या कार्यासाठीं हि आम्हांला व्यवस्थापक-वर्गाची जरूर नाहीं. मूल कांहीं आकाशांतून पडत नाहीं. तें बिन-आईबापाचें तर नसतें. जन्मतां च आईच्या स्तनांत त्याच्यासाठीं दूध तयार होतें. अशा तऱ्हेनें आईकडून त्याचें संरक्षण होतें. आई च त्याला मातृभाषा शिकविते. अशा प्रकारें त्याला शिक्षण मिळतें. आणि त्याचें संरक्षण होतें. शिकण्यासाठीं त्याला तिसऱ्याच्या हातीं सोंपविण्याचा प्रश्न च कसा उद्भवतो ? पण मूल जर आईबापाशिवाय च जन्माला आलें असतें, तर मात्र हा प्रश्न कठिन होऊन बसला असता ! मुलाला आई-बापांकडून जें शिक्षण मिळतें, त्यापेक्षां अधिक चांगलें शिक्षण त्याला

कोठून मिळणार ? उत्तम शिक्षण कोणाला मिळालें, त्याचें वर्णन उपनिषदांत आहे. "मातृमान पितृमान् आचार्यवान्" ज्याला, आई बाप आणि आचार्य आहेत त्यानें उत्तम शिक्षण मिळविलें आहे. पहिल्या दोन गोष्टी व्यवस्थापकांकडून मिळत नाहींत. समाजांत ज्ञानी पुरुषाचें किंवा गुरुचें असणें राज्यव्यवस्थेवर अवलंबून नाहीं. अकबराचें राज्य होतें म्हणून तुलसीदास झाले, असें नाहीं. खरे ज्ञानी स्वयंभू असतात. ते सृष्टींतून ज्ञान ग्रहण करतात. ते शिक्षण-संस्थांत शिक्षण घेत नाहींत, ईश्वराच्या कृपेनें ज्ञानी बनतात. खुद्द शिक्षणशास्त्रज्ञ हि कबूल करतात कीं खरे ज्ञानी शिक्षण-संस्थांतून निघत नाहींत. जितके जितके नवे प्रयोग झाले, तितके तितके सरकारी क्षेत्राच्या बाहेर झाले. पेस्टॉलॉजी, फ्रोबेल, मॉंटेसरी इत्यादि लोकांचे प्रयोग सरकार मार्फत झालेले नाहींत.

तेव्हां अखेर ते म्हणतात, "आम्ही तुमचें रक्षण करतों". कोणापासून रक्षण करतां ? "परकी आक्रमणापासून ?" पण आमच्यावर परकी आक्रमणाचें हें भूत व्यवस्थापकांनीं च निर्माण केलेलें आहे. ते दूर होतील तर तें आपोआप नाहींसें होईल. कोणत्या हि देशाची जनता दुसऱ्या देशाच्या जनतेवर हल्ला थोडी च करणार आहे ? जपानचे शेतकरी हिन्दुस्थानवर हल्ला करण्यास थोडे च येणार आहेत ? आज आम्ही ऐकतों कीं अमेरिकेची सव्वा दोन लाख माणसें येथें आलीं आहेत. सैन्यांत भरती करून त्यांना येथें आणण्यांत आलेलें आहे कारण, अमेरिकेच्या रक्षणाची एक आघाडी (फ्रंट) हिन्दुस्थान हि आहे. आज सर्व जग फ्रंट बनलें आहे. ह्या फ्रटला कांहीं सीमा आहे का ? ज्योतिःशास्त्राच्या मतें कधीं कधीं पृथ्वी हि मंगळाच्या कक्षेंत येते. त्यावेळीं ह्या दोन ग्रहांची टक्कर होण्याची भीति असते. ह्या दृष्टीनें अवघें त्रिभुवन च आमची आघाडी आहे. ह्याला इलाज काय ? इलाज एक च आहे व तो हा कीं प्रत्येकानें आपल्या जागीं शांतपणें बसून काम करावें व कोणाला हि भिऊं नये. आपल्या कक्षेच्या बाहेर कोणी जाण्याचें कारण च नाहीं. रक्षणाचा सर्वोत्तम उपाय हा च आहे.

आमचें रक्षण करण्याच्या मिषानें ते फौज ठेवीत असतात. परक्यांची चढाई तर कधीं काळीं होत असते. परंतु सैन्याचा उपयोग सामान्यतः

आपल्यावर दडपशाही करण्यासाठीं होत असते. आम्ही म्हणतों, आपण आमच्यापेक्षां अधिक बुद्धिमान आहांत. म्हणून च तर आमचे व्यवस्थापक बनलांत. जर आम्हीं तुमचें ऐकलें नाहीं, तर तुम्ही आम्हांला समजावा. त्याच्यासाठीं सैन्याची काय आवश्यकता आहे?

शिक्षक जर विद्यार्थ्यांपेक्षां अधिक बुद्धिमान आहे, तर बुद्धिहीन मुलांना आपलें म्हणणें समजावून देण्यासाठीं तो आपल्या पाशीं एखादा शिपाई ठेवील काय? परंतु वस्तुस्थिति मात्र अशी च आहे. तो आपल्यापाशीं एक निर्जीव शिपाई—एक छडी—बाळगतो. बुद्धिमान् शिक्षकानें आपल्या मुलांशीं संबंध ठेवण्यासाठीं निर्बुद्ध आणि निर्जीव छडीचा उपयोग करणें कितपत योग्य ठरतें? परंतु प्रत्येक वर्गांत तिचा भरपूर उपयोग होत असतो. जेवणांत जर थोडेसें तिखट असेल तर जेवण लवकर पचतें, असें म्हणतात. त्याप्रमाणें छडीच्या मदतीनें दिलेलें शिक्षण लवकर डोक्यांत उतरतें, अशा प्रकारचीं प्रमेयें मांडून शिक्षणशास्त्रांतील छडीचें आणि राज्यशास्त्रांतील लष्कराचें समर्थन केलें जातें, ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे.

व्यवस्थापक वर्ग जर बुद्धिमान् असेल, तर समाजांत जे दोन-चार दुसरे बुद्धिमान् लोक असतील, त्यांना ओळखण्याइतकी तरी अक्कल त्याच्या ठिकाणीं असली पाहिजे. तो त्यांना आणि त्यांच्या द्वारा समाजाला समजाविण्याचा प्रयत्न करील. एकदा सांगून समजलें नाहीं तर पुन्हां समजावील. वरचेवर समजावून हि जर डोक्यांत शिरलें नाहीं, तर वाट पाहील. सबूरी ही देखील कांहीं चीज आहे ना? लोकांना जितकें समजेल तितकी च व्यवस्था करील.

परंतु आमचे व्यवस्थापक समजावण्याचा प्रयत्न च करीत नाहींत. त्यांचा मार्ग दंडेलीचा आहे. म्हणून त्यांना लष्कराची आवश्यकता भासते. यावरून असें स्पष्ट होतें कीं ह्या व्यवस्थापकांची व्यवस्था लोकांना मान्य नाहीं.

आमच्या व्यवस्थापकांनीं आतां तावडतोब निघून गेलें पाहिजे. आम्ही हि अनुभवानें व्यवस्थेचे कांहीं सिद्धांत शिकलों आहोंत. आमच्या व्यवस्थापकांनीं जितकी अव्यवस्था माजविली आहे, तितकी आमच्या कृत्यांनीं माजणार नाहीं, इतकें ज्ञान आम्हांला आहे. आम्ही आमची व्यवस्था करून

घेऊं हें सर्व अगदीं स्पष्टपणें सांगण्याचा प्रसंग आज च आला आहे किमान हिन्दुस्थानने तसें सांगण्याचा तर आला च आहे जगातील इतर राष्ट्रांनीं सांगण्याचा हि आला आहे परंतु तीं तसें ठरवितील तेव्हां ठरवितील

परंतु असा प्रश्न विचारण्यात येतो कीं, जर इंग्रज येथून निघून गेले, तर हिंदुस्थान जपान्याच्या हल्ल्यासमोर टिकू शकणार नाहीं मी म्हणतो टिकू शकेल परंतु जपान हल्ला करील च का ? जपान तर इंग्लंडचा शिष्य बनत आहे साम्राज्यवादाचा गुरु तर इंग्लंड आहे आज ब्रिटिश लोक म्हणतात कीं आम्ही साम्राज्यवाद मानीत नाहीं इंग्लंडने अशी प्रतिज्ञा केली होती कीं, १९४२ पर्यंत च आम्ही साम्राज्यवादी राहू आणि नंतर त्याला टाकून देऊ ? हा विचार आज च का सुचला ? मलाया आणि सिंगापूर ह्यामध्यें जो अनुभव आला, त्याचा हा परिणाम आहे मलायात त्यांना दिसून आलें कीं तेथले लोक त्यांना काहीं च मदत करीत नाहींत जपान्यांना मिळतात इतके दूर दूरचे देश सांभाळणें कठिण होऊन जातें त्यामुळे आता हे म्हणू लागले आहेत साम्राज्यवादाचे दिवस सरले म्हणून परंतु जपान म्हणते, या बाबतींत हि मुन्रो डॉक्ट्रीन लागू मुन्रो डॉक्ट्रीन म्हणजे लुटण्याचा स्वदेशी धर्म. जपानला तो एक चांगला आधार मिळाला आहे तें म्हणतें, कोठं मलाया आणि कोठं इंग्लंड ? लुटण्यासाठीं इतकें दूर जाणें योग्य नाहीं येथपर्यंत च त्याचा स्वदेशी धर्म येऊन पोहचला आहे

मलायात जो अनुभव आला तोच ब्रम्हदेशात हि येत आहे- हिंदुस्थानात हि तोच अनुभव येईल, अशी भीति वाटत आहे आता त्यांना इंग्लंडच्या रक्षणाची काळजी लागून राहिली आहे हिंदुस्थानला वाचविण्याची शक्ति आता आपल्यात राहिलेली नाहीं, अशी त्यांची खात्री होऊन चुकली आहे बिचारे वेव्हेल साहेब अगदीं स्पष्टपणें सांगत आहेत कीं, हिंदुस्थानचा किनारा इतका मोठा आहे कीं आम्ही त्याचें रक्षण करू शकणार नाहीं हिंदु-स्थानच्या जनतेकडून हि काहीं आशा करता येत नाहीं कारण, आम्हीं त्याच्याशीं फार गैरवर्तन केलें आहे

कोणते च साम्राज्य अनादि अनंत नाहीं परंतु साम्राज्यवादाचा हा स्वभाव आहे कीं तो आपली प्रतिमा, आपल्या च आकाराची आणि आपल्या च सारखी दुसरी विरोधी शक्ति, उत्पन्न करून भरत असतो एका साम्राज्याची संतति दुसरें साम्राज्य असतें त्यानंतर तिसरं साम्राज्य येतं अशा रीतीनें साम्राज्यवाद बहुसंतानशाली आहे इंग्लंडनंतर आता जपान येऊ पहात आहे आणि ह्या दोघांच्या टकरींत आपल्या हिन्दुस्थानचा चुराडा होण्याचें भय आहे

क्रिप्ससाहेब आले एक योजना घेऊन आले सांगू लागले, हिच्याशीं आपली गांठ बांधून घ्या तिला आमच्या पदरीं बांधून आम्हांला लढाईंत सामील करू पहात होते अशा प्रकारें हिन्दुस्थानचा पाठिंबा मिळाल्यास लढाईची नैतिक योग्यता वाढवितां येईल, असा त्याचा डाव होता परंतु त्या देण्या घेण्याची भाषा उधारीची होती म्हणाले, देणें घेणें लढाईच्या धामधुमींत कसें होणार ? व्यापाऱ्याचा एक नियम आहे, देतांना "आधीं लिहा व मग द्या" आणि घेतांना "आधीं घ्या आणि मग लिहा" ह्या व्यापारी सूत्रानुसार क्रिप्ससाहेबांना काम करायचें होतें लढाईनंतर जें कांहीं द्यायाचें आहे तें देऊ, परंतु त्याच्या आधीं आम्ही तुम्हांला जसें नाचवू तसें नाचा काँग्रेस याला कबूल झाली नाहीं गांधीजींनी तर हें तेव्हां च ताडलें.

गांधीजी आता देण्या घेण्याच्या गोष्टी बोलू च इच्छीत नाहींत ते म्हणतात, ईश्वरानें ही जमीन आम्हांला दिली आहे कृपा करून तुम्ही आता येथून निघा तेव्हां ते पुन्हां तेंच जुनें अराजकतेच तुणतुणें वाजवतात हिंदुस्थानच्या जनतेनें असा विचार केला पाहिजे कीं अराजकतेमुळें आमचें आणखी कोणतें नुकसान होणार आहे ? सध्याची व्यवस्था च पुरेपूर अव्यवस्था आहे हिच्याशीं तुलना केल्यास अराजकतेला देखील व्यवस्था च म्हणतां येईल

म्हणून व्यवस्थापक वर्गाला आमची अशी विनंती आहे कीं, तुम्ही आमचा काळजी वाहू नका तुम्ही जर निघून गेलात तर तुम्ही हि वचाराल आणि आमचें हि रक्षण होईल तुम्ही वचाराल ते असे हिंदुस्थान सोडून

गेल्यानें तुमची नैतिक योग्यता वाढेल, साम्राज्यवाद नष्ट होईल आणि जगाचे भले होईल. कदाचित् युरोपांतले युद्ध हि बंद होईल. आणि जर तें बंद न झालें तर तुम्ही युरोपचें पाहून घ्या. आपली सारी शक्ति युरोपांत केंद्रित करा. कृपा करून आमचा पिच्छा सोडा. आम्ही आमच्या येथें अधिकांत अधिक व्यवस्था करण्याचा प्रयत्न करूं.

बापू हे च म्हणतात. त्यांची योजना पुढे कोणतें स्वरूप घेईल हें मला माहीत नाही परंतु ही महान् वस्तु आहे. ही सबंध जगाला लागू पडणारी आहे. फक्त तिचा प्रारंभ हिंदुस्थानांत होत आहे. जगांत व्यवस्थापकांची जणूं एक सांखळी च बनली आहे आणि जनतेच्या गळ्यांत ती तातीसारखी प्राणघातक बनून राहिली आहे. जगांतले सगळे व्यवस्थापक जर आपापल्या स्थानाचा त्याग करतील, तर जगात शांतता नांदेल आणि मनुष्यजातीचें कल्याण होईल.

(ग्राम-सेवा-वृत्त, ५ जून १९४२)

तरुण शब्दाचा अर्थ काय ? त्याचा अर्थ तरुण शब्दावरून च दिसून येतो. माझ्याशीं शब्द गोष्टी करतात. ते मला आपली गुधी सांगतात. तरुण शब्द च सांगत आहे कीं तुम्ही समाजाचे तारक आहां. तरुण म्हणजे तारक, तारण करणारा म्हणून, तरुणांवर पुष्कळसें अवलंबून आहे. मला तर तरुणापासून पुष्कळ आशा आहे. माझी तुमच्या जवळून काय अपेक्षा आहे ? मला म्हणायला पाहिजे कीं, तुम्हा लोकांपासून मी क्रांतीची कमी अपेक्षा करीत नाहीं. आम्हाला सार्वभौम क्रांतीची आवश्यकता आहे. जीवनाच्या सर्व क्षेत्रात आम्ही क्रांति चाहतो. म्हणून च मला तुमच्यापासून सार्वभौम आणि जीवनव्यापी क्रांतीची आशा आहे. आजच्या पुढाऱ्यांनीं तुम्हाला क्रांतीचा मार्ग दाखविला आहे. तरी पण माझी मान्यता आहे कीं क्रांति यायची असेल तर ती तरुण आणि विद्यार्थ्यांच्या द्वारे च येईल. तरुणाचें हें लक्षण आहे कीं ते नवे नवे विचार जगात आणतात आणि शूरपणें त्याच्या अंमल करतात. म्हणून मी मानतों कीं तुम्ही लोकांनीं नवीन विचारांना साथ दिली पाहिजे आणि प्रत्यक्ष क्रांति करून दाखविली पाहिजे

परंतु क्रांति केवळ घोषणांनीं होत नाहीं त्याच्याकरिता प्रत्येक दिशेनें प्रयत्न करावा लागतो जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात परिवर्तन करावें लागतें. मी पाहातों कीं हिंदुस्थानच्या तरुणात उत्साह तर पुष्कळ आहे. मी उत्साह पसंत करतो. परंतु उत्साहाला मी तरुणाचा फार मोठा गुण मानीत नाहीं. मी त्याला तारुण्याचें साधारण लक्षण मानतों एकदा एका संस्थेनें मला काहीं संदेश मागितला त्या संस्थेचें नाव होतें, 'तरुण उत्साही मंडळ' मी म्हणालों कीं 'तरुण आणि उत्साही' हें कसें ? ह्यात द्विरुक्ति आहे तरुणपणात उत्साह समाविष्ट च आहे म्हाताऱ्या करिता 'उत्साही म्हातारे' म्हणणें समजू शकतों. त्याच्याकरिता त्या विशेषणाची गरज आहे म्हाताऱ्याना उत्साह पाहिजे परंतु तरुणाकरिता धीराची गरज आहे उत्साह नसेल तर त्याला तरुण म्हणता च येणार नाहीं धीर असा पाहिजे कीं जें काम हातीं घेतलें तें पूर्ण करून च सोडलें ह्याला च सातत्य म्हणतात तरुणात धीर असेल तर च ते क्रांति करू शकतील.

क्रांतीकरितां क्रांत-दर्शनाची आवश्यकता असते. आपल्या आजूबाजूच्या परिस्थितीला चिरून तिच्या पलीकडे लपलेल्या वस्तूला स्पष्ट पाहूं शकण्याची आणि जी वस्तु दिसेल ती अमलांत आणण्याची जी हिंमत तिला क्रान्त-दर्शन म्हणतात. क्रान्त दर्शन म्हणजे परिस्थितीच्या गर्भांत लपलेल्या खुब्यांचें दर्शन. असें क्रान्त-दर्शन जेव्हां होईल तेव्हां च क्रान्ति होऊं शकेल. क्रान्त-दर्शनाचीं लक्षणें कोणतीं तें मी तुम्हाला सांगतों. तुम्ही माझ्यापासून लांब लचक व्याख्यानाची अपेक्षा करीत नाहीं, मार्गदर्शनाची अपेक्षा करतां. आणि मला हि वाटतें की मी ह्या बाबतींत तुम्हा लोकांचें मार्गदर्शन करूं शकेन.

क्रान्त-दर्शनाचें पहिलें लक्षण साम्य-योग हें आहे. विद्यार्थ्यांकरितां साम्य-योगाचें आचरण कांहीं कठिण नाहीं. प्रत्येक प्रकारचा भेदभाव आपण नाहींसा केला च पाहिजे. जे तुमच्या विचारांत फसले आहेत, तुमच्या संस्कारांत पोसले-वाढले आहेत, भेदभावाच्या सवयींनीं जखडले आहेत, त्यांच्यांत अभेदाची भावना निर्माण करणें कठिण आहे. परंतु विद्यार्थ्यांकरितां ही कांहीं अशक्य गोष्ट नाहीं. विद्यार्थ्यांच्या पुढें जीवनाचे नव आदर्श आहेत, आणि तो जो विचार करतो तसें आचरण हि करूं शकतो. ज्याच्यांत ही हिंमत नाहीं तो तरुण नाहीं. आणि बाल हि नाहीं. मला एकदां बाल ह्या शब्दाचा अर्थ विचारण्यांत आला. मी म्हणालों, जो बलवान आहे ज्याच्यांत हिंमत आहे, जो जें इच्छितो तें करूं शकतो तो बाल. तुम्ही विचारानें ताजे आहां, त्यासाठीं साम्य-योगाचें आचरण अवश्य करूं शकतां. हिंदूंना मोठे मानूं नका आणि मुसलमानांना लहान मानूं नका. हरिजनांना नीच मानूं नका आणि सवर्णांना उंच मानूं नका. अशा प्रकारें सर्व भेदभावांना पुसून टाका. विद्यार्थी तर लहानपणापासून च समभावी असतात. बालक जन्मतो तेव्हां कोणत्या हि प्रकार चा भेद जाणत च नाहीं. परंतु नंतर आई-बाप च त्याच्यावर भेदाचे अनेक संस्कार करीत असतात. तुम्ही ह्या संस्कारांपासून अलिप्त राहण्या चा प्रयत्न केला पाहिजे. आणि कोणाला हि उंच नीच मानलें न पाहिजे. आज आम्ही इंग्रजांना उंच समजतो, हरिजनांना नीच मानतो, इंग्रजांच्या लाता खातो, हरिजनांना तुडवतो. परंतु तुम्हाला कोणाच्याहि लाथा खायच्या नाहींत, आणि कोणाला हि तुडवायचें

नाहीं. हा साम्य योग आहे साम्य-योग्याने स्वत ला कोणापेक्षा हि नीच समजू नये, आणि उच हि समजू नये त्याने सर्वांना स्वत च्या बरोबरीचे आणि स्वत ला सर्वांच्या बरोबराचे समजावे सर्व भेदाना आपल्या बुद्धींतून काढून टाकले तर स्वराज्य दोन मिनिटात मिळू शकते स्वराज्याला उशीर होत आहे ह्याचे कारण येथे अनेक भेद आहेत हे आहे हिंदु मुसलमान भेदाच्या बाबतींत आम्ही इग्रजाच्या डोक्यावर दोष थोपतों, परतु अस्पृश्यतेच्या बाबतींत तसें आम्हाला म्हणता येईल काय? इग्रजाच्या अनुपस्थितींत अस्पृश्यता दूर करणे शक्य नाहीं काय? इग्रज आम्हाला अस्पृश्यता-निवारण करण्यात आडकाठी करीत आहेत काय? अशा प्रकारें प्रत्येक दोषाकरिता इग्रजाना दोषी ठरविणे म्हणजे आपली जबाबदारी टाळणें आहे क्षात दर्शनाचें हें पहिले लक्षण सागितलें.

दुसरें लक्षण आहे परिश्रम निष्ठा मला माहीत आहे, आणि इतिहासाचे माझें अध्ययन हि सागते, कीं जगात जितके विचार प्रवाह आणि वाद चालू आहेत त्या सर्वांच्या मागे एकच वृत्ति काम करीत असलेली दिसून येते ही वृत्ति च सर्व विषमतेचे मूळ आहे स्वत काम न करता दुसऱ्याच्या परिश्रमाचा उपभोग घेत राहणें हि ती वृत्ति होय म्हणून मी विद्यार्थ्यांपासून अपेक्षा ठेवतों कीं, परिश्रमाची प्रति ठा समजा आणि स्वत भगी, सुतार आणि लोहाराचे काम सुरू करा अशाप्रकारच्या कोणत्या हि कामाला हलकें भारी समजू नका मला दु खानें म्हणावें लागतें की काग्रेसच्या पुढाऱ्याला हि ह्याचें महत्व अजून समजलेलें नाहीं मागें गाधीजींनीं काग्रेसच्या घटनेत काग्रेसच्या सभासदत्वाकरिता चार आण्या ऐवजीं सूत देण्याचा नियम ठेवण्यात यावा असें सुचविलें होतें त्याचा उद्देश हा च होता कीं पैशाच्या ऐवजीं श्रमाची प्रतिष्ठा प्रस्थापित व्हावी त्याकरिता एक समिति हि नियुक्त करण्यात आली होती, परतु त्यातून निष्पन्न कांहीं झालें नाहीं चार आण्याची अट च कायम राहिली तुम्ही सभासदत्वाची फी चार आण्या ऐवजीं दोन आणे किंवा दोन पैसे च भले ठेवा, परतु पैशान सभासद बनता येतें तोपर्यंत श्रमाची प्रतिष्ठा कायम च राहील. परिश्रमाची प्रतिष्ठा स्थापित करायची असेल तर आपण स्वत परिश्रम सुरू केला पाहिजे

लोक कधी कधीं विचारतात, प्रत्येक व्यक्तीला मजूरी करणें अनिवार्य का असावें ? मी विचारतों, प्रत्येकाला जेवणें जरूरी का असावें ? ज्ञान्याने मजूरीचें काम का करावें, असा हि प्रश्न विचारण्यात येतो त्यानें व्याख्यान का देऊ नये ? मी विचारतो, ज्ञान्यान भोजन का करावें ? केवळ ज्ञानामृताने तृप्त का राहू नये ? त्याला खाण्या पिण्याची, निजण्याची गरज का असावी ? जर आपल्याला निजण्याची गरज आहे, खाण्याची गरज आहे तर शरीरश्रमाची गरज आहेच ज्या दिवशीं आपण खाण्याऐवजीं दुसरी एखादी वस्तु चालवू शकूं, त्या दिवशीं मजूरीऐवजीं एखादी दुसरी वस्तु चालविता येईल ईश्वरानें प्रत्येकाला डोकें दिलें आहे, आणि हात हि दिले आहेत त्याची इच्छा तशी असती तर ज्ञान्याला कवळ डोकें आणि मजूरला केवळ हात च त्यानें दिले असते काहीं लोक फक्त डोक्याचे आणि काही फक्त हाताचे त्यानें बनविले असते परतु त्यानें तसें केलें नाहीं कारण तो इच्छितो कीं प्रत्येक मनुष्यानें विचार हि करावा आणि काम हि करावें कामाचा अर्थ उत्पादक परिश्रम असा आहे जो उत्पादक परिश्रम करीत नाहीं, तो चोरी करता

तिसरें लक्षण फार महत्त्वाच आहे तरुणांनी एक व्रत घेतलें पाहिजे तें व्रत आहे, अन्यायाच्या प्रतिकाराचें जेथें जेथें अन्याय दिसेल तेथें तेथें कोणत्या हि स्थितींत त्याचा प्रतिकार हा केला च पाहिजे सामाजिक आणि राजकीय सर्व प्रकारच्या अन्यायाचा प्रतिकार करण्याचें व्रत तुम्ही घेतलें पाहिजे

परतु ह्या व्रताच्या पालनात आपल्याला अहिंसेचा उपयोग करावा लागेल कारण हिंसेनें अन्यायाचा प्रतिकार होऊ च शकत नाहीं ह्या युद्धानें हें सिद्ध केलें आहे कीं आता मानवजातीकरिता अहिंसेशिवाय गत्यतर नाहीं कारण ह्या युद्धात एक नवें तत्त्व निघालें आहे अनन्य शरणता-मरणान्या शत्रूला विनशर्त शरण येण्याची अट लावण्यात येते मोठमोठीं राष्ट्रें हि, ज्याच्या जवळ योग्य यथेष्ट सैन्य आहे, विनशर्त शरण जातात कारण कीं तीं शस्त्राच्या आधारावर लढत असतात जे शस्त्रांनीं लढतात ते आपल्यापेक्षा बलवान शत्रु ठरला कीं त्याच्या पुढें वाकतात जिथ शस्त्र शरण आहे तेथें अनन्य शरणता आली च ज्याचा विश्वास शस्त्रावर नाहीं तर आत्म्यावर आहे, तो च शेवटपर्यंत लढत

राहण्याची प्रतिज्ञा करूं शकतो. लहानसा मुलगा देखील अहिंसेच्या बळावर असा संकल्प करूं शकतो. अहिंसेच्या आधारावर च आपण अन्यायाच्या प्रतिकाराचें व्रत निभावूं शकूं.

परंतु आजकाल मी वर्तमान पत्रांत वाचतों आणि लोकांना हि बोलतांना ऐकतों कीं आपण आजपर्यंत अहिंसेला अजमावून पाहिलें, आतां कांहीं तरी तोड-फोडीचा प्रयोग करण्याची वेळ आली आहे. १९४२ मध्यें आपण असा थोडा प्रयोग केला आहे. परंतु मी स्पष्ट इशारा देऊं चाहतों कीं जे लोक असें म्हणतात ते तुम्हांला कमींत कमी शंभर वर्षें गुलाम ठेवूं चाहतात. तुम्हांला स्वातंत्र्य पाहिजे असेल तर तुमच्या जवळ तशी शक्ति आहे. तिच्या बळावर तुम्ही स्वतंत्र व्हाऊं शकतां.

आपली पुढील लढाई ४२ पेक्षां मोठी होईल. मात्र ती अहिंसक असेल. तिचें स्वरूप राष्ट्रव्यापी संपाचें असेल. आपणाला राष्ट्रव्यापी संप करावा लागेल. अशा संपानें क्रांति होईल. त्याकरितां आपणाला लोकांची सेवा करावी लागेल. तेव्हां व्हाइसरायच्या वटहुकुमाप्रमाणें आमची सूचना हि पांच मिनिटांत देशभर पसरेल आणि त्याच क्षणीं सार्वत्रिक संप हि होईल. आणि सरदार म्हणाले होते त्याप्रमाणें सात दिवसांत क्रांति होऊं शकेल. परंतु त्याकरितां प्रेमाचें आणि अहिंसेचें संघटन केलें पाहिजे.

शेवटीं आणखी एक गोष्ट सांगायची आहे. विद्यार्थ्यांनीं राजकारणात भाग घ्यावा किंवा नाहीं ?

हा प्रश्न अनेकांनीं अनेक वेळा विचारला आहे. वास्तविक, आमच्या देशाची राष्ट्रीय चळवळ राजकीय चळवळ नाहीं. घराला आग लागल्यावर ती विझवायला जावें किंवा नाहीं असा प्रश्न कधीं विचारण्यात येतो काय ? जितकी शक्ति असेल तितकी मोठी बादली घेऊन आग विझविण्याकरितां प्रत्येकानें धावत गेलें पाहिजे लहान मुलगा लहानशी बादली घेईल. पारतंत्र्याची आग विझविण्यांत सर्वांनीं च भाग घेतला पाहिजे. विद्यार्थी असेल तर लहान बादली उचलील, परंतु उचलील अवश्य.

( सर्वी जगत्, डिसेंबर १९४५ )

: १० १

## सोन्याची खाण

श्री. अण्णासाहेब दास्ताने यानीं गांव-सफाईसंबंधानें, विशेषतः गांवच्या भंगीकामासंबंधानें विचारणा केली होती. त्याच्याशीं या बाबत चर्चा होऊन गेली आहे. तिचें सार येथें देत आहें.

गांवात भंगी ठेवावा काय ?

१. ठेवूं नये. भंगी ही जात यापुढें वाढवायची नाहीं, भंगी-कामाचें रूप असें झालें पाहिजे कीं तें कुणाला हि करण्याला अडचण वाटूं नये आणि आजच्या अवस्थेंत हि त्या कामाचा वांटा इतरानीं घ्यायास हवा. कोणी हि मानव अस्पृश्य असूं नये, तसें कोणतें हि काम अस्पृश्य असूं नये. शेडेगावाल भंगी नाहीं ही देवाची दया समजावी. गांवच्या मंडळींनीं सेवा-भावनेनें हें काम उचललें पाहिजे.

२. मळावर माती टाकण्याची योजना पाहिजे. मळ उघडा पडूं देणें हें सहावें महा-पातक आहे.

३. मातीशिवाय पाला-पाचोळा वर टाकतां आला तर बरें. त्यानें घाण मुळीं च पसरणार नाहीं, माश्या होणार नाहींत, आणि सोनखताचें शेण-खतांत रूपांतर होईल. तें शेतीला अधिक लाभाचें आहे. हिंदुस्थानची जमीन दहा हजार वर्षांची मागसलेली आहे. तिचा कस टिकवण्याला खताची फार जरूर आहे. ही दृष्टि शेडेगावच्या लोकाना आली पाहिजे. चीन-जपान मध्यें ती आहे. त्यामुळें ल्हानल्या तुकड्यांतून ते अधिक उपज करतात.

४ उघड्यावर बसण्याची रीत बदलायला हवी सोईनुसार पधरा वीस बैठकींच्या झोपड्या बाधाव्या त्यात चर खणलेले असावे ते विटानी बाधून काढावे झोपडीची जागा थोडी उचावर असलेली चागली योजना पावसाळ्यात उपयोगी पडेल अशी असावी ती च इतर काळात हि चालेल

५ झोपड्या बाधण्याचा खर्च गावकऱ्यानीं करावा त्याना तसें करणे जड नाहीं मळाचे माणशीं उत्पन्न सालिना दोन रुपयाचें होतें असा जुना हिशेब आहे आजच्या भावांत ते दहा रुपये होईल हजार लोक-वस्तीच्या गावाला सहा हजार रुपये सालिना मिळतील एवढ्या गावासाठीं झोपड्या बाधायला ठोकळ मानानें चार हजार रुपयाच्या वर लागू नयेत उत्पन्नाचा अदाज कमी करून तिसरा हिस्सा जरी मानला तरी दोन हजार रुपये नि शक मिळतेत म्हणजे झोपड्याचा खर्च दोन वर्षांत भरून येईल झोपड्या दहा वर्षें तरी टिकाव्यात ज्याचे बगीचे आहेत त्यानी आपल्या खर्चानें अशा झोपड्या लोकाना बाधून द्याव्या खताचा उपयोग त्यानीं बगीच्यांत करावा आणि मळावर टाकायला माती त्यानीं द्यावी अशी खासगी योजना झाली तरी तूर्त मला चालेल

६ दरेक गावात सरकारनें गाव-पंचायत केली पाहिजे. गावाचा कारभार तिच्या हातात पाहिजे त्यात च ही बाब येईल पायखान्याच्या झोपड्या बाधण्यासाठी सरकारनें देणगी देण्याचें कारण नाहीं विशेष परिस्थितींत सरकार कर्जाऊ रकम देऊ शकतें आणि दोन-तीन हप्त्यांनीं ती परत घेऊ शकतें

७ झोपड्या बाधण्यासाठी गावच्या निरनिराळ्या बाजूला जागा मिळवून देण्याचें काम कुठें कुठें सरकारला करावें लागेल. वास्तविक अशा जागा लोकाना गावच्या उपयोगासाठीं दान द्यायास हव्या आणि समजस लोक तशा देतील हि पण जिथें हें जमणार नाहीं तिथें त्या मिळवून देण्याचें काम सरकारला करावें लागेल

८ या विषयासबंधानें माहिती पुरवण्याचें काम सरकारकडे राहील तसें च त्या माहितीचा उपयोग करून गावोगाव योजना नीट अमलांत

येत आहे कीं नाहीं हें पाहण्याचें हि काम त्यांचें राहील. त्या साठीं जो काय खर्च लागेल तो लागेल. एरव्हीं या कामासाठीं दुसरा कांहीं च खर्च सरकारवर पडूं नये.

९. सरकारचा उपयोग करीत कमी होणें हें अहिंसक लोकराज्याचें लक्षण आहे. ज्या त्या बाबतींत सरकारवर विसंबून रहायचें ही वृत्ति स्वराज्याची नाहीं. म्हणून लोक-सेवकांनीं गोबर-गॅसच्या योजना सरकार-निरपेक्ष करायास पाहिजेत. त्यातून ज्या योजना खरोखर खर्चाच्या नसून उत्पन्नाच्या च आहेत त्यांचा भार सरकारवर टाकणें मुळीं च शोभणार नाहीं. पण नीट रीतीनें वापरलें गेल्यास गोबरगॅस ही एक सोन्याची खाण च लाभणार आहे. हिच्या उत्पन्नातून गावाची दुसरीं सार्वजनिक कामें हि होऊं शकतील.

( मराठी हरिजन, ता ९ मार्च १९४७ )

## : ११ :

# विसरलेलें सेवा-क्षेत्र

महारोगी-सेवा-मंडळा तर्फे यथर्षाला गेलीं दहा वर्षे महारोग्यांच्या सेवेचें काम चाललें आहे. श्री. मनोहरजी दिवाण यांनीं हें काम जवळ जवळ एक हातीं उभें केलें आहे. आणि त्यांनीं त्या कामासाठीं आपलें जीवन समर्पण करण्याचा संकल्प केला आहे. म्हणून च तें काम उभें आहे. त्या कामासाठीं जरुरी ज्ञान त्यांनीं निदानरी केंद्रांत राहून संपादिलें आहे.

मनोहरजी वीस वर्षांपासून माझ्याजवळ राहत आहेत. आश्रमांतील रसोई-काम, भंगी-काम, कांतणें, पिंजणें, विणणें इत्यादि सर्व कामें त्यांनीं वर्षेच्या वर्षे केलीं आहेत. एवढ्या तयारीनंतर वर्धा तालुक्यांत खेड्यांत पाड्यांत फिरून गांवकऱ्यांची त्यांनीं अनेक-विध सेवा निष्काम बुद्धीनें केली आहे. फिरत असतांना महारोग्यांच्या दुर्दशेचीं चित्रें पाहून त्यांचें हृदय द्रवलें आणि तिथें च त्यांनीं या सेवेंत जीवन खपविण्याचा निश्चय केला. मीं त्यांना म्हटलें, "मला हें सेवा-कार्य हवें आहे, पण तुम्हांला तें एकाकी करावें लागेल, असें समजून चला. अपाल्यापाशीं असलेले कार्यकर्ते सेवेच्या इतर कार्यांत गुंतलेले आहेत, आणि बाहेरून या कार्यासाठीं सेवक मिळण्याची, व्यापक आत्मज्ञान लोपलेल्या आमच्या समाजाच्या आजच्या स्थितींत, अपेक्षा करायची नाहीं. शिवाय तुम्हांला वैद्यकीय ज्ञान नाहीं. आणि हें च जीवन-कार्य समजावयाचें म्हणजे इतर सारे चळवळींचे मोह हि सोडावे लागतील. आणि या कामांतील शारीरिक धोका तर उघड च आहे. म्हणून हृदयाचा पूर्ण ठाव घेऊन काय तें ठरवा." त्यांना हृदयाचा ठाव घेण्याची जरूर च नव्हती. तो ते आधीं च घेऊन चुकले होते.

बाई ( मनोहरजींच्या मातुःश्री ) म्हणाल्या, "त्याला समजावून सांगा, जगांत हीच का एक सेवा आहे? हा कशाला यानें हट्ट धरला आहे?" मीं म्हटलें, "समजा मला किंवा तुम्हांला महारोग झाला तर मनोहरजींनीं आमची सेवा करावी कीं करूं नये?" बाई म्हणाल्या, "ती तर करावी च लागेल!" "मग तसें च हें नाहीं का?" मीं विचारलें. "तें हि बरोबर च आहे," त्यांचें उत्तर आलें.

इतकीं वर्षे या कामांत तसें सहकार्य अनेकांकडून मिळालें आहे. एरव्हीं कामाची उभारणी च होऊं शकली नसती. परंतु या कामाला वाहून घेणारे अजून कोणी नित्य सहायक उपलब्ध झाले नाहींत. दहा वर्षांत देशाची अवस्था पालटली आहे. स्वतंत्रतेची उषा उगवली आहे. लौकर च सूर्योदयाची अपेक्षा आहे. सेवकांची जबाबदारी वाढली आहे. हिंदुस्थानांत शेंकडा एक म्हणजे सुमारें चाळीस लाख महारोगी असावेत असा अंदाज केला आहे. म्हणून वैद्यकीय ज्ञान असलेल्या सेवकांचें तीव्रतेनें इकडे लक्ष लागावयास हवें आहे.

आतांपर्यंत हें काम बहुतेक मिशनऱ्यांनीं च केलेलें आहे. त्यांत त्यांची धर्मांतर करण्याची दृष्टि असल्यामुळें त्यांच्या सेवेला गौणता येते हें खरें. तरी पण त्यांची ती सेवा मोलाची च समजली पाहिजे. आणि, आमच्या लोकांनीं ती स्वीकारली हि आहे. ही धर्मांतराची प्रेरणा जर त्यांच्यांत नसती तर त्यांच्या सेवेनें त्यांच्या धर्माचा खरा प्रचार झाला असता. हिंदुधर्मांत भूत-दया हा शब्द निघाला. त्यामुळें मांसाहार-वर्जन आदि प्रयोग हिंदु-धर्मांत झाले. भूत-दयेंत मानव-दया गृहीत च आहे. पण शब्द व्यापक पडल्यामुळें ती दृष्टि आमची निसटली. ख्रिस्ती धर्मांत मानव-दया—ह्यूमॅनिटी—असा शब्द उच्चारला गेला. त्यामुळें मानव-सेवेची प्रेरणा ख्रिस्ती लोकांत दिसून येते. असा हा शब्दाचा महिमा आहे. आम्हांला आमचा व्यापक शब्द सोडण्याची गरज नाहीं. शब्द कायम राखून मानव-सेवेचें विसरलेलें क्षेत्र काबीज करायला हवें आहे. तिकडे कार्यकर्त्यांचें मी लक्ष वेधूं इच्छितों.

( मराठी हरिजन ५ जानेवारी १९४७ )

## : १२ :

# देवळें मोकळीं करा.

अस्पृश्यता-निवारणाचा प्रश्न आतां देवळाभोंवतीं घुमूं लागला आहे देवळांचा प्रश्न अतिशय सरळ आहे. पण जो सर्वांत सरळ तो आम्हीं अत्यं थांकडा करून ठेवला आहे. व्यवहारांतून अस्पृश्यता काढून टाका, पण देवळां राहिली च पाहिजे असें म्हणणारे "धर्माचार्य" आहेत. वास्तविक त्यांनें म्हणावयाचें तर असें म्हणायला हवें, कीं व्यवहारात अस्पृश्यता राहिली तर घटकाभर चालेल, पण देवळांतून तरी ती अजीबात काढून टाकली च पाहिजे. पण "खावरेच्या गोण्या वेलाचिये पाठीं" अशी आमची धर्मासंबंधानें स्थिति झाली आहे. धर्म हा अनुभवाचा विषय आहे. शुद्ध बुद्धीनें च धर्माचा प्रकाश पडतो. शुद्ध बुद्धीच्या अभावीं शास्त्र ग्रंथाचा काथ्याकूट व्यर्थ ठरतो. शस्त्रानें जितकी हिंसा होते, त्यापेक्षां शास्त्रानें अधिक हिंसा होऊं शकते. आणि ज्यास्तीत ज्यास्त जितकी हिंसा होऊं शकत असेल तितकी आम्हीं ह्या अस्पृश्यतेच्या रूपानें करून ठेवली आहे ह्यांत शंका नाहीं

मूर्ति-पूजा म्हणजे सर्वत्र ईश्वर पाहण्याचा अभ्यास. त्यासाठीं मनाला रुचेल अशी मूर्ति निवडावयाची. मनाला रुचेल अशी च, पण कोणची मूर्ति निवडावी ह्याबद्दलचे कायदे आहेत. मनोनुकूलता तर पाहिजे च पण त्याबरोबर आणखी हि अनेक मुद्दे पहावे लागतात. तसें च म्हटलें तर जगतांतली प्रत्येक वस्तु परमेश्वराची मूर्ति च आहे. मग विशिष्ट मूर्ति कशाला हवी होती ? पण सर्वत्र परमेश्वर दिसत नाहीं म्हणून मूर्तीची जरूर लागते. आणि अशी मूर्ति विशिष्ट गुणांनीं संपन्न असावी लागते. त्याशिवाय हिंदू धर्माला ती मूर्ति

"मूर्ति" म्हणून मान्य होत नाहीं. असे कोणकोणचे गुण मूर्तींत असावे लागतात तें पाहण्याचें हें स्थळ नव्हे. पण त्यांतला एक गुण प्रस्तुत आहे. तो हा कीं मूर्ति सर्वोपलभ्य पाहिजे. जी मूर्ति सर्वोपलभ्य नाहीं ती 'मूर्ति' होऊं शकत नाहीं. सर्वोपलभ्यता म्हणजे सर्वांना ती मूर्ति उपलभ्य असणें. सूर्यांत हा गुण उत्कटत्वानें आहे. सूर्य कोणाला हि उपलभ्य आहे. "मां प्रति मां प्रति इति सर्वेण समम्" — हा "माझ्याकडे पाहत आहे, हा माझ्याकडे पाहत आहे" असें सूर्याला पाहून सर्वांना वाटतें—असें सूर्याचें वर्णन श्रुतीनें केलें आहे, म्हणून सूर्य ही ईश्वराची मूर्ति हिंदु-धर्मानें सर्वांत श्रेष्ठ ठरविली आहे. आमच्या देवळांतल्या मूर्तींविषयीं सर्वांना ( जर त्यांची इच्छा असेल तर ) असें वाटलें पाहिजे कीं ही मूर्ति माझ्याकडे च पाहत आहे. तर च ती देवळांतली मूर्ति ईश्वराची मूर्ति ठरेल.

मूर्तींमध्यें जे कांहीं गुण असल्याशिवाय मूर्ति ही हिंदुधर्म-दृष्ट्या मूर्ति बनूं च शकत नाहीं, त्यांतला "सर्वोपलभ्यता" हा गुण आमच्या अस्पृश्यते-मुळें नाहींसा होतो, ही गोष्ट लक्षांत आली म्हणजे देवळें अस्पृश्यांना कां मोकळीं केलीं पाहिजेत हें ध्यानांत येईल.

( महाराष्ट्र-धर्म ता. ११-१-२७. संक्षेप करून. )

## : १३ :

# पैदास पाहिजे, पैसा नको

हिंदुस्थान शेती-प्रधान देश आहे, अशी भाषा बोलली जाते. याचा अर्थ हिंदुस्थानपाशीं शेती पुष्कळ आहे, असा नाहीं. हिंदुस्थानची गांव-रचना आणि मनो-रचना शेतीला अनुकूल आहे, हा एक अर्थ त्यांत असूं शकतो. त्याशिवाय हिंदुस्थानपाशीं शेतीखेरीज दुसरा उद्योग-धंदा, म्हणण्या सारखा, आज उरला नाहीं, हा दुसरा अर्थ असूं शकतो. बाकी या शेती-प्रधान देशांत शेती फेवळ माणशीं पाऊण एकर च आहे.

ज्याच्यापाशीं शेती फार कमी आहे त्याला आणिक एका अर्थानें शेती-प्रधान म्हणतां येईल. त्यानें शेती-सुधारणेकडे मुख्य लक्ष द्यायला पाहिजे, शेती नीट शास्त्रीय पद्धतीनें केली पाहिजे, तींत बुद्धि-सर्वस्व ओतलें पाहिजे, नाहीं तर जगणें नीट होणार नाहीं, या अर्थानें आज हिंदुस्थान शेती-प्रधान झाला आहे.

तसा कोणता हि देश केव्हां हि शेती-प्रधान च असला पाहिजे. म्हणजे इतर धंद्यांपेक्षा शेतीकडे च प्रधान लक्ष त्यानें दिलें पाहिजे. कारण, शेतींतून माणसाला अन्न मिळतें, आणि ती च माणसाची मुख्य गरज आहे.

उपनिषदें जीवनाकडे खोल दृष्टीनें पाहणारीं म्हणून विख्यात च आहेत. त्यांनीं तर असा विधि घालून दिला आहे कीं अन्न भरपूर निर्माण करावें. माणसानें हें व्रत च समजावें.— "अन्नं बहु कुर्वीत, तद् व्रतम्". युद्धाच्या काळांत आमच्या सरकारनें ही च भाषा बोलायला सुरवात केली. पण अन्न पुष्कळ

काढणें त्यांना शक्य झालें नाहीं, तर त्यांनीं त्याऐवजीं पैसा च पुष्कळ काढला. परिणामीं तीन लाख माणसें अन्नावांचून मेलीं.

इंग्रज सरकारनें शेवटीं हें डबघाईस आलेलें दुकान आमच्या लोकांच्या हातांत सोंपविलें. आज सर्व प्रांतांत लोकप्रिय सरकारें अस्तित्वांत आहेत. डबघाईस आलेल्या दुकानांचा बदलौकिक पतकरून तीं आम्हीं स्वीकारलीं आहेत. त्यामुळें अवांतर कांहीं हि करण्याच्या आधीं लोक जिवंत कसे राखायचे ही समस्या सोडविण्याची पाळी आली आहे.

आज शेती हिंदुस्थानांत परवडत च नाहीं, असें हिशोबी लोक सांगत आहेत. जेथें शेती परवडत नाहीं, तेथें जीवन परवडत नाहीं, असा च अर्थ आहे. अशी अवस्था येण्याला निसर्ग कारण नाहीं, कृत्रिम जीवन कारण आहे. पैसा ही त्या कृत्रिम जीवनाची खूण आहे. पैशाची प्रतिष्ठा जीवनाला मारक झाली आहे.

हिंदुस्थानची जनता खेड्या-पाड्यांत राहते. खेड्यांतून पैशाची प्रतिष्ठा काढून टाकतां आली, तर हिंदुस्थानची शेती सुधारल्याशिवाय राहत नाहीं. पैशासाठीं तंबाखू पेरायचा, पैशासाठीं गरजेपेक्षां जास्त कापूस पेरायचा, एवढी पैशाची गरज कां ? बाकीच्या सर्व गरजा विकत घेऊन पुऱ्या पाडाव्या लागतात म्हणून. कापड विकत आणायचें, ढेप विकत आणायची, म्हणून पैशाची गरज. म्हणून भलत्या च वस्तूची लागवड. म्हणून धान्याचा तुटवडा. खेड्यांत उद्योग-धंदे नाहींत, त्यामुळें धान्य पुरेसें निर्माण होत नाहीं, असा याचा अर्थ आहे.

शेती सुधारण्याला पुष्कळ च वाव आहे, यांत शंका च नाहीं. आणि सुधारलेली शेती अधिक उत्पन्न देईल हें उघड च आहे. पण तें पुष्कळ प्रयासाचें काम आहे. करायला तर पाहिजे च, पण त्यांत वर्षें निघून जातील. आणि तेवढ्यानें हि भागणार नाहीं. कारण लोक संख्या वाढती आहे. म्हणून शेतकरी म्हणजे केवळ शेती करणारा ही व्याख्या जाऊन, शेतकरी म्हणजे शेती करणारा, आणि शेतींतून उत्पन्न झालेल्या कच्च्या मालाचा आपल्या गरजेपुरता पक्का माल

हि यनविणारा, अशी व्याख्या झाली पाहिजे. खादीच्या आणि ग्रामोद्योगाच्या चळवळीचा हा उद्देश आहे. खादी आणि ग्रामोद्योग यांशिवाय आजच्या घटकेला गरीब लोकांची दुर्दशा टळण्यासारखी नाहीं.

हिंदुस्थानला धान्य किती कमी पडतें ह्याचें गणित करून तितकें धान्य अधिक कसें काढतां येईल याच्या विवेचनेंत भाग सरकार आहे. वास्तविक धान्य गणितानें काढून घालता नाहीं. धान्य अगणित काढायला हवें. चालू वर्षाला पुरून पुढच्या हि वर्षाला थोडें उपयोगी पडेल इतकी वेगमी करावी लागते. हवा भरपूर, पाणी भरपूर, तसें धान्य भरपूर हवें. पण तें शेती सुधारण्यावर अवलंबून आहे. धान्याशिवाय अन्नांतर खाद्य हि भरपूर पैदा करावयास हवें. त्यासाठीं जमिनीपेक्षां पाण्याची अधिक गरज आहे. जमिनीच्या पोटांत पाणी भरपूर आहे. तें बाहेर काढायला हवें. त्यावर भाज्या, फळें, कंद, काढायला हवींत. पण त्यांत हि पैशाची प्रतिष्ठा नको. नाहीं तर त्यांना बाजार कसा मिळेल, ही च चिंता होऊन बसावयाची. या सर्व वस्तु शेतकऱ्यांनीं स्वतः खायला हव्या. उरलेल्या विकावयाच्या. मुख्य गिऱ्हाईक आपण स्वतः च. ही स्वराज्याची दृष्टि आहे. "आपुलें केलें आपण खाय, तुका वंदी त्याचे पाय". आपला मुलगा आपण बाजारांत विकायला काढला, तर त्याला काय किंमत येईल ? तो परवडेल का आपल्याला ? खेड्यांत तूप-दूध होतें तें त्यांना खाणें परवडत नाहीं. फळें भाज्या भरपूर केल्या तर त्या हि खेड्याच्या लोकांना खायला परवडायच्या नाहींत. कां ? माझें तर उत्तर आहे, 'ग्रामोद्योग नाहीं म्हणून.' कदाचित् माझी बुद्धि एका विचारानें घेरल्यामुळें मला असें वाटत असेल. पण दुसरें उत्तर जोंपर्यंत उपलब्ध झालें नाहीं तोंपर्यंत ह्या च उत्तराला चिकटून राहणें भाग आहे.

( मराठी हरिजन, १९ जानेवारी १९४७ )

: १४ :

# धान्य-धारणा

एक वाचक *लिहितात* :

'पैसा नको, पैदास पाहिजे' हा लेख मननपूर्वक वाचला. त्यांत केलेलें परिस्थितीचें विश्लेषण आणि निदान बरेंचसें पटण्यासारखें आहे. तथापि खेडेगांवचा सवाल त्यांत जितका सोपा करून दाखविला आहे, तितका सोपा वाटत नाहीं. अन्न, कपडा आणि घरें, या मुख्य तीन गरजांबाबत खेडीं बहुतांशीं निजावलंबी होऊं शकतील हें खरें आहे. पण एवढ्यांत च खेड्याच्या गरजा संपत नाहींत. पंचवीस वर्षांपूर्वी चहा ही खेड्याची गरज मानली जात नव्हती. आज ती नेहमींची गरज झाल्यासारखी आहे. आतांपर्यंत खेड्यांतल्या औषध-पाण्याची कुणीं कधीं च चिंता केली नाहीं. पण आमच्या सरकारला ती करावी लागेल. आणि मग औषधें हि खेड्याला बाहेरून पुरवावीं लागतील. कोणाची इच्छा असो अथवा नसो, आज केवळ शहरांत च सीमित असलेल्या गरजा दळण वळणाचीं साधनें वाढल्यानंतर खेड्यांत हि भासूं लागतील, गांवोगांव शाळा काढाव्या लागतील, आणि शाळेच्या संगानें हि कांहीं नव्या गरजा उभ्या होतील. खेड्यांना शहरांपासून मुद्दाम समजून खेड्यांची थोडक्यांत सोडवणूक करणाऱ्या योजना, कागदावर जमल्या तरी, वस्तुस्थितीला अपुऱ्या पडतील. म्हणून खेड्यांच्या लोकांना हि पैशाची गरज टाळतां येणार नाहीं असें वाटतें."

हा एका विस्तृत पत्राचा सारांश आहे. माझ्या लेखांतील मूळ विचारांचें यांत नीट आकलन झालेलें नाहीं. म्हणून त्याची थोडी अधिक फोड करावी लागेल.

( १ ) गरजा सगळ्या च असल्या तरी त्यांत तर-तम-भाव पहावा लागेल. एकूण सगळ्या गरजांचे सात विभागांत विभाजन करतां येतेः १. अन्न २ वस्त्र, ३. गृह, ४. औजारें, ५. ज्ञान-साधनें, ६. करमणुकी, ७. व्यसनें. सबंध देशाचा विचार करतांना हीं सगळीं च मी मान्य करतों. पण विवेक सोडून सरसहा सर्व गरजा सारखेपणानें पुरवारयाच्या अशी जबाबदारी पतकरत नाहीं. अन्नाच्या बदल्यांत व्यसन-पूर्ति किंवा औजारांच्या बदल्यांत खेळणीं पतकरतां येणार नाहींत.

( २ ) खेळण्यांत हि पुन्हां परी आहेत. जेलमध्ये राजकीय कैद्यांना व्हॉली-बॉल खेळण्याची सोय केलेली होती. म्हणजे साऱ्या खेळण्यासाठीं जें रबर हिंदुस्थानांत होत नाही त्याची गरज अनिवार्य होऊन बसायची. आट्या-पाट्या, खो-खो, इत्यादि खेळ आनंद किंवा व्यायाम कमी न पुरवितां, अक्कल अधिक पुरविणारे आहेत. हें च धोरण व्यसनादिकांस हि लागू आहे. सदोष व्यसनें जाऊन निर्दोष आलीं पाहिजेत, आणि त्यांचा हि पुरवठा लागच्या जागीं च झाला पाहिजे. पंचवीस वर्षांत गफलतीनें चहा येऊं शकतो, तर सावधानपणानें तो तसा च जाऊं हि शकतो. तसें शिक्षण द्यावें लागेल. शिक्षण देण्याची हिंमत न बाळगतां चहा कायमचा समजून चालणें मानसिक आळसाचें लक्षण आहे. तो राहणार च असेल तर त्याची बाहेरून सोय करावी लागेल हें उघड च आहे.

( ३ ) खेड्याच्या जीवनाची तुटक कल्पना माझी नाहीं. पण *खेड्याच्या मुख्य गरजा सर्व, आणि दुय्यम गरजा हि पुष्कळशा, खेड्यांनीं च* पुरविल्या पाहिजेत, उरल्या-सुरल्या दुय्यम तिय्यम गरजा बाहेरून आल्या तरी चालेल.

( ४ ) खेड्यांत जो कच्चा माल होतो त्याचा पक्का माल होतां-होईतो तेथें च झाला पाहिजे. खेड्यांत कापूस होतो, कापड तेथें झालें पाहिजे. अंबाडी होते, दोर तेथें झाला पाहिजे. चामडें होतें, जोडे आणि मोटा तेथें झाल्या पाहिजेत. त्यांतून त्याच्या गरजा पुऱ्या पडून उरलेलें शहरांस विकलें जाईल.

विकून मिळणारा पैसा अवांतर गरजा खरीदण्याला पुरा पडावा. त्यासाठीं पोषणाला निरुपयोगी " पैशाची पिकें " काढावीं लागूं नयेत.

( ५ ) गांवांतील मजुरांना मजुरी त्या त्या वस्तूंत दिली जावी. मजुरांच्या हि घरांत मुबलक धान्य असावें. गेल्या पंचवीस वर्षांत वस्तूंचे भाव पांच पटींवर आले असून हि आमच्याकडे सालदारांना दिलें जाणारें सहा कुडव मासिक धान्य तसें च चालू आहे. त्यामुळें सालदार सुरक्षित आहेत. त्यांना वर दिला जाणारा पैसा चौस रुपयांचा साठ रुपयांपर्यंत गेला आहे. पण धान्य कायम आहे. धान्य हा मजुरांचा विमा आहे.

( ६ ) पैसा लबाड आहे, 'आज एक बोलतो उद्यां दुसरें बोलतो' त्याला लबाड म्हणतात. रुपयाची किंमत दोन पायल्यापासून वीस पायल्या-पर्यंत वर-खालीं झालेली या पंधरा-वीस वर्षांत मीं पाहिली आहे. म्हणून मी पैशाला लबाड समजतों. ज्वारींतून मिळणारें पोषण च कमीजास्त झाल्याशिवाय ज्वारीची किंमत कमीजास्त होऊं शकत नाहीं. म्हणून तिला मी प्रामाणिक म्हणतो. लबाड जो पैसा त्याच्या हातांत कारभार सोपवणें म्हणजे सारें जीवन कलुषित करणें आहे. तसें च आज झालें आहे. म्हणून गांवांतील परस्पर-व्यवहारांत पैशाचा उपयोग कमींत कमी व्हावा.

( ७ ) सरकारनें सारा धान्यांत किंवा सुताच्या गुंड्यांत घ्यावा. गांवांत हि धान्याचें किंवा सुताच्या गुंडीचें चलन चालावें. मजुरींत धान्य मिळाल्यानंतर चलनासाठीं मी गुंडी अधिक पसंत करीन.

( ८ ) गांवांत आदर्श आरोग्य रहावें. आरोग्याचें ज्ञान सर्वांना असावें. माणसाच्या मळाचा नीट उपयोग व्हावा. रोग-निस्तरणापेक्षां रोग-निवारणाची अधिक काळजी घ्यावी. निसर्गोपचार-पद्धति सगळीकडे चालावी. स्वयं-चिकित्सालय-गृहें गांवोगांव निघावीं. औषधांचा उपयोग केल्यास आसपासच्या वनस्पतींचा उपयोग व्हावा.

(९) शेतीमध्यें सामुदायिकतेचा आणि सहकारितेचा उपयोग व्हावा. याचा उद्देश सहकारितेच्या निमित्तानें शेतींत यंत्रें शिरकवण्याचा नसावा. बैल ही हिंदुस्थानांत कृषि-देवता रहावयाची असल्यामुळें बैलाला बेकार करणारें यंत्र शेतीच्या कामांत शिरूं नये.

(१०) गोरक्षण उत्तम व्हावें. खेडेगावांतील मुलांना दूध पुरेसें मिळावें. ताक सर्वांना मिळावें. त्यानें गावचें आरोग्य राहील. शहरांना हि दूध-तूप पुरविण्याची शक्ति खेड्यांना असावी. शेतकऱ्यांनीं बैल बाहेरून विकत घ्यायचा नाहीं.

(११) कोणतें हि शेत शिंदिरींवांचून नसावें. भरपूर फळें आणि भाजीपाला शेतकऱ्यांनीं खावा. उरलेला च विकावा. विकण्याची कल्पना मुख्य नसावी.

(१२) शिक्षणाच्या नांवानें रबर, करेयाँ (रंगीत पेन्सिली) इत्यादि थोचले चालवून खेडेगावांना लुटण्याचा आरंभ होऊं नये. शिक्षणाचीं उपकरणें शक्य तितकीं खेड्यांतलीं असावीं. आणि तीं हि विद्यार्थ्यांनीं बनवलेलीं. त्यानें त्यांचा बुद्धि-विकास होऊन जीवनांतली गोडी वाढेल. शिक्षण उद्योग-मूलक, उद्योगायतन, आणि उद्योग प्रति असावें. ज्ञान आणि कर्म यांतील अभेद अनुभवावा.

(१३) खेड्यांतील न्याय आणि खेड्यांचें रक्षण यांत बाहेरच्या कुणाची दखल असूं नये. विशेष च प्रसंगीं सरकारपाशीं त्या बाबतींत मदत मागितल्यास मिळण्याची सोय असावी. पण तें अपवाद-रूप समजलें जावें. नागरांनीं आपणाला गांवकऱ्यांचे सेवक समजावें. नागरिक-शिक्षण आणि नागरिकता ग्राम-निष्ठ असावी.

या सर्वाला मी धान्य-धारणा म्हणतों, बाउल्ट धन-धारणा, जी आज भांडवलवाल्यांनीं जगभर चालवली च आहे.

(मराठी हरिजन, १६ मार्च १९४७)

: १५ :

# नई तालीम *

उद्योगामार्फत शिक्षणाचा पूज्य बापूंचा विचार समजण्यासाठीं, मला दुसऱ्यांचा वाचावा लागला नाहीं, कारण ह्या विषयाचा विचार व प्रयोग गेल्या ४ वर्षांपासून मी करीत आलों आहें. जसजसा खोल विचार आपण करूं तसतसें ह्या च निर्णयावर आपणांस यावें लागेल.

बापूंची ही योजना शिक्षण शास्त्रज्ञांना नवीन नाहीं असें आज मान्य झालें. पण वरवरची शाब्दिक समानता सोडून खोल गेल्यास त्यांतला फरक दिसून येईल. जगांतलीं सर्व दुःखें शरीर-परिश्रम सोडल्यामुळें उद्भवलीं आहेत हा बापूंचा मूळ मुद्दा आहे. पाश्चात्त्य शिक्षण-शास्त्रज्ञांना अलंकार किंवा मक्शी म्हणून उद्योग पाहिजे आहे. यंत्रसे देव कब्ज्याखालीं घेऊन बसल्यामुळें मनुष्याला परिश्रम कमी टाळतां येईल इकडे च त्यांच्या विचारांची धांव आहे.

स्वावलंबी शिक्षण म्हणजे शिक्षणानंतर विद्यार्थी आपल्या पायावर उभा राहूं शकला पाहिजे, हा माझा मुख्य अर्थ आहे. शिक्षणाचा खर्च मुलांच्या उद्योगांतून निघावा हा महत्त्वाचा पण गौण मुद्दा आहे, व तो अनुभवानें सिद्ध होणार आहे, आणि होईल च. पण शिक्षणानंतर मुलगा परावलंबी राहिल्यास आपण म्हणावें काय? पूर्वी तो परावलंबी होता व नंतर हि परावलंबी राहिला!

---

* नई तालीम सुरू होण्यापूर्वी भरविलेल्या शिक्षणपरिषदेंत झालेल्या भाषणाचा सारांश.

जपानला सक्तीच्या शिक्षणाचा अंमल करतांना अत्यंत गरिबांच्या मुलांना सूट द्यावी लागली. कारण तीं आईबापांस आर्थिक दृष्टीनें उपयोगी होतीं. आपल्याकडे असा अपवाद ठेवावयाचा तर ९० टक्के मुलांना सूट द्यावी लागेल. म्हणजे स्वावलंबनाशिवाय खेड्यांच्या शिक्षणाचा विचार च आपणांस सोडून दिला पाहिजे.

उद्योगामार्फत मुलांच्या घरच्या कमाईत आपण भर घालूं शकूं व त्यांना शिक्षण हि देऊं शकूं. मी म्हणतों, "शिक्षण" शब्दाची तरी आसक्ति कां? शिक्षण शब्द सोडून हि शिक्षण मिळणार आहे. प्रामाणिकपणें मजूरी मिळवूं लागणें, सत्संगति दिवसभर राहणें, ह्यांत शिक्षण नाहीं? आपण जर त्यांना उद्योग शिकविणार नाहीं, मजूरी देणार नाहीं, तर शिक्षण सक्तीचें करून हि मुलें आपल्याकडे येणार नाहींत.

सध्यांच्या शिक्षणाचा खेड्यांतील जीवनाशीं कांहीं च संबंध असत नाहीं. शिक्षक पुस्तकांतून ठराविक विषय शिकवितो व मुलें कंटाळतात. शिक्षक खुर्चीवर बसतो, मुलें धुळींत बसतात. उद्योगामार्फतच्या शिक्षणांत शिक्षकाला मुलांच्या भूमिकेवर येऊन काम करावें लागेल. व अमुक काम कसें करावें अशी कल्पना जाऊन त्याची बुद्धि साफ होईल. विद्यार्थ्यांत हि उत्साहाचें वातावरण निर्माण होईल.

( ग्राम-सेवा-वृत्त : ता० १०-११-१९३७ )

: १६ :

## जीवन हें च शिक्षण *

येथें येऊन तुम्हांला पाहून आणि तुमच्या कामासंबंधीं ऐकून मला आनंद होत आहे. पण मला कबूल करावें लागेल कीं येथें येण्याची माझी इच्छा नव्हती. आधीं सकाळचा वेळ ठरला होता. माझ्यामुळें त्यांत बदल करण्यांत आला आणि मी दुपारीं आलों. येथें येण्याचें याकरितां मी टाळत होतों, कीं समारंभादिकांकरितां मी स्वतःला योग्य समजत नाहीं. त्यांत मला विशेष सुचत नाहीं. दुसरें, येथलीं मुलें दर आठवड्याला एक दिवस माझ्याकडे येत असतात. त्यांना मी भेटतो आणि त्यांचा परिचय हि आहे. तिसरें, रोज सकाळीं मी सुरगांवला गांव-सफाईकरितां जात असतों. त्यामुळें येथें येण्याची इच्छा नव्हती. तरी पण आलों आणि पायीं च आलों; विचार हा कीं इथें येऊन जी सेवा करीन ती होईल फार तर एकाद पैशाची आणि वाहनानें गेलों तर खर्च होईल रुपयाचा. कामाच्या द्वारें सेवा करण्यापेक्षां मला जी तृप्ति होते तशी वाणीच्या द्वारें करण्यांत होत नाहीं. मी असा हि विचार केला कीं पायीं च गेलों तर पायीं जाण्यांत मोठेपणा आहे इतकें उदाहरण तरी मुलांना होईल.

आशादेवींनीं आतां असें सांगितलें मी एक शिक्षक आहें. हें म्हणणें अयोग्य नाहीं, परंतु मी एक विद्यार्थी आहें असें म्हणणें अधिक योग्य होईल. माझे तुरुंगाचे सोबती माझ्या विद्यार्थीपणाचे साक्षी आहेत. मी स्वतःकडे पाहतों तेव्हां स्वभावतः मी एक विद्यार्थी आहें असें मला वाटतें. अध्ययनासाठीं बाहेरच्या प्रेरणेची मला जरूर भासत नाहीं. मी आपल्या आयुष्यांत

---

* तालीमी संघ, सेवाग्राम येथील शिक्षकांसमोर दिलेलें व्याख्यान-सार

अधिक हिस्सा प्रत्यक्ष कामांत च घालविला आहे. तरी हि माझी बुद्धि नेहमीं ताजी असल्याचा अनुभव मला येतो. विचार आणि ज्ञान यांची मला नेहमीं आवड आहे. मोकळ्या हवेंत कांहींतरी शरीरश्रम करीत राहणें हें याचें मुख्य कारण मी मानतों. त्यामुळें, ज्याप्रमाणें तापलेली जमीन पावसांकरितां तयार असते त्याप्रमाणें बुद्धि नेहमीं ज्ञानग्रहणाला तयार राहते. पाऊस पडतां च ती फलद्रुप होते. शारीरिक सहनतेनें तापलेली बुद्धि ज्ञान ग्रहण करण्याकरितां उत्सुक असते आणि ज्ञानाला ती फलद्रुप करते. आम्हांला विद्यार्थीत ज्ञान भरवायाचें नाहीं, त्यांच्यांत ज्ञानाची तृष्णा उत्पन्न करावयाची आहे. ज्ञानाला पचवायचें आहे, आणि तें प्राप्त करण्याची शक्ति निर्माण करावयाची आहे. येथल्या विद्यार्थ्यांच्या ज्ञानांतील उणीवा मी जाणतों. त्या उणीवांची कारणें देखील मला माहीत आहेत. परंतु मी मानतों कीं उद्योगाच्या द्वारें शिक्षण देण्याची जी पद्धति आपण अजमावीत आहोंत, ती शिक्षणाची खरी आणि स्वाभाविक पद्धति आहे.

भाषांच्या माझ्या अभ्यासांत मी पाहिलें आहे कीं हिंदुस्थानच्या कोणत्या हि भाषेंत 'टीचणें' ( To Teach ) अशा प्रकारचा स्वतंत्र धातु नाहीं. जो आहे तो 'शिकविणें' हा आहे. शिकविणें हें शिकणें ह्या धातूचें प्रयोजक आहे. शिकविणें याचा अर्थ शिकण्यांत मदत करणें इतका च होतो. हिंदुस्थानचें हजारों वर्षांचे ज्ञान-विषयक अनुभव आणि त्यांतून निघालेले शिक्षण-विषयक सिद्धांत ह्या शिकविणें धातूंत भरलेले आहेत. शिक्षक 'टीच' करूं शकत नाहीं, तो फक्त 'शिकवूं' शकतो. विद्यार्थी स्वतः च शिकतो. उपनिषदांत वर्णन आहे कीं विद्यार्थ्याला गाई राखण्यास दिल्या. आणि गाईंना चारीत चारीत च तो शिक्षण मिळवतो. केव्हां त्याला एखादा बैल ज्ञान देतो, केव्हां एखादी चिमणी ज्ञान देते, केव्हां एखादा वृक्ष ज्ञान देतो. ज्ञान मिळाल्यामुळे त्याचा चेहरा सतेज होतो. तें पाहून गुरु म्हणतो, 'तुला ज्ञान मिळालेसें दिसतें.' तो म्हणतो, 'गुरुमुखाशिवाय ज्ञान कसें'? गुरु म्हणतो, 'तुला खरोखर ज्ञान मिळालें आहे. तुझी विद्या निर्दोष आहे.' आणि तेव्हां त्याचा गुरुकुलवास समाप्त होतो.

म्हणून अध्यापनादि नामाच्या चर्चेत मला रस वाटत नाहीं. उद्योगांत हें सर्व शिक्षण कसें येईल म्हणून जेव्हां कोणी विचारतो तेव्हां मला हसू येतें. शिक्षण घेणाऱ्याला काळजी नाहीं. देणारा मात्र चिंतेत पडला आहे! शिक्षण केवळ वाणीच्या द्वारें होत नाहीं. शिक्षणाचे ठोकळेबाज सांचे मनुष्यांत झाले आहेत. त्यांचा विचार सोडून द्या. मी म्हणतो, विद्यार्थ्याला आपलें जीवन जगूं द्या. त्याच्या बरोबर आपण हि आपलें जीवन जगूं. हें संमिलित जीवन च आपलें शिक्षण होईल. आपण बरोबर च जगूं आणि बरोबर च शिकूं. तेव्हा जीवन जगत आणि शिक्षण मिळवत

शिक्षक आणि मुलें दोघे हि एकमेकांच्या आचरणापासून शिकत असतात. दोघे हि विद्यार्थी च आहेत. जें दिलें जात नाहीं तें शिक्षण. जें घेतलें जातें, ज्याचा हिशेब ठेवला जाऊं शकतो, किंवा ज्याची कांहीं नोंद ठेवली जाऊं शकते, तें शिक्षण नाहीं. शिक्षणाची मोजदाद करता येत नाहीं. जीवन च शिक्षण आहे. कॅलरींचा रस हिशेब कागदावर नव्हे शरीरावर च दिसून पडतो. जे अनुभव, व्याख्यानें झालीं, चर्चा, रक्तांत उतरले, तें च शिक्षण. त्याचें कांहीं बाह्य प्रमाण देऊं शकत नाहीं. ज्या विषयाची मला परीक्षा द्यावी लागली त्या विषयाचें मला फारसें ज्ञान नाहीं. परंतु ज्याची परीक्षा मी दिली नाहीं त्याचें मला चांगलें ज्ञान आहे. म्हणून माझ्या अनुभवानें मी परीक्षेला कांहीं किंमत देत नाहीं. पोट साफ करण्याकरितां रेचक घ्यावें तशा ह्या परीक्षा असतात. परीक्षा दिल्या का सर्व ज्ञान साफ! म्हणून शिक्षण-शास्त्र्यांनीं उभ्या केलेल्या ह्या ढोंगांत पडण्याची जरूर नाहीं.

उपनिषदांत ज्ञानाबरोबर अज्ञानाचा हि महिमा गाइला आहे. मनुष्याला ज्ञान हि पाहिजे अज्ञान हि पाहिजे. केवळ ज्ञान किंवा केवळ अज्ञान अंधारांत घेऊन जातें. योग्य ज्ञान आणि योग्य अज्ञान यांच्या संयोगांत च अमृतत्व भरलेलें आहे. सर्व पाहिल्यास ज्ञान तर जगांत इतकें पडलें आहे कीं तें

सर्व डोक्यांत कोंबण्याचा प्रयत्न केला तर मनुष्याला वेड लागेल. म्हणून स्मरण ठेवण्याची च नाही तर विसरण्याची सुद्धां आवश्यकता आहे. विद्यार्थ्यानें घोकलेलें जसेंच्या तसें च म्हणून दाखविलें तर तें मला ऐकवत नाही त्याला. मी ग्रामोफोनचें यंत्र म्हणेन, चेतन म्हणणार नाहीं. तो चेतन असता तर थोडें तरी सोडून देता, कांहीं जोडता कि. मानसशास्त्राच्या गोष्टी करणाऱ्यांना मानसशास्त्राचें ज्ञान नाही. जो आपल्या काम-क्रोधाला जिंकूं शकला नाहीं. तो मानसशास्त्र काय जाणणार ? मानसशास्त्र तो च जाणू शकतो, जो आपल्या मनाला घड्याळा प्रमाणें बाहेर काढून पाहूं शकतो. म्हणून मानसशास्त्राच्या बातांना वाचण्याचें कारण नाहीं. सरळ काम करा. आणि त्यांतून जें कांहीं मिळेल, तें च खरें शिक्षण होईल.

[ खादी जगत, जून १९४६ ]

## : १७ :

# रचनात्मक कार्यक्रम प्रेमाचा कार्यक्रम आहे *

माझ्या प्रिय बंधूंनो,

ही शिबिराची कल्पना उपयोगी होऊं शकते. तुरुंगांत असतांना मला दोन चार वेळा बोलण्याचा प्रसंग आला तेव्हां मी म्हणालो होतो की सरकारनें आमच्या करितां हें एकटचें शिबिर उघडलें आहे. त्यांत मोठमोठ्या पुढाऱ्यांना हि हजर राहण्याची संधि मिळाली आहे. हें एक फक्त आठवड्याचें च शिबिर आहे. परंतु तेथें तर सरकारनें दोन-तीन वर्षांची सगळी व्यवस्था करून ठेवली होती. ते स्वतः च एक मोठें शिबिर होतें. त्याचा बरोबर फायदा घेण्यांत आला असता, तर बाहेर येतां च आम्ही सावधतेनें कामाला लागलो असतो. असो आज येथें एक शिबिर उघडण्यांत येत आहे. तुमच्यापैकीं पुष्कळसे लोक त्या तुरुंगांतल्या शिबिरांत हि जरूर राहून आले असतील. आणि कांहीं थोडें शिक्षण तुम्ही येथें घेतलें च असेल असें समजतो. अशा सात दिवस कार्यक्रम असलेल्या शिबिरापासून फारसा लाभ होऊं शकेल नाहीं. मराठींत म्हण आहे कीं "गड थोडी, सोंगें फार". असेंच येथें हि गत होते. तरीपण सात दिवसांत देखील थोडी बहुत माहिती दिली जाऊं शकते, तरी पाहिल्यास सात दिवसांचा अवधि फार च कमी आहे. कमीत कमी एक महिन्याचा अवधि असला पाहिजे.

वारंवार सांगण्यांत येतें कीं आपण रचनात्मक कार्यक्रमाला लागलें पाहिजे तेव्हां रचनात्मक कार्यक्रमाच्या मुळाशीं जी वस्तु आहे ती मी आज

तुमच्यापुढें ठेवतो. गोष्ट खरी आहे कीं आपला देश एक अतिशय मोठें राष्ट्र आहे. त्याची लोकसंख्या चाळीस कोटि आहे. इतकें मोठें राष्ट्र, झाली तर एक मोठी शक्ति हि होऊं शकते आणि नाहींतर कमकुवत हि होऊं शकतें. आपणा सर्वांत प्रेमभाव आणि एकी असेल तर हें च राष्ट्र एक मोठी शक्ति सिद्ध होऊं शकेल. आणि तिच्या आधारावर आम्ही आपली स्वतंत्रता अवश्य प्राप्त करूं शकूं. परंतु आपणांत आपसांत फूट असेल— आणि अशी फूट निर्माण होणें फार च सोपें आहे— तर ही च चाळीस कोटि जनता आपली दुर्बलता ठरूं शकेल.

आपणांमध्यें आज तर्‍हेतर्‍हेचे भेद विद्यमान आहेत. जातिभेद, भाषाभेद, प्रांतभेद आणि धर्मभेद ह्या भेदांमुळें आपल्यांत असंतोष हि आहे. हे सर्व भेद इंग्रजांनीं उत्पन्न केले आहेत असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. हो, त्यांच्या अस्तित्वामुळें ह्यांचा जोर जरूर वाढला आहे. परंतु हे भेद उत्पन्न झाले आहेत आमच्या च मुळें. आमच्यांत भेद तर असावेत, परंतु इंग्रजांनीं त्यांचा फायदा घेऊं नये अशी इंग्रजापासून अपेक्षा करणें चूक होईल. तर मग ते च आमच्या स्वराज्याचे पुढारी होतील. परंतु भेदांचा फायदा घेतला तर च ते येथें राहूं शकत होते. तेव्हां आपणाला हि ह्या भेदांचें उच्चाटन करावें च लागेल. अभेदाकडे अर्थात् प्रेमाकडे जावें लागेल. रचनात्मक कार्यक्रम थोड्यांत सांगायचें म्हणजे प्रेमाच्या प्रकाशनाचा, प्रेमाच्या विकासाचा, प्रेमाच्या लब्धीचा कार्यक्रम आहे. प्रेमाच्या लब्धीकरितां जो प्रयत्न, जी रचना करावी लागते तो रचनात्मक कार्यक्रम.

हिंदुस्थानचे दोन तुकडे आहेत. दक्षिण आणि उत्तर. उत्तरकडील लोकांना दक्षिणेच्या भाषा येत नाहींत. दक्षिणेकडील लोकांना उत्तरेच्या येत नाहींत. उत्तरेकडे अनेक भाषा आहेत. उत्तरेकडे च लोक कांहीं अंशीं एकमेकांच्या भाषा समजूं शकतात. हिंदीभाषी जर बंगालमध्ये गेला तर बंगाली मनुष्य त्याची भाषा समजून घेईल. हिंदीभाषी हि बंगाली भाषा थोडी-बहुत समजूं शकेल. असे च दक्षिणेकडील लोक देखील एकमेकांच्या भाषा थोडी-बहुत समजूं शकतात. उदाहरणार्थ, तामिलभाषी थोडें तेलगू समजूं आणि तेलगूभाषी तामिल समजून घेतील. परंतु उत्तर आणि दक्षिण यांच्या-

सर्व भाषाभेदामुळें एक भिंत उभी झाली आहे. त्या भिंतीचा फायदा घेऊन नुकसान केलें जाऊं शकतें. तुम्हां लोकांना माहीत असेल कीं हिंदुस्थान सरकारनें आपल्या सैन्याचे दोन विभाग केले आहेत—उत्तर विभाग, आणि दक्षिण विभाग. म्हणजे उत्तरेकडे दंगा झाला तर दक्षिणेंतून सैन्य बोलावता येतें आणि उत्तरेकडील भाषा त्यांना मुळींच समजत नसल्यामुळें ते परक्यां प्रमाणें आपल्या उत्तरेकडील बांधवांशीं लढूं शकतील. असा च प्रकार दक्षिणेंत बंड झालें तर उत्तरेकडील सैन्याला त्याच्या पारिपत्याकरितां पाठविता येईल. अर्थात् दक्षिण आणि उत्तर ह्या आमच्या दोन विभागांचा गैरफायदा घेण्याचा प्रयत्न केला जाऊं शकतो. आणि इतिहासज्ञांना माहीत आहे कीं सत्ताधाऱ्यांच्या बाजूनें असा प्रकार करण्यात हि आला होता.

ह्याकरितां उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील सर्व लोक समजूं शकतील अशा एखाद्या भाषेचा अभ्यास करणें आपल्या सर्वांना आवश्यक आहे. अर्थात् हा अभ्यास ज्ञानप्राप्तीकरितां असणार नाहीं. लोक मला विचारतात तुम्हीं लोकांनीं हिंदुस्थानी सुरू केली आहे, तिचा फायदा काय? तिच्या साहित्यांत अशी कोणती विशेषता असेल? माझें उत्तर आहे, 'त्यांत ज्ञान प्राप्तीचा उद्देश च नाहीं. ती केवळ प्रेमाच्या व्यवहाराकरितां आहे. आपसांत परस्पर प्रेम वाढवावयाचें आहे.

म्हणून दक्षिणेकडील लोकांनीं उत्तरेकडील लोकांची भाषा शिकली पाहिजे. तसें च उत्तरेकडील लोकांनीं देखील दक्षिणेकडील एखादी भाषा शिकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मला माहीत आहे कीं ह्या दुसऱ्या गोष्टी-करितां देशांत आज कांहीं चळवळ नाहीं. परंतु हिंदुस्थानी आमची राष्ट्रभाषा आहे येवढ्याकरितां दक्षिणेकडील भाषा शिकण्याचा प्रयत्न च करूं नये, हें बरोबर नाहीं.

उत्तर हिंदुस्थानांत हिंदू आणि मुसलमान दोघे हि राहतात. त्यांपैकीं कांहीं नागरी लिपींत लिहितात, कांहीं उर्दूंत लिहितात. साधारणपणें आजकाल मुसलमान उर्दूंत लिहितात. त्यांचीं वर्तमानपत्रें देखील उर्दूंत निघतात. हिंदू नागरींत लिहितात आणि त्यांचीं वर्तमानपत्रें देखील नागरींत निघतात. मी

साधारणपणें ह्याकरितां म्हणतों कीं हिंदूंचीं कांहीं वर्तमानपत्रें उर्दूमधें आणि मुसलमानांचीं कांहीं नागरींमधें निघत असतील. परंतु दोन्ही लिपी शिकण्यांत दोघे हि एकमेकांच्या हृदयापर्यंत पोंहोचूं शकतात. ह्यांतील उद्देश ज्ञानसंपादन हा नाहीं. मुख्य वस्तु प्रेम च आहे. नसें पाहिल्यास प्रत्येकांत पूर्ण प्रेमभाव असेल आणि प्रत्येक प्रांताची स्वायत्तता अहिंसेवर म्हणजे दुसऱ्या प्रांताच्या अविरोधावर उभी असेल तर स्वतःच्या भाषेशिवाय दुसरी एखादी भाषा शिकण्याची अनिवार्य जबाबदारी कोणावर असण्याची गरज नाहीं. उलट, मनांत द्वेष-भाव असतांना दुसऱ्याचीं छिद्रें शोधून काढण्याच्या दृष्टीनें देखील भाषांचें अध्ययन होऊं शकतें. तशा बुद्धिनें दोन च का दहा लिपि आणि दहा भाषा हि अवगत केल्या तरी आमच्या दृष्टीनें त्या व्यर्थ आहेत. दुसऱ्याच्या उणीवा वगैरे जाणून त्यांचा गैर फायदा घेण्याच्या गरजेनें देखील दोन्ही लिपि शिकण्याच्या चळवळींत लोक दाखल होऊं शकतात. तेव्हां महत्त्वाची गोष्ट प्रेम-भाव वाढविण्याची आहे जास्त लिपि आणि जास्त भाषा शिकण्याची नाहीं. ही गोष्ट नजरेसमोर ठेवली तर आम्हांवर अमुक भाषा किंवा लिपि जबरदस्तीने कां लादतां, असा प्रश्न उभा होणार नाहीं.

आमच्या देशांत इंग्रज येण्यापूर्वी आजच्या प्रमाणें गांव आणि शहर यामधें भिंत उभी नव्हती. आज तर जो कोणी थोडेसें शिक्षण घेतो तो गांव सोडून शहरांत जाऊन बसतो, आणि खेड्यांचें शोषण सुरु करतो. त्याला फक्त इंग्रजी भाषा शिकविण्यांत येते. त्यामुळें तो खेड्यांची कांहीं सेवा करूं शकत नाहीं. पूर्वी विद्वान देखील खेड्यांत राहात असत. आज तेथें कोणी लिहिणें वाचणें येणारा हि मनुष्य राहूं इच्छीत नाहीं. राज्यकर्त्यांनीं राज्यकारभार चालविण्याकरितां एक नौकरीपेशा वर्ग निर्माण केला तो ह्याकरितां कीं खेड्यांना लुटण्याच्या कामांत इंग्रजांची ते मदत करूं शकतील.

याचा परिणाम हा झाला कीं आमच्या साहित्याचा देखील लोकशिक्ष-णाच्या कामात कांहीं उपयोग होऊं शकत नाहीं. येथें साहित्य वगैरे बाबतींत तुमच्या ज्या चर्चा चालतात, खेड्यांत त्या कोण वाचतें ? आमच्या भाषेंत इतके भारतानें निघालें आहेत, पण खेड्यांत बरोबर कोणतें पुस्तक पोंचतें आहे

असें विचारलें तर कांहीं उत्तर मिळत नाहीं. उलट तुळशीरामायणासारख्या संतांच्या कृति खेड्यांमधें कधींच्या पोंहोंचल्या आहेत. मी ऐकतों कीं रवींद्रनाथां-सारख्या महाकवीची कविता देखील बंगालमध्यें खालच्या लोकांपर्यंत न पोहों-चली आहे. ती खेड्यामधें जाऊं शकली नाहीं. परंतु संतांची वाणी तिथें पोहों-चली आहे. याचें कारण हें च आहे कीं सध्यां साहित्य सुशिक्षित लोकांकरितां लिहिण्यांत आलें आहे. सर्वसाधारण जनतेशीं त्याचा कांहीं संपर्क होऊं शकलेला नाहीं.

घोर तिमिर घन निबिड निशीथे।
ओ पीडित मूर्च्छित देशे।
जागृत छिल तव अविचल मंगल
ओ नत नयने अनिमेषे।

किती सुंदर काव्य आहे हें! मात्र त्याची भाषा सर्व-साधारण लोकांची भाषा नाहीं. संतांची भाषा जनतेची भाषा होती. कारण कीं ते सर्व-साधारण जनतेचे होते, त्यांच्यांतून च निघाले होते. आमचें साहित्य मात्र प्रथम शहरांकरितां निर्माण होतें, त्यानंतर खेड्याकरितां. याचा अर्थ हा कीं इंग्रज आल्यानंतर च हिंदुस्थानांत शहर आणि खेडें असे दोन कृत्रिम विभाग तयार झाले आहेत.

तुम्हीं खेड्यांपासून एक रुपया घेतला तर त्या कर्जापैकीं कांहीं तरी फेडलें हें पाहिजे च. कमींत कमी त्यांना आठ आणे तर परत केले पाहिजेत ना? इमारत ज्या पायावर उभी आहे तो पाया तर आपण मजबूत ठेवला पाहिजे ना? आणि खेडें हा तो आमचा पाया आहे. त्यांचें सुख-दुःख आमच्यापासून वेगळें कसें असूं शकेल? म्हणून खादी, ग्रामोद्योग इत्यादींची अतिशय आवश्यकता आहे. खेडें आणि शहर हा भेद नाहींसा करण्याचा हा च खरा कार्यक्रम आहे. शहरवाल्यांची वृत्ति जर ग्रामीण होऊं शकली, तर त्यांना समजून येईल कीं खेडें आपली आई आहे. आणि त्याकरितां आपल्याला जगायचें आणि मरायचें आहे. ह्या दृष्टीनें पाहिल्यास खादी आणि ग्रामोद्योगाचें एक नवीन चित्र आपणाला दिसतें. ह्याचे दुसरे ही पैलू आहेत. परंतु हा एक असा पैलू आहे, जो सहज समजू शकतो.

आणखी एक गोष्ट स्त्री आणि पुरुष यांच्या भेदाची आहे. मानलें कीं इतर राष्ट्रांत स्त्रियांचे स्थान पुरुषापेक्षा गौण आहे परंतु दुसऱ्या राष्ट्रांत काय आहे याचा आपणाला विचार करण्याचें कारण नाहीं. आणि आपला दोष दूर केला तर दुसरे हि आपोआप च सुधारतील. आपल्या येथें शास्त्रकारांनीं अशीं वचनें हि आहेत कीं ज्यांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें स्थान देण्यांत आलें आहे. परंतु आज आपल्या येथ हि स्त्री पुरुषांत भेद आहेत, हें कोणी नाकारूं शकत नाहीं. ह्या दोघांमधील सर्व कृत्रिम भेद आपण नाहींसे केले च पाहिजेत.

असा च स्पृश्य अस्पृश्य भेद हि आतां आपण नाहींसा केला च पाहिजे. म्हणून च मी सुरवातीला विचारलें कीं ह्या शिबिरांत हरिजन किती आहेत (सांगण्यात आलें कीं अकरा हरिजन आणि तीन मुसलमान आहेत. एकूण दोघेंही स्वयंसेवक आहेत) आपला व्यवहार असा असला पाहिजे कीं, आपल्यांत कांहीं भेद च राहणार नाहीं. माझ्या मतें शक्य तर प्रत्येकानें एक एक हरिजन मुलगा नोकराप्रमाणें नव्हे तर औरस पुत्राप्रमाणें आपल्या जवळ ठेवला पाहिजे. घरांत तीन मुलें असतील तर चार समजून त्याची पूर्ण जबाबदारी उचलली पाहिजे. ऐवढें मला लोकं विचारतात कीं सांगा, आम्ही घरीं राहून च कांहीं देशसेवा करूं शकतो कां? मी सरळ सांगतो कीं एक एक हरिजन मुलगा घरीं पाळा. नव्हे त स्त्रियांच्या मागे लपून आपली वृत्ति लपवितात म्हणून मी म्हणतो कीं आतां स्वराज्याचा कार्यक्रम देशील थावन्या सारखा आला आहे. अस्पृश्यता निवारण्याच्या कामाला जितका विलंब होईल तितका च विलंब स्वराज्य मिळविण्याला हि लागूं शकेल. आपले पुढारी आम्हाला सांगतात कीं हिंदू मुसलमानांचा भेद इंग्रजामुळें झाला आहे. मी विचारतों, शिवाशीव दूर करण्यांत इंग्रज कोणती आडकाठी आणीत आहेत? आणि जर आडकाठी आणीत नाहींत तर आपण हा भेद हळूहळूं दूर करण्याची गोष्ट करूं तर तुम्हाला स्वराज्य हि हळूहळू मिळण्याची गोष्ट ऐकावी लागेल. मवाळ पक्षाचे पुढारी पं. नेहरूंना म्हणत आहेत कीं जरा आम्हाला संधि द्या, थोडें सबुरीनें घ्या. त्याच प्रमाणें आम्ही हि सबुरीनें घेण्याची गोष्ट हरिजनांना सांगूं तर आंबेडकर आम्हाला म्हणतात त धर्मानें ठीक च आहे कीं ह्यांची नियत च खोटी

आहे. इथें महाराष्ट्रांतल्या हरिजनांत आंबेडकरांची च चळवळ आहे. ती कां? त्याच कारण कीं आंबेडकर त्यांच्यातून च निघाले आहेत. आम्ही इंग्रजांना शिव्या देऊं शकलों, पण महार आम्हांला हि असल्या शिव्या देऊं शकतात. मी हरिजन असतो तर आतांपर्यंत काय करून बसलों, सांगतां येत नाहीं. माझी अहिंसा हि कदाचित उन्मळून गेली असती. किती लाजिरवाणी स्थिति आहे ही? मांजर आणि कुत्रें देखील आपल्याजवळ येऊं शकतें, परंतु आपल्या-हरिजन बंधूंना मात्र अनेक तऱ्हेच्या बंधनांत राहणें सक्तीचें करण्यांत आलें आहे. हें सर्व सहन करणें शक्य आहे काय?

म्हणून रचनात्मक कार्यक्रमांत अस्पृश्यता-निवारणाचें स्थान मोठें आहे. रचनात्मक कार्यक्रम सर्वच्या सर्व प्रेमाचा कार्यक्रम आहे. ह्या दृष्टीनें ह्या कार्यक्रमाकडे आपण सर्व लोकांनीं पाहिलें पाहिजे, आणि जितका जास्त अंमल करूं शकूं तितका करण्याचा पूर्ण प्रयत्न केला पाहिजे.

(खादी जगत्, फेब्रुआरी १९४५)

: १८ :

# हिंसेतून अहिंसेकडे *

" प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें हिंदुस्थानच्या प्राकृतिक आणि सांस्कृतिक स्वभावांत–स्वभावाचे असे दोन भेद मी सोईसाठी करतों–अहिंसेबाबत कांहीं अनुकूल अशी विशेषता आहे काय ? " ह्या वाक्यांनीं आपल्या समोर ठेवलेल्या प्रश्नाचा भावार्थ समजला पाहिजे. तत्त्वतः किशोरलालभाईंनीं सांगितलें तें उघड च आहे. अमुक एका देशांतील जनता प्रकृति स्वभावानें अहिंसक आणि दुसऱ्या देशांतील हिंसक असा तात्त्विक भेद करतां येत नाहीं. प्रकृति सर्वत्र एक आणि त्रिगुणात्मक आहे. सत्त्व, रज, तम सगळीकडे च पहायला सांपडतात. ह्या देशांत जन्मल्यानें च कांहीं विशेषता अंगीं येते असें नाहीं. येथल्या हवापाण्यांत च कांहीं खास गुण सांगतां येत नाहीं.

तथापि हिंदुस्थान आणि युरोप यांच्यांत तत्त्वतः भेद नसून हि ह्या दोहोंच्या आजच्या स्वभावांत भेद आहे. युरोपांत आतां अलीकडे सुरू होऊं लागलेले प्रयोग करून हिंदुस्थानचा आजचा स्वभाव घडला आहे. बुद्ध आणि कृष्ण यांच्या स्वभावांत ज्या प्रकारचा भेद असतो तसला भेद हिंदुस्थान आणि युरोप यांच्या स्वभावांत आहे. हें थोड्या विस्तारानें स्पष्ट करतो.

किशोरलालभाईंनीं सांगितलें कीं मोठी लोकसंख्या आणि विशाल देश ही अहिंसेच्या दृष्टीनें आमची एक अनुकूल विशेषता आहे. आमची संख्या मोठी कां आहे ? इतकी मोठी संख्या आणि एवढा मोठा देश असण्याचें कांहीं विशेष कारण अवश्य असलें पाहिजे. तें कारण आपल्याला वर्तमान काळांत

---

* २१ जून १९४० च्या गांधी सेवा संघाच्या बैठकींतील भाषण.

सापडायचें नाहीं त्याचा शोध आपल्याला प्रागैतिहासिक कालांत करावा लागेल इतिहासाच्या पुस्तकांत तो सापडणार नाहीं. एका युरोपांत आपण अनेक लहान लहान राष्ट्रें पाहतो. जर्मनीची लोकसंख्या सातआठ कोटींची, इंग्लंडची चार कोटींची आणि इतर देशांची तर दोन दोन, तीन-तीन कोटींची च आहे मग आमची लोकसंख्या तीस-चाळीस कोटींची कशी झाली ? आमची संतानोत्पादनाची शक्ति तर कांही अधिक नाहीं आम्ही हिंसेचे आणि वेगळें राहण्याचे अनेक प्रयोग करून आणि त्यांत असफल झाल्यावर आमचें एक मोठें राष्ट्र बनविलें. हा सारा प्रागैतिहासिक इतिहास आहे तुम्ही त्याला काल्पनिक इतिहास म्हणू शकतां परंतु आहे तो इतिहास च

आज युरोपांत चाललेल्या युद्धांत जीं राष्ट्रें लढत राहिलीं आहेत त्यांच्यांत आणि आमच्या येथील प्रांतांत काय फरक आहे ? उलट मी तर म्हणतों कीं इथें, उदाहरण च घ्यायचें तर, कर्नाटक आणि महाराष्ट्र यांच्यांत जितका फरक आहे त्यापेक्षां फ्रान्स, इंग्लंड आणि जर्मनी यांच्यांत तो कमी च आहे त्यांची लिपि सुद्धां एक आहे धर्म आणि संस्कृति तर एक आहेत च परंतु असें असून ते आपापलें वेगळें छोटें राष्ट्र मानतात आमच्या इथें तर आठदहा प्रमुख लिप्या आहेत प्रत्येक लिपी शिकण्यास दोनतीन महिने निघून जातात इतकें असून हि आम्ही आमचें एक राष्ट्र मानतों

"हिंदुस्थानात बाहेरच्यांचें आक्रमण कसें यशस्वी झालें ? याचें एक च उत्तर मला माहीत आहे आणि तें म्हणजे लोभ मनुष्याचा मुख्य आणि विशेष दुर्गुण व शत्रु लोभ च आहे कामक्रोध इत्यादि हि आहेत मनुष्य त्यांना थोडें फार संयमांत ठेवूं शकला आहे परंतु त्यानें लोभ मुळीं च जिंकला नाहीं मनुष्यांत पशूंपेक्षां लोभाची मात्रा अधिक आहे आम्हीं आमचें एक राष्ट्र तर बनविलें, परंतु त्याबरोबर च लहान लहान जाति हि निर्माण केल्या त्यांत आमचा संकुचितपणाचा भाव प्रगट झाला तो हि लोभ-मूलक च आहे

हिंदुस्थान हा लोभामुळें च परतंत्र झाला आहे, हिंदुस्थानला मुसलमानांनीं अथवा इंग्रजांनीं जिंकलें नाहीं त्यांनीं आम्हाला जिंकलें आहे

मुद्धां आमची विशेषता च प्रगट होते. कांहीं लोक म्हणतात, "लाख-सवालाख इंग्रज आणि तीस चाळीस कोटि हिंदी लोकांवर राज्य करतात ? इतक्या शेळ्यांमध्यें सुद्धां तितक्या धनगरांना पाळणें जड जाईल." एक लाख मेंढ्यांकडून चाळीस कोटि मेंढ्या वावरल्या जाणार नाहींत. कारण त्या पशु आहेत. पण आम्हांला अधिक व्यवस्थापकांची जरूर च नाहीं. कारण हिंदुस्थान व्यवस्थित आणि सभ्य लोकांचा देश आहे. पूर्वी सुद्धां आम्हांला व्यवस्थापकांची जरूर नव्हती. आणि आज हि नाहीं. अनुभवानें आमच्या रक्तांत तेवढी सभ्यता मुरलेली आहे. आपसांत लढत राहणें लाभाचें नाहीं, हिंसेंत कल्याण नाहीं, हें ज्ञान राष्ट्रीय दृष्टीनें आम्हांला झालें आहे— जरी अजून हिंसेवरील आमचा विश्वास पुरा उडून गेलेला नाहीं.

व्यक्ति म्हणून इथली आणि दुसऱ्या राष्ट्रांतली व्यक्ति सारखी च आहे. परंतु जमात म्हणून पाहिल्यास आमच्या राष्ट्रांत विशेषता आहे.

आम्ही हजारो वर्षांपासून परतंत्र आहोंत यांचें हि एक विशेष कारण आहे. आम्ही अल्पसंतोषी असून स्वतंत्र होऊं इच्छीत नाहीं म्हणून परतंत्र आहोंत. ह्या विशेषणाबद्दल अभिमान हि वाटणें संभव आहे. "गुलामगिरीचा अभिमान" ही वस्तु तुम्हाला विचित्र वाटेल. आम्हीं आमचे प्रांत वेगवेगळीं राष्ट्रें मानून घेतलें असतें तर कदाचित् त्यापैकीं कांहीं प्रांत "स्वतंत्र राष्ट्र" म्हणून दिसले असते. परंतु आमचा संकल्प होता कीं आम्ही भारत एक राष्ट्र सिद्ध करूं; मग किती हि काळपर्यंत परतंत्रता सहन करावी लागली तरी चालेल. लहान लहान राष्ट्रें कायमचीं स्वतंत्र राहूं शकत नाहींत हें आपण आज प्रत्यक्ष पहात आहोंत. आम्ही छोटीं छोटीं राष्ट्रें बनवून अल्पसंतोषी राहण्याचें पत्करलें नाहीं, म्हणून आज परतंत्र दिसतों. त्या दृष्टीनें आमची परतंत्रता हि आमच्या राष्ट्रीयत्वाचें चिन्ह आहे. आम्हीं एक कुटुंब म्हणून राहण्याचा निश्चय केलेला आहे.

मी हें सर्व व्यक्त स्वरूपांत तुमच्यासमोर मांडून राहिलों आहें. आमच्या जनतेनें अशा प्रकारें व्यक्त स्वरूपांत विचार करून हें ठरविलें, असें नाहीं. जनता असा विचार करीत नाहीं. अनुभवानें हें तत्त्व तिच्या ध्यानांत मुरलें आहे.

आमच्या देशांतील जनता वास्तविक पाहतां गुलाम झाली च नव्हती. आमचे राजे बदलले, राज्यें बदलली, हिंदू गेले त्यांच्या ठिकाणीं मुसलमान आले. त्यानंतर पुनः हिंदू आले. तरी हि जनतेच्या स्थितींत कांहीं च फरक पडला नाहीं. जोंपर्यंत आमच्या ग्राम-पंचायती कायम होत्या तोंपर्यंत जनता स्वतंत्र च होती. ग्राम-पचायती नाहींशा झाल्यापासून आम्ही खरोखर परतंत्र झालों.

सारांश, अनुभवानें आम्ही हें समजून गेलों कीं संतोषानें आणि आनंदानें रहावयाचें असेल तर विनाकारण लहान लहान राष्ट्रें बनवितां कामा नयेत, आणि आपापसांत लढतां कामा नये, अहिंसेचा हा सिद्धांत अनुभवानें आमच्या गळीं उतरला आहे. शास्त्रीय रीतीनें आम्ही त्यावर विचार केलेला नाहीं. आणि तो आचारांत सिद्ध करणें तर अजून बाकी च आहे.

अहिंसेचा विचार करतांना आपणाला आहाराचा प्रश्न मजीबात सोडून चालायचें नाहीं निर्मांस आहार अहिंसेला अवश्य अनुकूल आहे. तेवढ्यानें च माणूस अहिंसक बनतो असें नाहीं पण आहाराचा योग्य उपयोग करून घेतला तर अहिंसेला तो पोषक होऊ शकतो यांत शंका नाहीं हिंदुस्थानांत मांसाहाराचा त्याग हि आमच्या प्रकृतिस्वभावानें च झाला असें नाहीं. आम्ही आमचा आहार हि अनुभवानें निश्चित केला आहे

आजची युरोपची दशा पहा. चारशें वर्षांपूर्वी तिथें जितकें मांस मिळत होतें तितकें आता मिळत नाहीं तिथें लक्षावधि प्राण्यांची खाण्यासाठीं कत्तल केली जाते दक्षिण अमेरिकेंतून मांसाचे डबेच्या डबे भरून येतात. रोजच्या रोज आम्ही लाखों जनावरें खाऊं लागलों तर तीं किती दिवस पुरतील? जनावरांची संख्या कमी होऊं लागली आहे म्हणून मांस हि त्या मानानें कमी मिळूं लागलें आहे हें पाहून आता डॉक्टर लोक दुधाची विशेषता सांगूं लागले आहेत ते हि आता आमच्याप्रमाणें दुधाचा महिमा गाऊं लागले आहेत

हा सगळा अनुभवाचा परिणाम आहे. हिंदुस्थाननें ह्या सार्‍या अनुभवानंतर च दुधाची पवित्रता मानली आहे. दूध पवित्र का? तर आम्हीं

त्याच्या आधारानें मास सोडू शकतों म्हणून. दुधानें आमच्यावर जो उपकार केला आहे तो भाजीपाल्यानें केला नाहीं सत्यासारखें फळ सात्विक असो, परंतु मास सोडविण्याची शक्ति त्यात नाहीं. म्हणून दूध प्राणिजन्य असून हि कृतज्ञतापूर्वक आपण त्याला पवित्र मानतो ।

सारांश, हिंदुस्थान हा एक फार प्राचीन देश आहे आम्हीं प्रागैतिहासिक काळीं हिंसेचे अनेक प्रयोग केले आहेत त्याच्या परिणामीं अहिंसा आमच्या रक्तात दाखल झाली आहे जर आपण ह्या अहिंसेचें संगोपन केलें नाहीं तर आपली हजारों वर्षांची साधना व्यर्थ होऊन आपण भित्रे बनूं, आणि सभय आहे, पारतंत्र्यांत च आपल्याला आनंद वाटू लागेल

: १९ :

## ग्रामसेवकांना सूचना *

वीस वर्षांपासून मीं कांहीं केलें असेल तर तें सार्वजनिक काम च केलें आहे. विद्यार्थी-अवस्थेंत होतों तेव्हां हि माझी प्रवृत्ति सार्वजनिक सेवेची च होती. तेव्हां सार्वजनिक सेवेशिवाय मीं दुसरें कांहीं केलें नाहीं किंवा दुसरें कांहीं करण्याची इच्छा केली नाहीं, असें तुम्ही म्हणूं शकतां. परंतु ज्या प्रकारची सार्वजनिक सेवा इतर लोकांनीं केली आहे, तशी मीं केली नाहीं. सकाळीं एका गृहस्थानें मला विचारलें, 'तुम्ही कांग्रेसमध्यें जाणार नाहीं का ?' मी म्हणालों, 'मी तर कांग्रेसमध्यें कधीं गेलों च नाहीं.' मी कांग्रेसच्या प्रवृत्तीचा अनभिज्ञ नाहीं, परंतु जे मूकसेवा करूं इच्छितात त्या लोकांमधील मी आहें. पण माझी सेवा मी इच्छितों तितकी मूक होऊं शकलेली नाहीं. सेवेचा माझा उद्देश भक्ति हा आहे. भक्तिभावानें च मी सेवा करतों आणि वीस वर्षांपासून तशी सेवा मी करीत आहें.

मी एक सूत्र बनविलें आहे – 'सेवा व्यक्तीची, भक्ति समाजाची.' व्यक्तीच्या भक्तींत आसक्ति वाढते, म्हणून भक्ति समाजाची केली पाहिजे. सेवा समाजाची करूं पाहूं तर कांहीं च होऊं शकणार नाहीं. आईची सेवा करणारा मुलगा सर्व जगाची सेवा करतो. अशी माझी धारणा आहे. सेवा प्रत्यक्ष वस्तूची च होऊं शकते, अप्रत्यक्ष वस्तूची नाहीं. समाज अप्रत्यक्ष, अव्यक्त किंवा निर्गुण वस्तु आहे.

---

* दिल्लीच्या हरिजन कॉलनींतील कार्यकर्त्यांसमोर दिलेलें भाषण.

आजकाल सेवेची कांहीं निराळी च पद्धति पाहण्यांत येते. सेवेकरितां आम्हांला विशाल क्षेत्र पाहिजे. परंतु खरी सेवा करायची असेल, सेवामय व्हावयाचें असेल, स्वतःला सेवेंत झिजवायचें असेल, तर पुराण्या खेड्यांत जा. मला एक गृहस्थ म्हणाले, 'बुद्धिशाली लोकांना तुम्ही म्हणतां, खेड्यांत जा. विशाल बुद्धीच्या विस्ताराकरितां लांब रुंद क्षेत्र तेथें कोठें आहे?' 'मी म्हणालों, 'उंची तर आहे, अनंत आकाश तर आहे!' खेड्यांत लांब प्रवास करूं शकत नाहीं, परंतु उंच तर प्रवास करूं शकतों, खोल तर जाऊं शकतों? संत इतके उंच जात कीं तितकें उंच मोठा विज्ञानवेत्ता हि जाऊं शकणार नाहीं. खेड्यामध्यें लांब-रुंद नाहीं परंतु उंच प्रवास आपण करूं शकतों. तेथें उंचांत उंच जाण्याला वाव आहे. उंच आणि खोल सेवा तेथें रूप होऊं शकते. आपली ती एकाग्र सेवा प्रथम श्रेणीची होईल आणि फलदायी देखील होईल.

राष्ट्राचे सर्व प्रश्न खेड्याच्या व्यवहारांत येऊन जातात. जितकें समाज-शास्त्र राष्ट्रांत आहे, तितकें एका कुटुंबांत हि आहे. मग खेड्यांत तर तें भरणार च. समाज-शास्त्राच्या अभ्यसनाकरितां गांवांत पुष्कळ वाव आहे. प्रौढ विवाह प्रचलित झाल्यामुळें हिंदुस्थान सुधारलें आणि बाल-विवाहामुळें बिघडलें, असें मानण्यांत मी बुद्धीचा अभाव पाहतों. प्रौढ विवाहांत च नेहमीं वैवाहिक आनंदाचा लाभ दिसून येतो असें कांहीं नाहीं. पतिपत्नी सुखासमाधानानें राहत आहेत अशीं बाल-विवाहाचीं हि उदाहरणें पाहण्यांत आहेत. विवाह-संस्थेंत संयमाची पवित्र भावना कशी येईल, हा प्रश्न आपण सोडविला पाहिजे. विवाहाचा उद्देश हा आहे.

अशा च प्रकारें हिंदुस्थानच्या राजकारणाचा नमुना देखील खेड्यांत पुरेसा मिळतो. फक्त एका च खेड्याच्या जनतेला हि आपण स्वावलंबी करूं शकलों तर पुष्कळ झालें. खेड्यांतील स्त्री-पुरुषांत राहून तुम्ही त्यांच्याशी एकरस व्हाल अशी मी आशा करतों. परंतु तेथे गेल्यावर त्यांच्याबरोबर तुम्ही हि दरिद्र-नारायण झालें पाहिजे, मूर्ख-नारायण नाहीं. आपल्या बुद्धीचा त्यांच्या हितावरितां उपयोग करायचा आहे. निरहंकार व्हायचें आहे. खेड्यांतील लोक

सर्व अंगर्दी मूर्ख च असतात असें समजूं नका. हिंदुस्थानच्या खेड्यांचा अनुभव इतर देशांतील खेड्यांसारखा थोड्याशा शतकांचा नाहीं, कमींत कमी वीस हजार वर्षांचा त्यांचा अनुभव आहे. त्या अनुभवाचा आपण फायदा घेतला पाहिजे.

दुसरा एक प्रश्न आहे. सुधारक गांवाला बिघडवीत आहेत असें सवर्ण हिंदूंना वाटतें. आपला हरिजनांशीं जितका संबंध येतो तितका सवर्णांशीं येत नाहीं. सवर्ण ज्यामुळें आपल्या कामांकडे ओढले जातील आणि त्यांच्या शंका दूर होतील त्या बाबतींत आपण कांहीं विचार केला आहे काय ?

अस्पृश्यता-निवारणाचें काम आपणाला दोन तऱ्हेनें करावयाचें आहे. एक तर हरिजनांच्या आर्थिक अवस्थेंत आणि मनोवृत्तींत सुधारणा करून, आणि दुसरें, हिंदू धर्माची शुद्धि करून म्हणजे त्याला त्याच्या खऱ्या स्वरूपांत आणून. अस्पृश्यता मानणारे सर्व दुर्जन आहेत, असें कांहीं नाहीं. ते अज्ञानांत आहेत असें फार तर म्हणूं शकतो. त्यांच्या विचारांत संकीर्णता आहे. परंतु प्रत्येक मनुष्याच्या शरीरांत आत्मा हा आहे च. म्हणून सनातनी लोकांशीं प्रेमानें वागलें पाहिजे. त्यांचा विरोध करावयाला नको. आपण तेथें गुपचूप सेवा केली पाहिजे. एखादा मनुष्य हरिजनांना शिवत नाहीं, परंतु तो दयाळु आहे. आपण त्याच्याकडे गेलें पाहिजे. त्याच्या दयाळूपणाचा फायदा घेतला पाहिजे. त्याची मर्यादा समजून घेऊन त्याच्याशीं बोललें पाहिजे. ह्यामुळें थोड्या दिवसांत त्याचें हृदय शुद्ध होऊन त्याच्या अंतरांतील अंधार दूर होईल. सूर्याप्रमाणें आपल्या सेवेचा प्रकाश स्वतः होऊन तेथें पोहोंचेल. आपल्या प्रकाशावर आपला विश्वास असला पाहिजे. प्रकाश आणि अंधार यांची लढाई तर एका क्षणांतच संपते.

परंतु आपली पद्धति अहिंसेची असली पाहिजे, प्रेमाची असली पाहिजे. दरवाजा ढकलून मी आंत जाणार नाहीं. ती माझी मर्यादा आहे. सूर्याच्या किरणांचें अनुकरण करीन. भिंतींत, छपरांत, दारांत जेथें थोडें कांहीं छिद्र मिळेल, त्यांतून किरणें गुपचूप आंत जातात. ही च दृष्टि आपण ठेवली पाहिजे. आपल्या जवळ जे विचार आहेत, तो आपला प्रकाश आहे. एखाद्या गुहेंत

असलेला एक लाख वर्षांचा अंधार हि एका क्षणांत प्रकाशानें दूर होईल. परंतु हें होईल अहिंसेच्या च पद्धतीनें. सनातन्यांना शिव्या देणें ही अहिंसेची पद्धति नाहीं. आपण अगदीं तोलून शब्द सांडोतून काढले पाहिजेत. आपल्या वाणीची कटुता गेली तर त्यांचा हृदय-पालट होईल. ही लढाई आजची नाहीं, अतिशय जुनी आहे. संतांचें जीवन आपल्या विरोध्यांशीं झगडण्यांत च खर्च झालें. परंतु त्यांच्या झगडण्याची पद्धति प्रेमाची होती. ज्या ईश्वरानें आपणाला बुद्धि दिली आहे त्यानें च आपल्या प्रतिपक्षांना हि बुद्धि दिली आहे. पंचवीस वर्षांपूर्वी आपण देखील त्यांच्या सारखे च अस्पृश्यता पाळत होतों. आपल्या संतांनी आत्मविश्वासानें काम केलें आहे. वाद-विवादांत पडणें आपलें काम नाहीं. आपणाला सेवा करतां करतां च खतम झालें पाहिजे. आपल्या प्रचार-कार्याचें सेवा हें च खास साधन आहे. दुसऱ्याचे दोष दाखविण्याचा, आणि आपले विचार पुढें ठेवण्याचा मोह आपण सोडला पाहिजे. आई आपल्या मुलाचे दोष थोडे च दाखविते, ती तर त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करते, आणि नंतर दोष दाखविते. प्रेमाच्या सेवेचा हि असा च परिणाम होतो.

१९२० मध्यें टिळक शरीर-रूपानें आपल्या मधून लोप पावले. त्यावेळीं मी मुंबईला गेलों होतों. चार-पांच दिवस आधीं च गेलों होतों. परंतु डॉक्टरांनीं सांगितलें कीं सध्यां कांहीं भीति नाहीं. म्हणून मी साबरमतीला एका कामासाठीं जाण्याला निघालों. मी अर्ध्या रस्त्यांत गेलों नसेन तों मला लोकमान्यांच्या मृत्यूची वार्ता कळली. माझ्या अत्यंत निकटच्या आत्मीय सहकारी आणि मित्राच्या मृत्यूचा जसा परिणाम होऊं शकेल तसा च लोकमान्यांच्या मृत्यूचा माझ्यावर अतिशय खोल परिणाम झाला. त्या दिवसापासून जीवनांत एक नवीनपणा आला. ,मला वाटलें, जणूं काय अत्यंत प्रेम करणारा कुटुंबांतील एक आत्मीय च गेला. मी सांगतों ह्यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. आज इतकीं वर्षे झालीं, आज पुन्हां त्यांचें स्मरण करायचें आहे. लोकमान्यांच्या चरणीं स्वतःची नम्र श्रद्धांजली माझ्या खोल श्रद्धेमुळें मी अर्पण करीत आहें.

टिळकासंबंधीं मी कांहीं सांगूं लागतों तेव्हां माझ्या तोंडांतून शब्द निघणें कठिण होतें. मी गद्गद होऊन जातों. साधुसंतांचें नांव घेतां च माझी जी स्थिति होते, ती च ह्या नांवानें हि होत आहे. जणूं काय त्यांच्या स्मरणांत च ही शक्ति भरलेली आहे. रामनाम च पहाना. किती जड जीवांचा त्या नामाच्या स्मरणानें उद्धार झाला आहे ! त्याची गणति करतां येईल काय ? अनेक चळवळी, अनेक ग्रंथ, इतिहास, पुराणें ह्यांतील कोणत्या हि वस्तूचा जितका परिणाम झाला नसेल तितका रामनामानें झालेला आहे आणि होत आहे. राष्ट्रांचा उदय झाला आणि अंत झाला, राज्यांचा विकास झाला आणि लय झाला, परंतु रामनामाची सत्ता अबाधितपणें चालली आहे. ज्यांनीं पवित्र कामें केलीं, आपलें शरीर परमार्थांत झिजविलें, त्यांच्या नावांत असें सामर्थ्य येत असतें.

ह्यांत च मनुष्याची विशेषता आहे. आहार-विहार इत्यादि इतर सर्व गोष्टी मनुष्यांत आणि पशूंत समान च आहेत. परंतु मनुष्य जसा पशु किंवा पशूपेक्षां हि नीच बनूं शकतो, तसा पराक्रमानें, पौरुषानें, तो परमात्म्याच्या निकट हि जाऊं शकतो. मनुष्यांत ह्या दोन्ही शक्ति आहेत. पशूची

शक्ति मर्यादित आहे. त्याच्या वाईटपणाची हि मर्यादा आहे. परंतु मनुष्याच्या पतनाची किंवा उत्थानाची कांहीं मर्यादा नाहीं. तो पशूपेक्षां हि खालीं पडूं शकतो आणि इतका वर चढूं शकतो कीं देव च बनून जातो. ज्या लोकांनीं आपलें जीवन सर्व जगाकरितां अर्पण केलें आहे, त्यांच्या नांवांत फार मोठी पवित्रता येते. त्यांचें नांव च ताऱ्याप्रमाणें समोर राहतें. आपण रोज तर्पण करतांना म्हणतों, 'वसिष्ठं तर्पयामि, भारद्वाजं तर्पयामि, अत्रिं तर्पयामि.' ह्या ऋषींसंबंधीं आपणाला काय माहिती आहे ? सात-आठशें पानांत त्यांचें चरित्र लिहितां येईल काय ? एक पान देखील लिहितां येणार नाहीं. परंतु त्यांचें चरित्र नसलें, तरी वसिष्ठ हें नांव च पुरेसें आहे. माझी अशी श्रद्धा आहे कीं शेंकडों वर्षानंतर टिळकांचें नांव देखील असें च पवित्र मानलें जाईल. त्यांचें जीवन-चरित्र वगैरे फारसें राहणार नाहीं, परंतु इतिहासाच्या आकाशांत त्यांचें नांव मात्र ताऱ्याप्रमाणें चमकत राहील.

आपण महापुरुषांच्या चारित्र्याचें अनुसरण केलें पाहिजे, त्यांच्या चरित्राचें नाहीं. वास्तविक, महत्त्व चारित्र्याचें आहे. शिवाजी महाराजांनीं शंभर-दोनशें किल्ले बांधून स्वराज्य मिळविलें म्हणून आज हि तसे किल्ले बांधल्यानें स्वराज्य प्राप्त होईल असें समजणें चूक होय. परंतु ज्या वृत्तीनें शिवाजीनें काम केलें त्या वृत्तीनें आपण आज हि स्वराज्य मिळवूं शकतों. म्हणून च मी म्हणालों कीं त्या वेळचें रूप आपल्या कामाचें नाहीं, त्याचें आंतलें रहस्य आपल्या उपयोगाचें आहे. चरित्र उपयोगाचें नाहीं, चारित्र्य उपयोगाचें आहे. कर्तव्य करीत असतां त्यांची जो वृत्ति होती ती आपल्याला उपयोगाची आहे.

एक गोष्ट प्रसिद्ध आहे. कांहीं मुलांनीं 'साहसी प्रवासी' नांवाचें एक पुस्तक वाचलें आणि लगेच ठरविलें कीं जसें त्या पुस्तकांत लिहिलें आहे तसें करावयाचें. त्या पुस्तकांत वीस पंचवीस तरुण होते. हे देखील इकडून तिकडून वीस-पंचवीस गोळा झाले. पुस्तकांत लिहिलें होतें कीं ते एका जंगलांत गेले. मग काय ? हे हि एका जंगलांत गेले. पुस्तकांत लिहिलें होतें कीं त्या मुलांना जंगलांत एक वाघ भेटला. आतां ह्या बिचाऱ्यांनीं वाघ कोठून आणायचा ? शेवटीं त्यांच्यांत जो

बुद्धिमान् मुलगा होता तो म्हणाला 'अरे, आपण तर सुरवातीपासून च चूक केली आहे.' आपण त्या मुलांची नक्कल करूं पहात आहों. परंतु सर्व उलट मात्र होत आहे. तीं मुलें असें मुसाफिरी पुस्तक वाचून थोडीं च निघालीं होतीं प्रवास करायला ? आपली तर सुरवातीस च चूक झाली!

तात्पर्य हें कीं आपण चरित्राच्या सर्व घटनांचें अनुकरण करूं शकत नाहीं. इतिहासापासून फक्त गुण च घेतले पाहिजेत आणि श्रद्धापूर्वक त्यांचें स्मरण ठेवलें पाहिजे. पूर्वजांच्या गुणांचें श्रद्धापूर्वक स्मरण हें च श्राद्ध होय. आजचें हें श्राद्ध मला पावन वाटतें.

टिळकांचा पहिला गुण कोणता होता ? टिळक जातीनें ब्राह्मण होते. परंतु जे जातीनें ब्राह्मण नाहींत, ते देखील त्यांचें स्मरण करीत आहेत. टिळक महाराष्ट्राचे मराठे होते. परंतु पंजाबचे पंजाबी आणि बंगालचे बंगाली त्यांना पूज्य मानीत आहेत. हिंदुस्थान टिळकांचें ब्राह्मणच आणि त्यांचें मराठेपण सर्व कांहीं विसरून गेला आहे. हा चमत्कार आहे. ह्यांत रहस्य आहे. ह्यांत दुहेरी रहस्य आहे. ह्या चमत्कारांत टिळकांचा गुण तर आहे च, परंतु आपल्या पूर्वजांच्या कमाईचा हि गुण आहे. जनतेचा एक गुण आणि टिळकांचा एक गुण ह्या दोहोंच्या प्रभावानें हा चमत्कार झाला कीं ब्राह्मण आणि महाराष्ट्रीय असलेले टिळक भारतांत सर्व जातींकडून पूजिले जात आहेत. दोघांच्या हि गुणांकडे आपणाला लक्ष दिलें पाहिजे.

इथें मला अहिल्येच्या कथेची आठवण होते. रामायणांत मला अहिल्येची कथा अतिशय आवडते. रामाचें चरित्र च श्रेष्ठ आहे, आणि त्यांत ही कथा माझी फार च आवडती आहे. खोल विचार केल्यास आज हि रामाचा अवतार झाला आहे. ही जी राम-लीला होत आहे, ह्यांत मी कोणता बरें भाग घ्यावा कोणत्या पात्राचा अभिनय करावा, ह्याचा मी विचार करूं लागतों. रामाच्या ह्या लीलेंत मी कोण होऊं ? लक्ष्मण बनूं ? नाहीं, नाहीं. लक्ष्मणाची ती जागृति, ती भक्ति, मी कोठून आणूं ? तर काय भरत

बनूं ? नाहीं, भरताची कर्तव्य-दक्षता, जबाबदारीची जाणीव, त्याचा दयाळूपणा आणि त्याग मी कुठून आणूं ? हनुमानाचें तर नांव घेण्याची च हिंमत होत नाहीं. त्याची ती सेवा, ती निष्ठा, ती शक्ति मी कुठून आणूं ? हनुमान् तर जणूं रामाचें हृदय च आहे. तर मग गांठीं पुण्य नाहीं म्हणून रावण बनूं ? ऊं हूं. रावण हि बनूं शकत नाहीं. रावणाची उत्कटता, महत्त्व, महत्त्वाकांक्षा माझ्याजवळ कुठें आहे ? मग मी कोणतें सोंग घेऊं ? कोणत्या पात्रांचा अभिनय करूं ? असें एखादें पात्र नाहीं काय कीं जें मी बनूं शकेन ? जटायु, शबरी हे तर सुसेवक होते. शेवटीं मला अहिल्या दिसली. अहिल्या तर दगड होऊन पडली होती.

अहिल्येचा अभिनय आपण करूं, जड दगड होऊन बसूं, असा विचार केला. तितक्यांत ती अहिल्या म्हणाली, "साऱ्या रामायणांत सगळ्यांत तुच्छ जड-मूढ पात्र काय मी च आहें ? अरे बुद्धिमंता, अहिल्येचें पात्र सर्वांत निकृष्ट आहे काय ? अरे, माझी कांहीं योग्यता च नाहीं काय ? अरे, रामाच्या यात्रेंत अयोध्येपासून रामेश्वरापर्यंत हजारों दगड होते, त्यांचा कां नाहीं उद्धार झाला ? मी कांहीं नालायक दगड नाहीं. मी देखील गुणी दगड आहें !" अहिल्येचें म्हणणें मला पटलें. परंतु अहिल्येच्या दगडांत गुण असले तरी सर्व महिमा केवळ त्या दगडाचा नव्हता. तसा च सर्व महिमा रामाच्या चरणांचा हि नव्हता. अहिल्येसारखा दगड आणि रामाच्या चरणासारखे चरण या दोहींचा संयोग पाहिजे. रामाच्या चरणांनीं दुसऱ्या दगडांचा उद्धार होऊं शकला नाहीं. आणि अहिल्येच्या दगडाचा हि दुसऱ्या कोणाच्या चरणांनीं उध्दार होऊं शकला नाहीं. ह्याला मी अहिल्या-रामन्याय म्हणतो. दोघांच्या मिलाफानें काम होतें. हा च न्याय टिळकांच्या दृष्टांताला हि लागू होतो. टिळकांचें ब्राह्मणत्व, महाराष्ट्रीयत्व इत्यादि सर्व विसरून सारा हिंदुस्थान त्यांची पुण्य-स्मृति साजरी करतो. ह्या चमत्कारांत टिळकांचे गुण आणि जनतेचे गुण दोहोंचें हि स्थान आहे. ह्या चमत्काराचीं दोन्ही कारणें आहेत.

-कांहीं गुण टिळकांचा आहे आणि कांहीं त्यांना मानणाऱ्या सामान्य जनतेचा आहे. आपण ह्या गुणांचें जरा पृथक्करण करूं.

टिळकांचा गुण हा होता कीं त्यांनीं जें कांहीं केलें त्यांत सर्व हिंदुस्थानचा विचार केला. टिळकांच्या अस्थि मुंबईला पडल्या म्हणून तेथें त्यांच्या मूर्ति होतील. ते पुण्यांत राहिले म्हणून तेथें त्यांचीं स्मारक-मंडळें होतील. त्यांनीं मराठींत लिहिलें म्हणून मराठी भाषेंत त्यांचीं स्मारकें होतील. परंतु टिळकांनीं जेथें जें कांहीं केलें, मग तें कोणत्या हि गांवीं, कोणत्या हि भाषेंत केलें असो, ते सर्व हिंदुस्थानकरितां केलें. त्यांना हा अभिमान नव्हता कीं मी ब्राह्मण आहे, महाराष्ट्राचा आहें. त्यांच्यांत वेगळेपणाची, भेदाची भावना नव्हती. ते महाराष्ट्रांत होते तरी त्यांनीं विचार केला हिंदुस्थानचा. ज्या अर्वाचीन महाराष्ट्रीय विभूतींनीं सर्व भारतवर्षाचा विचार केला, त्यांत टिळक एक होते. टिळकांनीं महाराष्ट्राला आपल्या खिशांत ठेवलें आणि सर्व हिंदुस्थानकरितां ते लढत राहिले. जो खरी सेवा करूं इच्छितो त्याला ती सेवा कांहीं मर्यादित स्थानीं च करावी लागेल. परंतु त्या मर्यादित स्थानीं राहून करण्यांत येणाऱ्या सेवेमागें जी वृत्ति राहील ती विशाल व्यापक आणि अमर्यादित असली पाहिजे. शालिग्राम मर्यादित आहे, परंतु त्यांत मी ज्या ईश्वराचें दर्शन करतो, तो सर्व ब्रह्मांड-व्यापी, स्थिर चर, जड-चेतन, सर्वांत निवास करणारा च आहे. तेव्हां तर ती वास्तविक पूजा होऊं शकते! 'जले स्थले तथा काष्ठे, विष्णुः पर्वत-मूर्धनि ।' ह्या त्रिभुवन-व्यापक विष्णूला जर पुजारी शालिग्रामांत पाहणार नाहीं तर त्याची पूजा केवळ वेडेपणा होईल. सेवा करण्यांत ही खुबी आहे, हें रहस्य आहे. आपल्या गांवांत राहून हि मी विश्वेश्वराची सेवा करूं शकतों. दुसऱ्याला न लुटतां जी सेवा करण्यांत येते ती अनमोल असते.

तुकारामानें आपलें देहू गांव सोडलें नाहीं. रामदास दहा गांवांत फिरले आणि सेवा करीत राहिले. असें असलें तरी दोघांच्या सेवेचें फळ एक

च आहे, अनंत आहे. बुध्दि जर व्यापक असेल तर लहान कामांतून हि अपार लाभ मिळूं शकतो. सुदामदेव मूठभर च तांदूळ घेऊन गेले. परंतु त्या तांदुळांत प्रचंड शक्ति होती. सुदाम देवाची बुद्धि व्यापक होती. पुष्कळ मोठें काम करून हि कांहीं अभागी लोकांना फार च थोडें फळ मिळतें. परंतु सुदामदेव लहानशा कामापासून पुष्कळ मोठें फळ मिळवूं शकले. ज्याची बुद्धि शुद्ध, निष्पाप, पवित्र, आणि समत्वयुक्त आहे, भक्तिमय आणि प्रेममय आहे, त्यानें लहानशी क्रिया केली तरी तिचें फळ मोठें होतें, तिची किंमत पुष्कळ मोठी होते. हा एक महान् आध्यात्मिक सिद्धांत आहे. आईचें पत्र दोन शब्दांचें कां असेना, तें विलक्षण प्रभाव टाकतें. तें प्रेमाच्या शाईनें पवित्रतेच्या स्वच्छ कागदावर लिहिलेलें असतें. दुसरें एखादें बाड किती हि पांढऱ्या स्वच्छ कागदावर लिहिलेलें असो, त्याच्या मुळांत निर्मल बुद्धि नसेल, जें कांहीं लिहिलें तें प्रेमांत ओतलेलें नसेल, तर तें सारें बाड व्यर्थ आहे !

ईश्वराच्या येथें 'किती सेवा' हा प्रश्न नाहीं, 'कशी सेवा' हा प्रश्न आहे. टिळक अत्यंत बुद्धिमान्, विद्वान्, नाना शास्त्रांचे पंडित होते. त्यामुळें त्यांची सेवा अनेकांगी आणि फार मोठी आहे. परंतु टिळकांनीं जितकी मूल्यवान् सेवा केली, तितकी च मूल्यवान् सेवा एक वेडबळ सेवक हि करूं शकतो. टिळकांची सेवा विपुल आणि बहुंगी होती तरी हि त्यांच्या सेवेचें मूल्य आणि एका तुच्छ सेवकाच्या सेवेचें मूल्य सारखें च असू शकतें. मात्र तुमच्या सेवेवर व्यापकतेचा शिक्का लागलेला असला पाहिजे. ही व्यापकता आजच्या कार्यकर्त्यांमध्यें कमी प्रमाणांत दिसून येते. कुशल कार्यकर्ते आज संकुचित दृष्टीनें काम करीत असलेले दिसतात.

टिळकांमध्यें ही व्यापकता होती. मी भारतीय आहें, असो पुरातनी-पासून च त्यांची वृत्ति होती. बंगालमध्यें चळवळ सुरू झाली. त्यांनीं धांवत जाऊन तीत मदत केली. बंगालला साथ देण्याकरितां महाराष्ट्राला उभें केलें. स्वदेशीचा डंका वाजविला. बंगाल लढाईच्या मैदानांत उभा आहे तर आपण

हि गेलें च पाहिजे, जें बंगालचें दुःख तें महाराष्ट्राचें हि दुःख आहे, अशी व्यापकता, सार्वराष्ट्रीयता टिळकांमध्यें होती. म्हणून च पुण्याचे रहिवाशी असून हि ते हिंदुस्थानचे प्राण बनले.

परंतु ह्याचें एक दुसरें हि कारण आहे. तें म्हणजे जनतेची विशेषता. टिळकांच्या गुणांबरोबर जनतेच्या गुणांचें हि स्मरण केलें पाहिजे. कारण, टिळक स्वतःला जनतेच्या चरणाची धूळ समजत. जनतेचे दोष, जनतेचा दुबळेपणा, जनतेच्या उणीवा, सर्व कांहीं ते आपलें च समजत. ते जनतेशीं एकरूप होऊन गेले होते. म्हणून जनतेच्या गुणांचें स्मरण हें टिळकांच्या गुणांचें च स्मरण आहे.

जनतेचा हा गुण आपण कमावलेला नाहीं. आपल्या महान्, पुण्यवान्, विशाल-दृष्टि पूर्वजांची ती देणगी आहे. हा गुण जणूं काय आपण आपल्या आईच्या दुधाबरोबर च प्यालों आहोंत. त्या श्रेष्ठ पूर्वजांनीं आपणाला हें शिकविलें आहे कीं मनुष्य कोणत्या प्रांताचा किंवा कोणत्या जातीचा आहे, हें पाहण्याऐवजीं इतकें च पहा कीं तो चांगला आहे कीं नाहीं, तो भारतीय आहे किंवा नाहीं. त्यांनीं आपणाला भारतवर्ष एक राष्ट्र आहे हें शिकविलें. इंग्रज येथें आले आणि त्यांनीं आम्हांला देशाभिमान शिकविला तेव्हां कोठें आम्हांला राष्ट्रीयता माहीत झाली, असें पुष्कळ लोक म्हणतात. परंतु हें म्हणणें चुकीचें आहे. एकराष्ट्रीयत्वाची भावना आपणाला आपल्या पुण्यवान पूर्वजांनीं च शिकविली आहे. त्यांच्या च कृपेनें ती असाधारण देणगी आपणाला मिळाली आहे.

आपल्या राष्ट्र-ऋषींनीं 'दुर्लभं भारते जन्म' अशी शिकवण आपणाला दिली आहे. "दुर्लभं बंगेषु जन्म," "दुर्लभं गुर्जरेषु जन्म" असें ते म्हणाले नाहींत. काशींत गंगेच्या कांठावर राहणारा भारतीय कोणत्या गोष्टीकरितां तळमळत असतो ? तो ह्याकरितां तळमळतो कीं काशीच्या गंगेची कावड

रामेश्वरावर नेऊन केव्हां ओतीन? जणूं काय काशी आणि रामेश्वर त्याच्या घराचें मागील आणि पुढील अंगण च आहे? वास्तविक काशी आणि रामेश्वरामधें पंधराशें-मैलांचें अंतर आहे. परंतु तुम्हांला तुमच्या श्रेष्ठ ऋषींनी असें वैभव दिलें आहे कीं तुमचें अंगण पंधराशें मैलांचें झालें आहे. रामेश्वरला राहणारा भारतीय ह्याकरितां तळमळतो कीं रामेश्वरचें समुद्राचें पाणी काशी-विश्वेश्वराच्या मस्तकावर केव्हां घालीन? तो रामेश्वरचें समुद्र-जल काशीला घेऊन जातो. कावेरीच्या किंवा गोदावरीच्या पाण्यांत स्नान करणारा देखील 'जय गंगे, हर गंगे,' असें च म्हणतो. गंगा फक्त काशींत च नाहीं, येथें हि आहे. ज्या भांड्यांत आपण स्नानाकरितां पाणी घेतों त्याला देखील 'गंगाळ' नांव दिलें आहे. किती व्यापक आणि पवित्र भावना आहे ही!

ही भावना आध्यात्मिक नाहीं, राष्ट्रीय आहे. आध्यात्मिक मनुष्य "दुर्लभं भारते जन्म" असें म्हणणार नाहीं. तो कांहीं वेगळें च म्हणेल. तुकारामानें म्हटलें आहे, 'आमुचा स्वदेश भुवनत्रयामध्यें वास.' त्यांनीं आत्म्याची मर्यादा व्यापक केली. सर्व दरवाजे, सर्व भिंती तोडून आत्मा प्राप्त करून घेतला. तुकारामासारख्या आध्यात्मिक रंगांत रंगलेल्या महापुरुषांनीं आपल्या आत्म्याला स्वैर संचार करूं दिला. "अणोरणीयान् महतो महीयान्" या भावनेनें प्रेरित होऊन सर्व भेदाभेदांना पार करून जे सर्वत्र चिन्मयतेचें दर्शन करूं शकतात, ते धन्य होत. लोक हि समजून गेले कीं हे सगळ्या विश्वाचे आहेत. ह्यांना कांहीं सीमा नाहीं. परंतु "दुर्लभं भारते जन्म" ही ऋषींची कल्पना आध्यात्मिक नाहीं, राष्ट्रीय आहे.

वाल्मीकीनें आपल्या रामायणाच्या प्रारंभींच्या श्लोकांत रामाचें गुण-वर्णन केलें आहे. रामाचें गुण-गान करतांना राम कसा होता ह्याचें ते वर्णन करतात, 'समुद्र इव गांभीर्ये स्थैर्ये च हिमवानिव'. स्थिरता उत्तरेच्या हिमालया-सारखी आणि गांभीर्य दक्षिणेच्या समुद्रासारखें. पहा, कशी विशाल उपमा आहे! एका श्वासांत हिमालयापासून तों थेट कन्याकुमारीपर्यंतचें दर्शन त्यांनीं

करविलें. पांच मैल उंच पर्वत आणि पांच मैल खोल सागर दोन्ही एकदम दाखविले. म्हणून च तर रामायण राष्ट्रीय काव्य झालें आहे. वाल्मीकीच्या रोमारोमांत राष्ट्रीयत्व भरलेलें होतें. आणि म्हणून च ते सार्वराष्ट्रीय रामायण रचूं शकले. रामायण जितकें महाराष्ट्रांत प्रिय आहे तितकें च मद्रासमधें, केरळमधें हि प्रिय आहे.

इंग्रज किंवा पाश्चात्य इतिहासकार म्हणतात कीं तुम्ही आपसांत लढत होतां, अंतःस्थ कलह करीत होतां. आपसांत लढणें वाईट आहे, हें मी हि मानतों. परंतु हा दोष मान्य करून हि मला ह्या आरोपाचा अभिमान वाटतो. आम्ही लढलों परंतु आपसांत लढलों. ह्याचा अर्थ हा झाला कीं आम्ही एक आहोंत ही गोष्ट ह्या इतिहासकारांना हि मंजूर आहे. एखादा लहानसा मानव-समुदाय शेखी मिरवूं लागला कीं 'आमच्यांत एकी आहे, आपसांत फूट नाहीं', तर त्यात विशेष बहादुरी आहे काय? समजा कीं मी माझ्या राष्ट्राची 'माझें राष्ट्र म्हणजे माझें शरीर' इतकी च संकुचित व्याख्या केली, तर आपसांत कधीं युद्ध च होणार नाहीं. होय, मीं च आपल्या थोबाडांत चटकन एक थापड मारून घेतली तर ती लढाई होईल खरी! परंतु 'मी च माझें राष्ट्र' आहे' अशी व्याख्या करून मी आपल्या भावाशीं, आईशीं, कोणाशीं हि भांडलों तरी ती आपसांतील लढाई होणार नाहीं. कारण मी तर आपल्या साडे तीन हात शरीराला च आपलें राष्ट्र मानलें आहे. सारांश, आपण आपसांत लढलों हा आरोप खरा आहे. परंतु तो अभिमानास्पद हि आहे. कारण ह्या आरोपांत च आरोप करणाऱ्यानें हे मान्य केलें आहे कीं आपण एक आहोंत, आपलें राष्ट्र एक आहे. महाराष्ट्रानें पंजाबवर, गुजराथवर, बंगालवर स्वाऱ्या केल्या तरी एक राष्ट्रीयत्वाची, आपलेपणाची, भावना नष्ट झाली नाहीं.

जननेच्या ह्या गुणामुळे टिळक सर्व प्रांतांना प्रिय आणि पूज्य झाले. टिळक, गांधी तर अलौकिक पुरुष आहेत. सर्व प्रांत त्यांची पूजा करतील च. परंतु राजगोपालाचार्य, जमनालालजी साधारण मनुष्य आहेत. परंतु लोकां

देखील सर्व प्रांतांत प्रतिष्ठा आहे. पंजाब, महाराष्ट्र, कर्नाटक त्यांचा आदर करतात. आपणाला पत्ता असो किंवा नसो परंतु एक-राष्ट्रीयत्वाचा हा महान् गुण आपल्या रक्तांत एकजीव झाला आहे. आज टिळकांचें स्मरण सर्वत्र केलें जाईल. ते ब्राह्मण आणि महाराष्ट्रीय असले तरी सर्व लोक सर्व ठिकाणीं त्यांची पूजा करतील. कारण टिळकांची दृष्टि व्यापक होती. ते सर्व हिंदुस्थानशीं एकरूप झाले होते. ही विशेषता टिळकांची आहे. हिंदी जनता प्रान्ताभिमान इत्यादि गोष्टींकडे लक्ष न देतां गुण ओळखते. भारतीय जनतेचा गुण हा आहे. ह्या दोघांच्या गुणांचा हा चमत्कार आहे कीं टिळकांचें सर्वत्र आणि सर्व लोक स्मरण करीत आहेत. एका च आंब्याच्या कोईपासून झाड, फांद्या, मोहोर, आंबे उत्पन्न होतात त्या प्रमाणें एका च भारत-मातेचे बाह्यतः वेगवेगळे पुत्र, दिसतात. कोणी क्रोधी, कोणी प्रेमळ. गोड आणि मऊ आंबे ज्या कोईपासून निर्माण होतात त्याच कोईपासून खोड देखील निर्माण होतें. त्याप्रमाणें आपण धरून किती हि भिन्न दिसत असलों तरी एका च भारतमातेचीं लेकरें आहोंत हें विसरतां कामा नये. हें लक्षांत ठेवून प्रेमभाव वाढवून सेवकांनीं सेवेकरितां तयार झालें पाहिजे. टिळकांनीं अशी च सेवा केली. तुम्ही हि तशी कराल अशी माझी आशा आहे.

: २१ :

## सत्ता आणि सेवा

संस्कृतामध्यें 'सत्ता' या अर्थाचा चांगलासा शब्द नाहीं. कृत्रिम शब्द आहेत, पण सिध्दशब्द नाहीं. सत्ता हा हि शब्द संस्कृत आहे. पण त्याचा अर्थ संस्कृतांत अस्तित्व इतका च होतो. अस्तित्व हें ज्याचें त्याच्या ठिकाणीं च असतें. माझें अस्तित्व माझ्या ठिकाणीं, जगाचें अस्तित्व जगाच्या ठिकाणीं. एकाची दुसऱ्यावर सत्ता हा एक शोध च आहे.

ही सत्ता आली कोठून ? तिचें अधिष्ठान काय ? आईची मुलावर सत्ता चालते. कारण मुलगा असमर्थ आहे. अनन्यगतिक आहे. पण मुलाची हि आईवर सत्ता चालते. कारण, तशी सत्ता चालवून घेणें तिला आवडतें. आई असमर्थ नाहीं.

आईची मुलावर सत्ता चालते ती मुलाला आवडते. बलवंताची दुर्बलावर सत्ता चालली तरी ती त्या दुर्बलाला आवडते असें नाहीं. ती लाचारीची असते. लाचारीची सत्ता आणि आवडणारी सत्ता या अगदीं वेग-वेगळ्या आहेत आणि त्या दर्शविण्यासाठीं वेगळ्या शब्दांची गरज आहे.

तसे शब्द आज आपल्यापाशीं नाहींत. म्हणून एकीला आपण बळाची सत्ता म्हणूं, दुसरीला सेवेची सत्ता म्हणूं. सेवेची सत्ता घरोघरीं चालत आहे. पण समाजांत मात्र बळाची सत्ता आजपर्यंत शिरजोर राहिली आहे.

तिची लोकांनीं देवता बनविली आहे, आणि शक्ति या नांवानें ती पूजिली जाते. सेवा हि थोडी-फार ती करते, पण शक्ति म्हणून मिरवते.

सेवेची देवता मात्र अजून कोणीं बनविलेली दिसत नाहीं. घराबाहेर समाजांत सेवा झाली नाहीं असें नाहीं. पण देवता म्हणून ती प्रतिष्ठिली नाहीं. कारण उघड च आहे. सेवा च जर देवता झाली तर तिची सेवा कोण करणार ?

वस्तु-स्थिति अशी आहे कीं विद्या, शक्ति, लक्ष्मी ज्या देवता बनून बसल्या आहेत, त्या सर्व सेविका होण्यास योग्य आहेत. आणि सेवा ही च खरी देवता आहे. विद्या, शक्ति, लक्ष्मी तिन्ही सेवेला वाहिलेल्या असल्या पाहिजेत. सेवेच्या दासी होऊन राहण्यामधें च त्यांचें देवतापण आहे. तो दासीपणा त्यांनीं सोडला म्हणजे त्या देवता न राहतां राक्षसिणी बनतात. आज त्या तशा च बनल्या आहेत.

आज लक्ष्मी कमळाला पायाखालीं मिरविते. सरस्वती सतार वाजवते, पुस्तक वाचीत बसते किंवा मोराशीं खेळते. शक्ति हत्यारांनीं सजते आणि दुर्बळांचे बळि घेते. अशा देवतांचे देव्हारे आजवर जगांत चालले आहेत आणि समर्थांच्या भार्येत "थोरली देवता" चोरीला गेली आहे.

विद्या, लक्ष्मी, शक्ति अपुऱ्या पडल्या म्हणून आतां लोकांनीं व्यवस्था-देवी, संघटना-देवी इत्यादि नव्या देवता शोधून काढल्या आहेत. आश्रमापासून लष्करापर्यंत, सर्वत्र शिस्तीचा बोलबाला चालला आहे. कवायतींत शिस्त पाहिजे. शिक्षणांत शिस्त पाहिजे. भक्तींत हि शिस्त पाहिजे.

भावार्थ इतका च आहे, मुख्य देवता हरवल्यामुळें मायावी देवतांनीं जोर केला आहे. सूर्य लोपला कीं नक्षत्रांनीं नाचलें च पाहिजे !

आतां तर या देवता निजावलंबी बनल्या आहेत. "त्याच्यासाठीं च तें" याचें नांव निजावलंबन. कंजूस म्हणतो पैशासाठीं च पैसा. खर्चासाठीं

नव्हे. सेवेसाठीं तर नव्हे च. साहित्यिक म्हणतो, साहित्यासाठीं साहित्य. जीवनासाठीं नव्हे. कलावान् म्हणतो, कलेसाठीं कला. त्याला माहीत नाहीं कीं ती असते काळासाठीं. काळ तिला खाऊन टाकतो. सेवेसाठीं वापरली असती तर सदुपयोग झाला असता.

सत्तावादी म्हणतात, सत्ता ही शासनकर्ती देवता आहे. तिच्यासाठीं च ती आहे. सत्ता मिळविण्यासाठीं सेवा केली तरी चालेल. सत्ता टिकवण्यासाठीं हि सेवा करायला हरकत नाहीं. पण सत्ता स्वयं-भू आहे.

सर्व साम्राज्यवाद्यांचें याविषयावर एक मत झालेलें दिसतें.

[ मराठी हरिजन, ता. २३-२-१९४७ ]

: २२ :

# शिक्षणाचें सूत्र

मनूचें एक वाक्य आहे, 'मुलाला सोळावें वर्ष लागलें म्हणजे त्याच्याशीं मित्राप्रमाणें वागावें.' मी या वाक्याचा असा अर्थ समजतों कीं सोळा वर्षांनंतर जीवनाची जबाबदारी मुलानें उचलली पाहिजे. मित्राला आपण सल्ला देतों, वेळेवर मदत करतों, पण त्याच्या जीवनाचा भार त्याच्यावर च असतो.

जीवनाचा भार हा खरोखर भार च नाहीं. तो उपकार आहे. पण तो उपकार वाटण्यासारखें समर्थ शिक्षण मिळायला पाहिजे. असें शिक्षण सोळा वर्षांच्या वयापर्यंत मुलाला आई-बापांकडून मिळालें पाहिजे. आई-बापांकडून म्हणजे च समाजाकडून. अशी शिक्षणाची सोय हरेक मुलाबाबत समाजानें केली पाहिजे. त्या पुढचें त्याचें शिक्षण त्यानें आपल्या कमाईनें मिळविलें पाहिजे.

मनूच्या वाक्याचा असा हि अर्थ होतो कीं सोळाव्या वर्षाआधीं मुलावर जीवनाची संपूर्ण जबाबदारी टाकणें उचित नाहीं. तोंपर्यंत मुलाला जीवन च नाहीं असा याचा अर्थ नाहीं. परंतु त्याचा भार त्याच्या वर नाहीं. त्या वयांत आपला भार आपण उचलण्यासाठीं त्यानें हळू हळू तयार व्हावयाचें आहे. ह्या तयार होण्याला च शिक्षण म्हणतात.

मनूचें वाक्य मीं शब्द-प्रमाण म्हणून मांडलेलें नाहीं. मनु म्हणून कोणी माणूस नाहीं. समाजाच्या हजारों वर्षांच्या अनुभवाला मनु म्हणतात.

दशरथापाशीं विश्वामित्र यज्ञ-रक्षणासाठीं रामाची मागणी करायला आला. दशरथ म्हणाला, "ऊन षोडश-वर्षो मे रामो राजीव-लोचनः" राम अजून सोळा वर्षांचा झाला नाहीं. त्याला एवढया जबाबदारीच्या कामासाठीं मी कसा देऊं? सोळा वर्षें संपलेलीं असतीं तर दशरथाची तकरार नव्हती. वसिष्ठांनीं त्याला समजावून सांगितलें, 'विश्वामित्राच्या संरक्षणाखालीं हें काम होणार आहे. ती एक शिक्षण-योजना च आहे.' तेव्हां दशरथाची समजूत पटली.

दशरथाची ही समजूत च मनूच्या वाक्यांत आहे. अलीकडच्या शिक्षण-कोविदांनीं हि ती मान्य केली आहे. चौदा वर्षें पूर्ण होईपर्यंत सात वर्षांची शिक्षण-योजना 'नई तालीम' वाल्यांनीं आंखली आहे. चौदा वर्षें पूर्ण नसलेल्या मुलाला फॅक्टरींत काम देऊं नये असें सुधारलेल्या देशांत कायदे आहेत. मनु एक वर्ष या लोकांच्या पुढें आहे. तो पंधरा वर्षें पूर्ण होईपर्यंत मुलांना फॅक्टरींत जाऊं देणार नाहीं. आणि सोळावें वर्ष लागल्यानंतर मुलाला कॉलेजांत कालक्षय करूं देणार नाहीं. "मग तुमच्या या योजनेनुसार काय कॉलेजें ओस पडायचीं? मग देशाची उन्नति कशी होणार?" कॉलेजें ओस पडायचीं नाहींत, गजबजून जावयाचीं आहेत गरीबांचीं मुलें हि त्यांत दाखल व्हावयाचीं आहेत. जो तो निज-परिश्रमानें ज्ञान-रूप अन्न आणि अन्न-रूप ज्ञान कमावीत आहे, दोन हातांनीं पोटाचें आणि दोन डोळ्यांनीं बुध्दीचें भरण होत आहे, ज्ञान आणि कर्म हा भेद मावळला आहे, असा देखावा त्या कॉलेजांत दिसेल. मुलांना फी नाहीं, बोर्डिंगचा चार्ज नाहीं, अध्यापकाला पगार नाहीं. उद्योगालय, पुस्तकालय, प्रयोगालय एवढीं सरकारनें सजवून दिलीं आहेत. शाळेला सुट्टी नाहीं. कारण बंधन कुणाला माहीत च नाहीं.

आजच्या कॉलेजांत गरीबाची सोय च नाहीं. चार-दोन गरीबांच्या मुलांना मेहरबानीनें माफी मिळायची. आमचें कॉलेज सर्वांना मोकळें. श्रीमंतांच्या मुलांना इतके कष्ट देवत नाहींत, म्हणून एखाद सालाच्या श्रमाची माफी

द्यावी लागल्यास ती गोष्ट वेगळी. परंतु ती दीनता च ठरायची, म्हणून कोणी अभिमानी मुलगा ती सहसा कबूल करायचा नाहीं.

आज तर शेतीचें कॉलेज हि शहरांत निघतें. मॅट्रिक झाल्याशिवाय तिथें प्रवेश नाहीं. मुलाला थंडी-वाऱ्यांत, उन्हा-पावसांत काम करण्याची शक्ति उरलेली नाहीं अशी खात्री झाल्याशिवाय शेतकी-कॉलेजांत प्रवेश नाहीं, असा याचा अर्थ आहे. कारण आजच्या पध्दतीप्रमाणें मॅट्रिक पास होण्याचा दुसरा मतलब च नाहीं. प्रोफेसर आणि विद्यार्थी खुर्ची-बाकांवर बसून शेतीचें ज्ञान-मिळविणार ! प्रयोगादाखल शेती नाममात्र असायची. जबाबदारी तिची मजुरांवर च. यांनीं प्रयोग करायचा ! मुलाच्या खर्चा-साठीं बापाला दरसाल पंचवीस एकर जमिनीचें उत्पन्न दिल्याशिवाय पूर्तें व्हावयाची नाहीं.

, आरंभिक शिक्षण संपल्यानंतरच्या उच्च शिक्षणाचा कार्यक्रम काय असावा यासंबंधीं चर्चा चालली होती. मीं सुचवलें, मुलांनीं सहा तास परिश्रम करून अंगमेहनतीनें रोटी कमवावी आणि दोन तास सत्परिपोषक ज्ञान-विज्ञान त्यांना द्यावें. मुलांचा खर्च शाळेनें हि करूं नये, आई-बापांनीं हि करूं नये. मग तीं मुलें गरिबांचीं असोत या श्रीमंतांचीं असोत. त्यांतून च खरे प्रयोग होतील, आणि देश पुढें जाईल.

आज मनूच्या वाक्याचे दोन्ही अर्थ आम्हीं नाहींसे केले आहेत. असंख्य दरिद्री मुलांना भाकरीसाठीं राबावें लागत आहे. राबून सुध्दां त्यांना भाकर मिळत नाहीं. शिक्षण तर नाहीं च नाहीं. उलट बाजूनें, पंचवीस पंचवीस वर्षें पर्यंत मार-भूत शिक्षणाचे चोचले चालले आहेत. काम न करतां पोटभर कमावण्याची चिंता लागली आहे. करोडोंना काम करून पोटभर मिळत नाहीं. 'सोळा वर्षें पर्यंत स्वावलंबनाचें शिक्षण, सोळा वर्षांनंतर स्वावलंबनानें शिक्षण.' हें सूत्र स्वीकारून तदनुसार शिक्षण-योजना केल्याशिवाय या दुहेरी दुर्गतीं-तून सुटका होणार नाहीं.

[ मराठी हरिजन, ९-२-१९४७ ]

## : २३ :

# क्रांति करायची तर अजून बाकी आहे *

माझ्या परम प्रिय मित्रांनो,

तुमच्या या प्रांतांत मला पंचवीस वर्षें झालीं परंतु तुमच्यासमोर बोलण्याचा इतक्या वर्षांनंतर हा पहिला च प्रसंग आहे. 'भाऊ भाऊ शेजारीं भेट नाहीं संसारीं,' तसें तुम्ही आम्ही इतक्या जवळ असून हि मी बोलण्यास येऊं शकलों नाहीं. कारण, मी असतों कामामध्यें मग्न, आणि बोलणारे लोक पुष्कळ आहेत, म्हणून बोलण्याचें मी शक्यतोंवर टाळतों, लोक म्हणतात, "तुम्हांला बोलतां येतें, पण तुम्ही बोलत कां नाहीं?" मी म्हणतों "बोलतां येतें म्हणून च बोलत नाहीं, बोलतां येत नसतें तर पुष्कळ बोललों असतों." ते म्हणतात "तुम्हीं बोललें पाहिजे." मी म्हणतों "माझी एक शर्त आहे. तुम्ही बोलायचें बंद करा, मग मी बोलतों"

आपण विचार केला तर आपणांस दिसून येईल कीं हिंदुस्थानला पूर्वी कधीं नव्हती इतकी कामाची जरूर आज आहे. आज आपल्या हातांत सत्ता आली आहे असें आपण म्हणतों. परंतु खरी सत्ता अजून आली नाहीं. आपण फक्त स्वराज्याच्या मार्गावर आलों आहोंत. हातांत सत्ता आल्याबरोबर पुष्कळ भयें निर्माण होतात. हीं भयें जर टाळायचीं असतील तर निरंतर सेवा करीत राहिलें पाहिजे. कांग्रेसचा असा दावा होता व आहे कीं कांग्रेसला स्वराज्य गरीब लोकांकरितां पाहिजे. गरीब लोकांकरितां दावा करणारी व झगडणारी कांग्रेससारखी संस्था जगभर दुसरी नाहीं. आणि जर कांग्रेसचा एवढा मोठा

---

* उमरावतीस महारोगी-सेवा-मंडळाच्या शाखेचें उद्घाटन करतांना दिलेलें भाषण.

दावा आहे तर तो खरा करून दाखवायची आज फार आवश्यकता आहे. आज अशी स्थिति आहे कीं नद्या ज्याप्रमाणें चारी बाजूंनीं वाहतात व जिकडे खोली असेल तिकडे धावतात तसें च जनतेच्या सेवकानीं चारी बाजूनें सेवा करावयास धावलें पाहिजे. तसें जर केलें नाहीं तर जनता निरंकुश होईल. कार्यकर्ते आळसावतील हें सगळें सेवेनें च टळणारें आहे सेवेशिवाय हे दोष दूर होऊ शकणार नाहींत.

सर्वसामान्य लोक निरंकुश होतील या माझ्या म्हणण्याचें प्रत्यंतर आता च सर्वत्र दिसू लागलें आहे कितो थोड्या थोड्या गोष्टींवर संप होऊं लागले आहेत? यांत नवल वाटण्यासारखें कांहीं च नाहीं अनेक शतकें दबलेली जनता यापेक्षा ज्यास्त उच्छृंखल झाली नाहीं हें च नवल आहे सेवेनें च हें टळू शकतें दंगे मारामाऱ्या थांबवायला सेवेशिवाय दुसरा इलाज नाहीं.

काँग्रेसचा दावा आहे कीं आम्हाला ग्रामराज्य स्थापावयाचें आहे गावाना सघटित, स्वावलंबी करावयाचें आहे असें जर आहे तर आज एक हि माणूस उपाशी राहणार नाहीं अशी काळजी घ्यायला पाहिजे गावची सफाई, तेथील शिक्षण, आरोग्य, या सर्व गोष्टींकडे कोण लक्ष पुरवील? जर आपण अशी वृत्ति ठेवूं कीं सरकार सर्व करील तर तें खोटें आहे सरकारजवळ जी सत्ता आली आहे तीवर विसंबून राहू तर आपण परावलंबी होऊ म्हणून आपल्याला आधीं स्वावलंबी बनलें पाहिजे ज्यावेळीं सत्ता नव्हती त्यावेळीं खेडोपाडी जाऊन काम करण्यात तुम्हाला अनेक अडथळे निर्माण होत असत आज सरकार तुमचें आहे म्हणून खेड्याच्या जनतेला सांगायला हवें कीं "बाबानो आता तुम्ही आपलें स्वतंत्र सरकार बनवा तुमचा न्याय तुम्ही च द्या तुमचें शिक्षण तुम्ही च सांभाळायला हवें तुमच्या गावचा सर्व कारभार तुम्हाला च बघायला हवा"

कोणी म्हणतात, मी जेलमध्यें गेलो, मला निवडून का देत नाहीं? मी अमुक अमुक केलें, मग मला अमुक जागा का दिली जात नाहीं? अशा रीतीनें आपण आपला हक्क दाखविला व तो उपभोगण्याची वृत्ति दाखविली, तर क्षयाला सुरवात झाली च समजा. किंचित् त्यागानें जर भोग-बुद्धि वाढते

असेल तर स्वराज्य टिकणार नाहीं. आम्हांला फक्त हें आमचें च स्वातंत्र्य टिकवायचें आहे असें नाहीं, तर जगाचें स्वातंत्र्य सिद्ध करावयाचें आहे. झेंडा-गीतांत म्हणतों त्याप्रमाणें विश्व-विजय करायचा आहे. म्हणजे सगळ्या जगांत एक देखील राष्ट्र गुलाम राहणार नाहीं असं करावयाचें आहे. जोंपर्यंत तसें होत नाहीं, तोंपर्यंत आपलें कार्य हि पूर्ण झालें असें होत नाहीं आणि हें जर सर्व करावयाचें आहे तर कार्यकर्ते आळसावून चालायचें नाहीं. आणि म्हणून मी म्हणालों कीं आज सेवा करण्याची वेळ आहे. ज्याला ज्याला तळमळ आहे त्यानें आपापल्या परी होईल ती सेवा करण्यास जनतेकडे धांव घेतली पाहिजे.

एका माणसानें मला एकदां विचारलें, "आम्ही गृहस्थ आहोंत आम्हांला विशेष तर कांहीं करणें शक्य नाहीं. परंतु घरांत राहून काय करतां येऊं शकेल सांगा." मी म्हणालों, "घरांत राहून काय करतां येईल तें च सांगतों. घरांत एक हरिजन मुलगा ठेवा. तुम्हांला तीन मुलें आहेत त्या ऐवजीं चार समजा. चार असतें तर काय टाकून दिलें असतें ? ते गृहस्थ म्हणाले, "परंतु मग लोक गांवांत राहूं देणार नाहींत." मी म्हणालों, "तें च तर करावयाचें आहे. ह्याला च तर क्रांति म्हणतात." घरापासून सुरू करून समाजाच्या पातळीपर्यंत पोचूं शकेल अशी चळवळ आम्हीं करायला हवी. लोक म्हणतात, "आमच्या मनांत अस्पृश्यता नाहीं." मी म्हणतों— "तुमच्या मनाला पुसतो कोण ? तुम्ही घरांत हरिजन ठेवतां का ?" तर ते म्हणतात, "घरांत आईला जमत नाहीं." मी म्हणतों, "आई ज्या ठिकाणीं हरिजनाला यसूं देईल त्या ठिकाणीं तूं बैस." खरी गोष्ट अशी आहे कीं हा टाळण्याचा प्रयत्न असतो.

विद्यार्थी मला नेहमीं म्हणतात, "आम्हांला क्रांतिकारी कार्यक्रम पाहिजे" मी म्हणतों, "काय गीत रचून देऊं, म्हणजे क्रांतिकारी कार्यक्रम होईल ?" जर विद्यार्थ्यांनीं मनावर घेतलें तर ते पुष्कळ करूं शकतील. हिंदुस्थानची गरीब जनता तापलेल्या जमिनीप्रमाणें तप्त झाली आहे. ती पावसाप्रमाणें च सेवकांची वाट बघत आहे. लोक मला म्हणतात, "जनता

कांतायला तयार नाहीं." माझा अनुभव निराळा आहे. मीं एका कार्यकर्त्याला गांवांत पाठविला. सर्वांनीं सभा घेतली. ठराव केला कीं आम्हांला आमच्या गांवांत च कपडा तयार करावयाचा आहे, म्हणून कांतणें शिकविण्याची व विणण्याची सोय हवी. ठराव करून थांबले नाहींत. तर सर्वांच्या सह्या घेऊन माझ्याकडे पाठविल्या. जनतेपाशीं तुम्ही पोंचा, ती तुमची वाट बघत आहे. माझ्याजवळ जेवढी कळकळ आहे ती एकवटून मला तुम्हांला सांगायचें आहे कीं जर खरोखर स्वराज्य आलें असेल, तर सूर्योदय झाल्यावर पक्षी जसे गोळा होतात तसे च स्वराज्याच्या सूर्योदयानंतर कार्यकर्ते हि गोळा होऊं लागतील, लोक तुमचें म्हणणें ऐकतील व मग क्रांति सहज होऊन जाईल. आज क्रांति झालेली नाहीं. क्रांति करायची तर अजून बाकी आहे!

[ मराठी हरिजन, ता. ६ आक्टोबर १९४६ ]

: २४ :

# स्त्री-पुरुष-अभेद *

ह्या परिषदेचा अध्यक्ष होण्याविषयीं जेव्हां मला सांगण्यांत आलें तेव्हां मी ती गोष्ट टाळूं शकलों नाहीं- कारण कीं महिलाश्रमाशीं माझा अगदीं आरंभापासून संबंध आहे. परंतु टाळण्याची दानत तर होती च आणि ती अशामुळें कीं आजकाल मी मजूर झालों आहें. कदाचित् या च कारणामुळें असेल, माझी बोलण्याची शक्ति कमी झाली आहे. तरी पण मी येथें आलों आहे आणि तुम्हा सर्वांना पाहून मला आनंद होत आहे. आजची परिस्थिति लक्षांत घेतां महिलाश्रमाच्या अधिकाऱ्यांनीं ही परिषद अगदीं योग्य वेळीं बोलाविली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

जेव्हां मी येथें येण्याचें कबूल केलें तेव्हां मी विचार करूं लागलों कीं स्त्रियांच्या संबंधीं खास असें काय सांगावें. तेव्हां मला असें कांहीं सुचलें नाहीं. मी विचार केला, मला कां सुचलें नाहीं त्याचें कारण तुम्हांला समजावून सांगावें. कदाचित् तो च माझ्या व्याख्यानाला उपयुक्त विषय होईल. मला कांहीं च सुचलें नाहीं, याचें कारण असें कीं स्त्री-पुरुषांत भेद करण्याची वृत्ति च माझ्यात नाहीं. मी असें मानतों कीं सामाजिक, कौटुंबिक व राजकीय हक्क व कर्तव्यें हीं पुरुषांचीं जितकीं आहेत तितकीं च स्त्रियांचीं हि आहेत. दोघांचा हि आर्थिक अधिकार समान आहे आणि नैतिक योग्यता देखील सारखी च आहे. दोघांचें शिक्षण एकत्र झालें पाहिजे आणि शिक्षणाचे विषय हि

* ता. १२-१-४७ ला महिलाश्रमच्या वार्षिकोत्सवाच्या वेळीं भरलेल्या महिला-सरथा-समेलनात अध्यक्षपदावरून दिलेलें प्रास्ताविक भाषण.

सारखे च असले पाहिजेत. स्त्री-पुरुषांत जो भेद आहे तो बाह्य आहे, मूलभूत नाहीं. मला माहीत आहे कीं याहून भिन्न असा हि एक विचार-प्रवाह आहे. परंतु मी माझे विचार तुमच्या पुढें मांडीत आहे. स्त्री आणि पुरुष दोघांत हि एक च मानव-आत्मा वास करीत आहे. म्हणून बाह्य भेद असले तरी त्यांना महत्त्व देण्याची आवश्यकता नाहीं. बाह्य भेदामुळें कार्य-क्षेत्रांत कांहीं फरक होणें स्वाभाविक आहे. परंतु एवढ्या च मुळें आज आम्हीं दोघांत जे भेद-भाव केले आहेत ते समर्थनीय नाहींत.

हिंदुस्थानच्या मध्यकालीन इतिहासांत कांहीं विचारक असे निघाले कीं ज्यांनीं स्त्री-पुरुषांतील भेद मौलिक आहे, असें मानलें. परंतु ह्याला आधार केवळ त्यांची कवित्व-शक्ति होय. सृष्टीचें निरीक्षण करतां करतां सांख्यांना दोन तत्त्वें सांपडलीं. एक विविध-रूप-धारी जड, दुसरें एकरस चेतन. एकाला त्यांनीं "प्रकृति" असें नांव दिलें आणि दुसऱ्याला "पुरुष". दोहोंच्या संयोगानें संसार चालतो आहे. प्रकृति शब्द स्त्री-लिंग आहे आणि पुरुष पुंल्लिंग. या शाब्दिक लिंग-भेदाचा उपयोग करून कवींनीं सांगितलें कीं स्त्री प्रकृति-तत्त्वाचें प्रतिनिधित्व करते, आणि पुरुष पुरुष-तत्त्वाचें. कांहीं विचारकांनीं याला गंभीर स्वरूप दिलें, आणि असें मानलें कीं स्त्री संसारासक्त असते, तिला मोक्षाचा हि अधिकार नाहीं. मोक्षाचा अधिकारी फक्त पुरुष च होऊं शकतो. स्त्रीला मोक्ष पाहिजे असेल तर दुसऱ्या जन्मीं तिनें पुरुष झालें पाहिजे. प्रकृति शब्द स्त्री-लिंग व पुरुष शब्द पुंल्लिंग ह्या शिवाय ह्या विचारकांच्या अशा प्रकारच्या विचार-सिद्धीला इतर कोणता हि आधार नव्हता. त्यांनी विकृत बुद्धि व काव्य-शक्ति ह्या आधार होता असें फार तर म्हणावें. परंतु सांख्यांनीं तर प्रकृतीला प्रधान हि म्हटलें आहे. आणि प्रधान शब्द तर पुंल्लिंग आहे.

वस्तुतः स्त्री-पुरुषांत एक च पुरुष-तत्त्व-जें चेतन आहे —समान रूपानें भरलेलें आहे. आणि दोघांचें हि शरीर एका च प्रकृति-तत्त्वाचें घडलेलें आहे. संसारासक्ति किंवा संसार-बंधन दोघांत हि समान आहे. आणि

मोक्षाचा अधिकार हि दोघांचा समान आहे. परंतु काव्य-शक्ति कोठपर्यंत अनर्थ करूं शकतें याचें 'प्रकृति' 'पुरुष' शब्द एक उदाहरण होऊन बसलें आहे.

संस्कृत काव्यांत मीं असें वाचलें कीं दमयंतीच्या महालांत वायूला हि प्रवेश नव्हता. कां? एवढ्या च साठीं कीं वायु पुल्लिंग आहे. मग पर-पुरुषाला दमयंतीच्या महालांत स्थान कसें असूं शकणार? दमयंती बिचारी केव्हां च मरून सुटली. परंतु जेव्हां मीं हें वाचलें तेव्हां बिचाऱ्या दमयंतीची काय दशा झाली असेल या विचारानें मी अगदीं व्याकुळ झालों. परंतु नंतर थोड्या वेळानें माझें मन निश्चित झालें. कारण माझ्या लक्षांत आलें कीं दमयंतीच्या महालांत वायु जाऊं शकत नसेल, पण हवा तर जरूर जात असेल. कारण हवा शब्द स्त्री-लिंग आहे. असा आहे हा शब्दांचा महिमा!

स्त्री संसारासक्त आणि पुरुष मोक्षप्रवण व विरक्त आहे, असें मानणाऱ्या या विचार-प्रवाहापासून भिन्न असा दुसरा हि एक विचार-प्रवाह चालत आला आहे. तो असा : "स्त्री पुरुषाहून श्रेष्ठ आहे. तिच्यांत दयाभाव स्वभावतः च अधिक असतो. मुलांचें शिक्षण, समाज-शासन स्त्रियांच्या हातीं सोंपविण्यांत आलें, तर अहिंसक समाजरचना सुलभतेनें सिद्ध होईल." या सर्व कार्यांत स्त्रियांनीं भाग घ्यावा असें तर मी देखील इच्छितों. आज पर्यंत हीं कामें सामान्यतः पुरुष च करीत आले आहेत. म्हणून स्त्रियांचा प्रवेश त्यांत झाल्यास त्या कार्यांना एक प्रकारचा तजेला येईल, असें हि मी मानतों. परंतु हे नवे विचारक म्हणतात तसें मात्र मी समजत नाहीं. कारण दया आदि गुण कोणत्या हि जातीचे किंवा लिंगाचे आश्रित नाहींत. बाह्य उपाधींमुळें गुणांच्या प्रकाशनांत, त्यांच्या प्रगट होण्याच्या पद्धतींत, फरक होऊं शकेल परंतु दोघांच्या गुणांत च फरक आहे असें मानणें विचार व अनुभव दोहोंच्या हि विरुद्ध आहे.

परंतु भेद मानणारे गुणांमध्यें भेद मानतात इतकें च नव्हे, तर दोघांच्या ग्रहण शक्तींत हि फरक आहे, असें मानतात. कांहीं म्हणतात कीं

स्त्रियांना काव्य अनुकूल आहे, गणित प्रतिकूल. पुरुषांत पराक्रमशीलता अधिक असते. त्यांच्या बुद्धीची ग्रहण-शक्ति व स्वभाव ह्यांना अनुकूल असे च अध्ययनाचे विषय असले पाहिजेत. या च प्रमाणें स्त्रियांत सौंदर्य-भावना, करुणा इत्यादि मृदु वृत्ति अधिक असतात. ही च स्थिति त्यांच्या ग्रहण-शक्ती-संबंधीं. त्यांचे अध्ययनाचे विषय तदनुसार असले पाहिजेत. मूळ स्वभाव आणि उपाधिजन्य भेद यांचें सम्यक् विश्लेषण न केल्यामुळें उत्पन्न झालेले हे भ्रम आहेत असें मी मानतों.

नई-तालीम ( वर्धा-शिक्षण-पद्धति ) मध्यें मुलांना हि स्वयंपाक शिकविला जातो. यावर एका गृहस्थानें आक्षेप घेतला. त्यांना ह्या गोष्टीचें दुःख झालें कीं मुलांच्या शिक्षणाचा वेळ खराब करून आम्ही त्यांना कां उगी च चुलींत घालतों? त्यांच्या मतें मुलींना त्या कामांत घातलें पाहिजे. मीं त्यांना समजावलें, मुलींनीं स्वयंपाक केला तर तो शिजविण्याला अग्नि इन्कार करीत नाहीं. जोंधळ्याची भाकर लिंग-भेद ओळखत नाहीं. स्त्री पुरुष दोघांच्या हि भुकेचें समान भावानें निवारण करते. तसें च भूक हि लिंग-भेद ओळखत नाहीं. मग कसें करायचें? यांत प्रतिष्ठेचा हि प्रश्न लोक उत्पन्न करतात. आम्हीं समजलें पाहिजे की प्रतिष्ठा स्त्रीची हि नाहीं व पुरुषाची हि नाहीं. प्रतिष्ठा त्याची, जो प्रतिष्ठेला योग्य. प्रतिष्ठेचा कर्म-विशेषाशीं कांहींएक संबंध नाहीं.

मुली आणि मुलगे यांच्या एकत्र राहण्यावर हि क्रित्येकांचा आक्षेप आहे. ते म्हणतात कीं हा प्रयोग धोक्याचा सिद्ध होणार आहे. सिद्ध तर आम्ही जें करूं तें होईल. ही गोष्ट आमच्या शक्तीवर अवलंबून आहे. तसें च म्हटलें तर दोन व्यक्तींच्या एकत्र राहण्यांत जसे कांहीं गुण असतात तसे कांहीं धोके हि असतात च. कांहीं लोक मला विचारतात की आपण ब्राह्मण आणि हरिजन मुलांना एका च छात्रालयांत ठेवाल काय? संगतीमुळें कांहीं दोष निर्माण होणार नाहीं काय? मी सांगतों, ती भीति मला हि वाटते. ब्राह्मण आणि हरिजन दोघांना एकत्र ठेवण्यांत ही भीति जरूर आहे कीं जो दंभ आजपर्यंत ब्राह्मणांपर्यंत च मर्यादित होता तो हरिजनांत हि पसरेल.

पण जेथें आम्ही शिक्षण देण्यासाठीं बसलों आहों तेथें असे धोके आम्हांला पत्करले च पाहिजेत. जेथें धोका नाहीं तेथें प्रयोग नाहीं. आणि जेथें प्रयोग नाहीं तेथें शिक्षण नाहीं. माझ्यांत च हिंमत नसेल तर मी आपली हार कबूल करीन, पण सिद्धान्त कायम राखीन.

माझ्या एका मुलीनें मला म्हटलें कीं भगवत्-गीतेंत स्त्रियांच्या साठीं कांहीं शिक्षणाची व्यवस्था च नाहीं. तेथें स्थित-प्रज्ञ आहे, गुणातीत आहे, योगी आहे. पण स्थित-प्रज्ञा गुणातीता आणि योगिनीचीं लक्षणें सांगितलेलीं नाहींत. कदाचित् तिला हवी होती कायदेशास्त्रांतील "ही" आणि "शी" ( तो आणि ती ) ची परिभाषा. मीं तिला म्हटलें "त्याची काळजी करूं नकोस. गीता खुद्द तर स्त्री आहे ना? आणि तिच्या पोटांत हे सर्व स्थित-प्रज्ञ आदि पडले आहेत. आम्हांला तर गुरुमंत्र मिळाला आहे 'तत् त्वमसि'! काळा-गोरा हरिजन-परिजन, हिंदू-मुसलमान, स्त्री-पुरुष हे सर्व भ्रम आहेत. तूं यांहून भिन्न, विशुद्ध केवळ आत्मा आहेस. तूं शव नाहींस, शिव आहेस. तुझ्या शिवाय हें सर्व शव आहे, प्रेत आहे. तूं प्रेताचें विच्छेदन कशासाठीं करीत बसला आहेस? भेद तर हें प्रेत करीत आहे. एक आत्म-तत्त्व च काय ती जिवंत वस्तु आहे. त्याला ओळख; ह्याला विसर. विचार-भेदांत अभेद पाहणें हें उत्तम-बुद्धीचें लक्षण आहे, पुरुषार्थ आहे. भेद वाढविणें हीन बुद्धीचें लक्षण आहे, पुरुषार्थ-हीनता आहे.

माझे विचार हे असे आहेत. थोडक्यांत तुमच्या समोर मीं ते मांडले आहेत. तुम्हांला जर ते पटले तर तुम्ही पुढें जी चर्चा करणार आहांत तिला ते पायारूप होऊं शकतील. जर तुम्हांला हे पटले नाहींत तर माझी अध्यक्षता तुम्हांला निरुपयोगी सिद्ध होईल आणि वेगळ्या च पायावर तुम्हांला आपली इमारत उभी करावी लागेल.

[ मराठी हरिजन, २६ जानेवारी १९४७ ]

## : २५ :

## आत्म-निष्ठ व्हा

मला येथें पुष्कळ प्रश्न विचारण्यांत आले. त्या सर्वांची वेगवेगळी उत्तरें देण्याची आवश्यकता नाहीं. कारण पुष्कळसे प्रश्न असे असतात कीं ते विचारण्यांत च समाधान असतें. तरी त्या प्रश्नांच्या अनुरोधानें मी चार शब्द आपणांसमोर मांडतों.

आपल्या देशांतील स्त्रियांच्या आजच्या दशेला पुरुष च पुष्कळ अंशीं जबाबदार आहेत असें आतां एका भगिनीनें सांगितलें. मी या आरोपाचा दुःखित मनानें स्वीकार करतों. मला त्याची जाणीव हि आहे. माझ्या जीवनाची घडण या जाणिवेनें च तयार झाली आहे आणि माझ्या आईची आठवण ठेवून मी यथावत माझी जबाबदारी पार पाडण्याचा निरंतर प्रयत्न करीत आलों आहें.

काल मीं एक मूलभूत विचार आपणांसमोर मांडला होता. स्त्री-पुरुषांत जो भेद आहे तो जगाच्या आधीन आहे तो नाहींसा करण्याची कुणाची इच्छा नाहीं आणि शक्ति हि पण नाहीं. पण या बाह्य भेदाला जें लौकिक स्वरूप आलें तें मात्र नसें नाहीं. तें स्वरूप म्हणजे निसर्गाची एक योजना आहे. तिच्या मुळाशीं पवित्र भावना आहे. प्रजानिर्मिती चें तें केवळ एक साधन आहे.

---

* ता. १३-१-४७ ला वर्धा येथें महिला-सत्य-संमेलनाच्या प्रसंगीं दिलेलें उत्तरादाखल भाषण

पण या विषयाचा मनुष्य-प्राण्यानें मात्र अत्यंत दुरुपयोग केलेला आहे. खरें म्हटलें तर ती एक शास्त्रीय वस्तु आहे. तथापि तिला आज लाजिरवाणें स्वरूप प्राप्त झालें आहे. तें इतकें कीं त्या वर मोकळ्या मनानें बोलणें देखील अशक्य होऊन बसलें आहे. परंतु समाजाला शास्त्रीय वळण लागलें कीं या विषया-संबंधीच्या गैर समजुती हि नाहींशा होतील. आणि आजच्यासारखा त्या विषयाचा दुरुपयोग मग होणार नाहीं. म्हणून माझें म्हणणें असें कीं या बाह्य भेदाला विसरून मानवी दृष्टीनें आंतरिक अभेदाच्या पायावर च आम्हांला आपली जीवन-रचना घडवायला हवी.

'मग तुम्ही स्त्री-पुरुषांच्या शिक्षणांत कांहीं च फरक करणार नाहीं का?' असें लोक विचारतात. त्या वर मला असें म्हणावयाचें आहे कीं भेद च पहावयाचा असेल तर तो माणसा माणसाच्या शिक्षणांत हि असूं शकतो. पुरुषांच्या योग्यतेंत हि तारतम्य असतें च आणि त्या अनुरोधानें विशेष शिक्षण भिन्न भिन्न प्रकारांनीं दिलें जातें. तथापि सर्व-सामान्य शिक्षणाच्या धोरणांत त्यामुळें बदल होत नाहीं. असें च स्त्रियांच्या बाबतींत मानलें पाहिजे. एका भगिनीनें विचारणा केली होती कीं 'बाल-संगोपन हें स्त्रियांच्या च शिक्षणांत येत नाहीं का?' जरूर येतें. पण पुरुषांच्या शिक्षणांत बाल-संगोपनाची गरज च नाहीं असा जर त्यांतून अर्थ निघत असेल तर तें मला कबूल नाहीं. मुलें तर माता आणि पिता या उभयांचीं असतात. त्यामुळें उभयतांना हि बाल-संगोपनाची माहिती आवश्यक आहे. त्यांतल्या त्यांत मातेला तें ज्ञान विशेष हवें, एवढें आपल्याला मानतां येईल.

: ६६ :

# आशंका-निरसन

दोन भगिनी लिहितात :

प्रश्न १. "विनोबांच्या महिला परिषदेंतील भाषणांत स्त्री-पुरुष-शिक्षणाचा अभेद हा मुख्य मुद्दा होता. परंतु कांहीं बाबतींत तरी भेद करावा लागेल असें आम्हाला वाटतें. बायकांना गरोदरपण, बाळंतपण, मासिक पाळी या गोष्टींचा भार उचलावा लागतो. तदुपयोगी शिक्षण तर त्यांना च घेतलें पाहिजे. पुरुषांना या शिक्षणाची मुळीं च गरज नाहीं. उलट तो काळाचा अपव्यय होईल. माता बालकाला अंगावर पाजते तो पर्यंत त्याच्या शारीरिक व मानसिक वाढीची काळजी घेणें जितकें तिला प्राप्त असतें, तितकें पुरुषाला नसतें. तेव्हां या हि बाबतींत बायांना वेगळें शिक्षण जरूर आहे.

प्रश्न २. एका च वातावरणांत जरी उभयतांना वाढविलें तरी दोघांच्या वाढींत फरक पडेल. स्त्री जन्म-दात्री असते. तदनुरूप तिचे स्नायु व अस्थि मृदु होणार च. या मृदुपणाला झेपेल व तो टिकून राहील असा कार्य-भार तिच्यावर पडला पाहिजे. कार्य वेगळें म्हटलें कीं शिक्षण वेगळें होईल.

प्रश्न ३. वयाची सात ते चौदा वर्षे समान शिक्षण द्यावें. पुढें दरेकाच्या अभिरुची किंवा गरजे नुसार वेगवेगळें शिक्षण घेण्याची सोय पाहिजे, असा शिक्षण-कोविदांचा अभिप्राय आहे.

स्त्री ही स्त्री असल्यामुळें च तिची आवड निवड वेगळी असणें साहजिक आहे. आमच्या शाळेंत हें दिसून येतें. गणित वगैरे विषयांपेक्षा

शिवण, विणकाम, स्वैपाक वगैरे विषयांचे तास मुलींना आवडतात. तेव्हां त्यांच्यासाठीं वेगळा अभ्यास-क्रम हवा च. तशी आवड असणाऱ्या पुरुषांना पाहिजे तर तो उघडा ठेरावा.

प्रश्न ४. हा प्रश्न किंचित् वेगळा आहे. "प्रश्नेरीला मोना होता येईल." या लेखांत म्हटलें आहे, "मुलांना शिक्षेची भीति दाखवून शिस्त लावूं नये. त्यांना निर्भय वाढलें पाहिजे." ही कोणाला हि पटण्यासारखी गोष्ट आहे. परंतु पुष्कळदां तें सुसाध्य वाटत नाहीं. आमची अशीच मर्यांची भाची आहे. अतिशय हट्टी, रडकी आहे. एकदां रडायला लागली की किती हि समजावलें तरी थांबत नाहीं. त्रासच त्रास होतो. इतरांना कामांत व एकाग्रतेंत क्षति च प्राप्त होते. अशा मुलांची स्वतंत्र "नर्सरी" ठेवणें प्रत्येक कुटुंबात शक्य नसतें. शेवटीं तिला खूप रागावून, कधीं कधीं मारून, गप्प करावें लागतें. मग भीतीनें थरथर कांपत ती गप्प होते. ही मुलगी त्यानें भित्री होणार. आपल्या समाजाचा एक हि घटक भित्रा व्हावयास नको. पण हें व्यवहारात उतरावयाचें कसें ?"

पहिल्या तीन प्रश्नांचा एकत्र विचार करूं.

स्त्री-पुरुष-शिक्षणाचा अभेद हा माझ्या भाषणाचा मुख्य मुद्दा नव्हता. एकूण सर्व च बाबतींत स्त्री पुरुषांचा मूलतः अभेद हा मुद्दा होता. सामाजिक दरजा, आर्थिक हक्क, नागरिक अधिकार, कुटुंबांतील स्थान, नैतिक योग्यता शिक्षण-क्षमता, मानसिक भाव, गुणोत्कर्ष हीं सारीं दोघांचीं समान आहेत, असावयास पाहिजेत, हा त्या भाषणांतला मुख्य मुद्दा आहे. स्थूल शिक्षणांत काहीं फरक राहील, त्याला या विचारानें बाधा येत नाहीं. पुरुषा-पुरुषांत हि विशिष्ट शिक्षणाची गरज असूं शकते, तशी स्त्री-पुरुषांत हि असूं शकते, हें त्या भाषणांत हि मांडलें च आहे. संतान-विषयक विशेष ज्ञान स्त्रीला पाहिजे. पण पुरुषाला तें मुळीं च नको असें नाहीं संतानविषयक जबाबदारी, थोडी वेगळ्या प्रकारानें, पण दोघांची आहे.

पण मुख्य विचारणीय प्रश्न हा आहे कीं उभयतांचें जीवन उद्दिष्ट भिन्न आहे कीं एक च आहे ? माझें म्हणणें " एक च आहे. " पूर्णता प्राप्त करणें हें मानव-जीवनाचें उद्दिष्ट आहे. त्याच्या पोटांत वेगळीं कार्यें निघाल येतील. त्या वेगळ्या कार्यांना हि मनोविकासाचा एक समान पाया राहील. पाया एक, शिखर एक, मधला इमारतीचा आकार एक, एवढें निश्चित समजून मग खिडक्या, कोनाडे, रंग वगैरे काय फरक राहील तो, शिक्षणाच्या भाषेंत हें कसें बसावयाचें तें पाहतां येईल.

आज मुलांमुलींच्या अभिरुचींत आणि शाळेतल्या विषयांच्या निवडींत जो फरक आढळतो, तो सामाजिक उपाधींमुळें झालेला आहे. सैंपाक, शिवण इत्यादि विषय मुलींना अधिक आवडतात हें म्हणणें गौण च आहे. गणित आवडणाऱ्या मुली मीं पाहिल्या आहेत. आणि सैंपाक आवडणारा पुरुष मी स्वतः च आहें. मला गणित हि आवडतें. न आवडणारा विषय मला अजून सांपडला च नाहीं. आजचें कृत्रिम सामाजिक वातावरण काढून टाकल्यास, आणि बौद्धिक विषय निष्क्रिय आणि निष्कारण शिकविण्याची पद्धत सोडून दिल्यास, माझ्या प्रमाणें सर्वांना च जीवनाचे सर्व विषय आवडतील आणि त्यांत बायका-पुरुष हा भेद राहणार नाहीं, असें माझें म्हणणें आहे.

चौथा प्रश्न मनोरंजक च आहे.

निर्भयता हा सर्व सद्गुणांचा आधार आहे. तो गमावून कांहीं हि कमावणें करंट-लक्षण आहे, हें चित्तांत ठसल्यानंतर मग त्या प्रश्नांत मनोरंजन च उरतें. त्याचें सामाजिक उत्तर द्यायचें तर पूर्व, बुनियादी शिक्षणाची योजना, जिला बालवाडी म्हणतात. ती च आहे. कौटुंबिक हें आहे कीं मुलें हीं कुटुंबांतलीं आनुषंगिक वस्तु नसून मुख्य वस्तु आहे हें लक्षांत घेऊन गृहस्थ-जीवन नियंत्रित व्हायला पाहिजे. प्रत्यक्ष तोडग्याचें उत्तर हें आहे कीं त्या मुलीला जसें मनापासून रडतां येतें तसें तिच्या मामीला मनापासून हसतां आलें पाहिजे. करून पाहण्यासारखा उपाय आहे. हासण्या पुढें रडणें टिकेल च

शकत नाहीं. अट एवढी च कीं तें जितकें मनापासून तितकें च हें मनापासून असलें पाहिजे. माझा अनुभव असा आहे कीं लहान मुलें जितकीं समंजस असतात तितकीं मोठीं माणसें नसतात. आणि म्हणून "लहान मुलासारखें व्हा" हें ज्ञानी पुरुषांनीं एक आचार-सूत्र बनविलें आहे. एक उडणारा कावळा रडणाऱ्या मुलाला हसवूं शकतो. एक अबोध बालक आईवर परिपूर्ण विश्वास ठेवून तिच्या पोटीं खुशाल जन्माला येतो, तिच्या मांडीवर निःशंक निजतो, ती म्हणेल तो चंद्र, नि म्हणेल तो सूर्य समजतो. अशा बालका विषयीं आई बाप कोणत्या तोंडानें तक्रार करणार ? तथापि पत्रकार भगिनी लिहितात त्याप्रमाणें मारण्याची प्रेरणा जर मातेला झाली च तर क्रियेचें कर्तव्य ती आपल्यावर च ओढून घेऊं शकते.

[ मराठी हरिजन, २१-७-४७ ]

## :२७:

# मुलां मुलींचें शिक्षण

एक मित्र लिहितातः—तालिमी संघानें नेमलेल्या एका समितीच्या इंग्रजी अहवालांत अशा अर्थाचें एक कथन आहे कीं 'सक्तीचें शिक्षण मुलांना व मुलींना हि देणें शक्य नसेल तर निदान मुलांना तरी द्यावें.' मला हें पटत नाहीं. माझें मत नेमकें ह्याच्या उलट आहे. समितीचा एक सदस्य या नात्यानें आपलें हि नांव शेवटीं छापलें आहे. सबंध अहवाल आपण कदाचित् वाचला नसेल आणि वरील कथन आपल्या नजरेस पडलें नसेल असें मी मानलें आहे. आपलें याबाबत काय म्हणणें आहे?

शिक्षण मुलांना आणि मुलींना उभयतांना समान मिळालें पाहिजे, आणि सर्वांना तें अनिवार्य असलें पाहिजे, असें मी मानीत आलों आहें. सात वर्षांचें शिक्षण अनिवार्य असलें पाहिजे असा समितीचा अभिप्राय आहे. ही झाली शिक्षण-दृष्टि. परंतु चालू सामाजिक परिस्थितींत, समाज-सुधारणे-च्या अभावीं, सात वर्षें मुलींना शिक्षण अनिवार्य करतां न आलें तर निदान मुलांच्या बाबतींत तरी तशी अडचण नसल्यामुळें तें अनिवार्य केलें जावें असा त्या शिफारशीचा भावार्थ आहे. शिक्षण-दृष्टीनें मुला-मुलींत भेद करण्याची कल्पना समितीची नाहीं. सबंध देशाला एखादी योजना लागू करतांना येणाऱ्या उपाधि त्यांत शिरतात. अहवाल आठ दहा वर्षां पूर्वीचा आहे. आणि देशाची दशा तेव्हांपासून पुष्कळ पालटून गेलेली आहे. त्यामुळें शिक्षणाच्या अनिवार्यतेंत मुला-मुलींच्या संबंधानें विशेष भेद करण्याची गरज आतां राहणार नाहीं अशी आपण आशा करूं या.

[ मराठी हरिजन, ता. ३० मार्च १९४० ]

: २८ :

## देवस्थान-सुधारणा

वारकरी पंथाचे एक कीर्तनकार, लिहितात . —

पंढरपूरचें पांडुरंगाचे मंदिर हरिजनांसाठीं खुलें रहावें ही आकांक्षा आणि तळमळ संत भूमिकेस साजेशी च आहे. "सकळांसी आहे येथें अधिकार" इ० अभंग-वाणीद्वारा तुकाराम महाराज आदि संतांनीं तिचा पुरस्कार केला आहे. अस्पृश्य कोणास समजावें याचा हि निर्णय ज्ञानेश्वर महाराजांनीं दिला आहे. "काम एष क्रोध एष" या वर टीका करतांना काम-क्रोधादि विकार आणि त्यांचे साथीदार हे च खरे अस्पृश्य होत असें त्यांनीं दर्शविलें आहे. परंतु हरिजनांना मंदिरें मोकळीं झालीं म्हणजे तेवढ्यानें च देवस्थान-सुधारणेचें आणि धर्म शुद्धीचे कार्य पुरें होत नाहीं. देवस्थानें अध्यात्म-विद्येचीं पीठें झालीं पाहिजेत. त्या साठीं देवस्थानाचा कारभार योग्य माणसांकडे राहिला पाहिजे. देवस्थानांपाशीं पैसा पुष्कळ असतो. त्याचा सदुपयोग झाला पाहिजे."

लेखकाच्या लेखाचा हा मी सौम्य भाषेंत सारांश दिला आहे. आजच्या आमच्या मंदिरांत अनेक ठिकाणीं नाना प्रकारचा अनाचार चाललेला आहे. अज्ञान जनतेची उदार श्रद्धा आणि ईश्वराची सहनशीलता यांच्या जोरावर तो निभला आहे. पण ईश्वराची सहनशीलता निष्क्रिय नसते. कर्म

आणि त्याचें फळ यांचा संबंध जोडून ईश्वर तटस्थ झाला आहे. आणि देवळांची सुधारणा जर लवकर झाली नाहीं तर त्या देवळांचा उच्छेद होण्याची योजना ईश्वराची सहनशीलता करून राहिली आहे. येशू ख्रिस्त देवळांत शिरला आणि तेथें त्याला बाजार भरलेला दिसला. आज जर ज्ञानदेव किंवा तुकाराम आमच्या देवळांत येऊन पाहतील तर तें च त्यांना दिसेल. आणि मग ख्रिस्ताप्रमाणें हे सारे बाजार मोडून टाकण्याच्या उद्योगाला ते लागतील. पण हें कार्य अशा राग-द्वेष-रहित सत्पुरुषांचें आहे. प्राकृत लोकांनीं इतकें च करायचें कीं सर्वांना समत्वानें देव-दर्शन घेतां यावें आणि मंदिरांचा कारभार जनतेनें निवडलेल्या लोकांच्या हातीं असावा अशी व्यवस्था करून थोर सत्पुरुषांच्या आगमनाची सक्रिय वाट पहावयाची.

[ मराठी हरिजन, ता. १२-१-४७ ]

: २९ :

## सत्य हें च शहाणपण

खरेपणानें वाग. जर तुला आपलें बरें व्हावें असें वाटत असेल तर खरेपणानें वाग. दुनिया खोट्यावर चालते अशी तुझी समजूत झाली आहे असें दिसतें. पण ती समजूत चुकीची आहे. ती सोडून दे. दुनिया देवाची आहे. आणि देव तर खरेपणाची मूर्ति आहे. मग लबाड दुनिया तो कशी बन-वील ? दुनिया लबाड नाहीं, दुनियेची उभारणी खोट्यावर झालेली नाहीं.

लबाड माणसाला च घबाड लाभ होतो असा हि तुला कधीं कधीं भास होईल. पण तो भास च आहे हें लक्षांत ठेव. भासाच्या भरंवशावर जाशील तर हंसें करून घेशील, नव्हे रडशील. वरवरचें पाहणें सोडून दे. खोल पहा, म्हणजे निराळा च उजेड पडेल. लबाडीच्या व्यवहारानें दोन दिवस भरभराट होतेशी दिसेल, पण ती नुसती फसवणूक आहे. दिवा विझण्यापूर्वी मोठा होतो तशांतली च ही गोष्ट आहे. कडेलोटाची सजा झालेल्या माणसाचे पाय जरी वरवर चढतांना दिसले तरी ह्या वरचढीच्या पोटांत काय सांठविलेलें असतें ? खोटेपणा करून आज जीं राष्ट्रें मोठेपणाच्या माथ्यावर चढलेलीं दिसतात त्यांचा उद्यां कडेलोट व्हावयाचा आहे, हें तुला समजतें काय ? नसेल समजत तर इतिहास पहा, म्हणजे समजेल.

वस्तुतः खरेपणासारखें सोपें कांहीं च नाहीं, हें लहान मुलाला हि समजतें. उलट खोटेपणानें वागणें च फार कठिण आहे. एक खोटें पचविण्या

साठीं दुसरें खोटें रचून ठेवावें लागतें. ही गोष्ट सगळ्यांना च साधण्यासारखी नाहीं. म्हणून च तेवढ्यासाठीं खास एक वर्ग बनविण्यांत आला आहे. त्याला "मुत्सद्दी" म्हणतात. पाणी एकसारखें वाहत राहून जसा संथपणाचा भास पैदा करतें त्याप्रमाणें खोट्या मागून खोट्याचा चाहता क्रम जारी राखून दुनियेची नजरबंदी करण्याची मुत्सद्द्यांची खटपट असते. असली खटपट केव्हांना-केव्हां तरी उघडी पडते च आणि शेवटीं सगळा च घोंजवारा होतो. खरेपणानें वागण्यांत एक तर अशी कांहीं च खटपट करावी लागत नाहीं. दुसरें, त्याला उघडें पडण्याची धास्ती नाहीं, कारण तें सदाचें उघडें च आहे. आणि तिसरी मोठी गोष्ट ही कीं तें कधीं च फुकट जात नाहीं. मुत्सद्याला सवाई मुत्सद्दी भेटूं शकतो. त्यामुळें मुत्सद्दीपणावर मात होते. पण खरेपणावर मात होऊं शकत नाहीं. खरेपणांत सवाईंशिवाई नाहीं, त्यामुळें त्यावर चढाई होऊं शकत नाहीं.

शिवाय असें हि लक्षांत घे कीं मुत्सद्यांची खटपट कशासाठीं असते? जवळचा रस्ता काढण्यासाठीं. पण तूं रेखा-गणित शिकला आहेस ना? मग कोणच्या हि दोन टोकांमधलें कमींत कमी अंतर म्हणजे त्या दोन टोकांना जोडणारी सरळ रेघ, हा नियम तूं कसा विसरतोस? मुत्सद्दी वांकडें-तिकडें डोकें घालवून जवळचा रस्ता शोधीत असतात. पण जवळचा रस्ता सरळ च असतो. त्याच्यासाठीं डोकें चालविण्याची जरूर नसते. त्याच्यावरून पाय चालवावयाचे असतात. सत्यापुढें शहाणपण रद्द आहे. किंवा सत्य हें च शहाणपण आहे. म्हणून मुत्सद्द्यांची वांकडी वाट सोडून दे आणि संतांचा सरळ मार्ग धर. हा मार्ग सोपा आहे, सरळ आहे, जवळचा आहे. थेट मुक्कामावर पोंचविणारा आहे.

[ महाराष्ट्रधर्म, ता. २ जुलाई १९२४ यांतून.]

: ३० :

## जीवनाचा उलगडा

जीवाचें जीवन हा एक वासनांचा खेळ आहे. वासना म्हणजे जीवाचा जीवपणा. इतर जीवांप्रमाणें मानवाच्या हि जीवनांत तो च खेळ चाललेला आहे. तटस्थपणानें पाहिलें म्हणजे तो खेळ आहे. पण त्यांत जो गुंतलेला आहे तो त्यापायीं बेजार होऊन राहिलेला आहे. म्हणून वासनांतून सुटका हें शेवटचें ध्येय अनुभवी पुरुषांनीं ठरवलें आहे.

पण वासना जशी रडवते, तशी हसवते हि. रडवणारी वासना माणसाला नकोशी वाटते. हसवणारी हवीशी वाटते. पण तिचा हि एक बेत असतो. त्या बेताच्या बाहेर ती गेली म्हणजे ती हि दुःखदायी होते. म्हणून मुलें फार हसूं लागलीं म्हणजे आई समजावते, "फार हसूं नका, नाहीं तर पुढें रडाल."

"दुःखदायी वासना नको, सुखदायी हवी" हा वासना-विवेक म्हणायचा. सुखदायी देखील गरजेहून अधिक नको. हें वासना नियमन म्हणायचें. सगळ्या च वासनांतून सुटका, वासना-निरसन म्हणायचें.

वासना-निरसन ही फार च पलीकडची गोष्ट आहे—फार च उंच आहे. चालू जीवनांत कदाचित् ती कधीं च अमलांत येणार नाहीं. पण चालू जीवनांत हि ती निरुपयोगी नाहीं. दिशा-दर्शक अचल ताऱ्याप्रमाणे

ती उपयोगी पडणारी आहे. त्या ताऱ्यावर आपल्याला आज किंवा केव्हां हि चढतां न येवो, पण त्यानें च आपलें तारूं सुरक्षित आहे.

त्या अचल ताऱ्याच्या दिशेनें रोजच्या रोज वासना-विवेक आणि वासना-नियमन करीत रहावयाचें, हे शिक्षणाचें कार्य आहे. समाज-शास्त्र त्याची योजना बाहेरून करतें. तें च काम धर्म आंतून करतो. हल्लीं कोणी कोणी धर्माच्या नांवानें कंटाळलेले दिसतात. त्यांची सर्व भिस्त साहजिक च समाज-शास्त्रावर येऊन पडते. बिचारें समाज-शास्त्र त्यामुळें फार च तंग होऊन बसतें. अति तंग झालेलें समाज शास्त्र तापदायी होतें. त्यांतून बेडघोर वृत्ति बळावते. ती दाबण्यासाठीं राज्य-सत्ता उभी होते. धर्म गेला कीं राज्य आलें च मग तें भांडवलवाल्याचें साम्राज्य असो, किसान कामगाराचें अधिराज्य असो, किंवा डोक्यागणिक मत मोजणारें लोकशाही राज्य असो.

वाईट वासना सोडायची. बरी धरायची. ती हि अपरिमित वाढूं द्यायची नाहीं. बेतांत राखायची. आणि मग तिचें काय करायचें? तिची पूर्ति करायची. याला आपण वासना-समाधान म्हणूं. तें कसें साधायचें? हा हि एक मानवापुढें पैचाचा सवाल आहे. मनुष्याच्या ठिकाणीं अनेकविध वासनांबरोबर एक जाड्य-वासना आहे. वासनांची ती प्रतिक्रिया च आहे. बरी-वाईट, मित-अमित सर्व वासना एका बाजूला आणि जाड्य-वासना एका बाजूला, अशी दोहोंची रस्सी-खेंच चाललेली असते. वासना-निरसनाची भूक मानवाला आंतून असते. पण वासना निरसन देह-भावनेहून अलग झाल्याशिवाय साधणारें नसतें. तें तर परम-पुरुषार्थाचें काम. तें काम करण्याचा आव, ही जाड्य-वासना आणीत असते. वासना-समाधानाचें निसर्गानें निर्मिलेलें सरळ आणि सुलभ साधन म्हणजे शरीर परिश्रम तो टाळून वासना-पूर्ति कशी करतां येईल त्याचा शोध हि जाड्य-वासना करीत असते. मग "वासना परिमित राखाव्या" हें धोरण हि सुटतें. भविष्याची तयारी वर्तमानांत करावी

अशी वृत्ति उठून तींतून संचय-परायण अनर्थकारी अर्थ शास्त्र निर्माण होतें. वेदांच्या शिकवणीप्रमाणें "अद्या अद्या श्वः श्वः" आजचें आज, उद्यांचें उद्यां- हा यावर एक च तोडगा आहे. याला आपण वासना-नियंत्रण म्हणूं.

हें वासना-नियंत्रण कांहीं विचारी पुरुष निज संतोषानें नेहमीं च करीत असतात. आणि करोडो ते बलात्कारानें करून राहिले आहेत. सर्वांना च तें संतोष-पूर्वक साधलें पाहिजे. त्यासाठीं उपाय शरीर-परिश्रम-निष्ठे बरोबर च सर्वांनीं सर्वांची काळजी घेण्याची वृत्ति, हा च होऊं शकतो. याला गीता आत्मौपम्य किंवा साम्य-योग म्हणते. तो च मानवी जीवनाचा उलगडा आहे. कारण आजचें वासना-समाधान आणि अंतिम वासना-निरसन दोहोंची सोय त्यांत आहे.

[ मराठी हरिजन, ता. ९ मार्च १९४७ ]

: ३१ :

## एकराचें कोष्टक

शाळांतून मुलांना गणितासाठीं कोष्टकें शिकवावीं लागतात. घोकंपट्टी आणि छडी या दोन औजारांच्या जोरावर लहानपणीं गुरुजींनीं कोष्टकें आमच्या गळीं उतरविलीं होतीं. पण गळीं उतरविलीं तरी पुष्कळशीं जिरलीं नाहींत च. ह्याचें कारण एकतर हीं दोन औजारें आणि दुसरें, कांहीं कोष्टकें जवळ जवळ निरुपयोगी च होतीं. वास्तविक कोष्टकें जर जीवनोपयोगी असतील तर तीं जणूं इच्छिणाराला आवडलीं पाहिजेत आणि आवडतील अशा रीतीनें शिकवितां आलीं पाहिजेत. यासंबंधीं दिग्दर्शनादाखल एक उदाहरण देत आहें.

जीवनाचा मुख्य आधार शेती. आणि शेती मोजली जाते एकरानें. तेव्हां एकराचें कोष्टक मुलांना शिकवायला हवें च. तें कसें शिकवायचें तें पाहूं. एकर हा शब्द इंग्रजी आहे हें तर आधीं सांगितलें च पाहिजे. परंतु तो आतां आमच्याकडचा झाल्यामुळें त्याची स्वदेशी निरुक्ति अशी समजूं : एकर म्हणजे शेती मोजण्याचा एक. हिंदुस्थानांत माणशीं शेती सरासरी एक एकर पडते. तेव्हां आजच्या स्थितींत हिंदुस्थानांत एका माणसाच्या मालकीची जमीन म्हणजे एकर. अशा दुहेरी युक्तीनें 'एक' शब्दावरून एकर शब्दाची निरुक्ति लावावी, म्हणजे तो शब्द मुलांना सहज आत्मसात् होईल.

एकर म्हणजे ४८४० चौरस यार्ड असें सांगितलें जातें. हा विलक्षण आंकडा कसा लक्षांत ठेवायचा ? त्यासाठीं त्याचे दोन महत्तम अवयव पाहूं या.

ते होतात १२१×४०. १२१ चौरस यार्डाला गुंठा असें नांव देऊन ४० गुंठे म्हणजे एकर असें कोष्टक बनविण्यांत आलें आहे. पण आपण यार्डाची भाषा सोडून फूटांची भाषा घेऊं. आणि गुंठ्यांचे हि आणिक लहान भाग करूं. गुंठा म्हणजे १२१ चौरस यार्ड जमीन, म्हणजे ११ यार्ड × ११ यार्ड, असा एक जमिनीचा चौरस तुकडा; त्याचे ११ फूट लांब ११ फूट रुंद असे ९ तुकडे करता येतील. हे १२१ चौरस फूटांचे छोटे तुकडे गुंठ्यांत ९ म्हणजे एकरांत ३६० होतील.

वर्षाचे दिवस स्थूल मानानें ३६० असतात. जमीन रोज आपण खणायची ठरविली तर एका वर्षात एक एकर जमीन खणली जाईल. पावसाळी दिवस जमीन खणायला आडवा येईल ही गोष्ट आपण विसरून जाऊं. इतकी जमीन रोज खणायची च तर रोजचा किती वेळ खर्ची पडेल? माणसाची शक्ति, जमिनीचे प्रकार, ऋतुमान आणि औजाराची लायकी यांच्या मानानें उत्तर निरनिराळें येणार. पण अनुभव असा आला कीं ४० मिनिटां-पासून ८० मिनिटें लागतात. ठोकळ मानानें १ घंटा लागतो असें म्हणूं. १ घंट्यांत ही जमीन खणली जाते म्हणून लक्षणेनें ह्या जमिनीला आपण "घंटा" म्हणूं. घंटा म्हणजे ११ फूट गुणिले ११ फूट जमीन हें लक्षांत ठेवणें जड नाहीं. 'एकावर एक अकरा' हें सूत्र मुलांना माहीत च आहे. ११ फूट लांबीची आपण एक काठी धरूं. आणि ह्या काठीनें चौरस-चौरस जागा रेखून घेऊन ह्या आपल्या घंट्याचें मुलांना प्रत्यक्ष दर्शन करवून देऊं. असले ३६० घंटे म्हणजे एक एकर असें आतां सोपें कोष्टक तयार झालें. [ ह्या ठिकाणीं घंटा म्हणजे ११ फूट × ११ फूट अशी सम-चौरस जागा असा अर्थ नसून १२१ चौरस फूट जागा, इतका च आहे हें मुलांच्या लक्षांत आणून दिलें पाहिजे. १२१ चौरस फूट जागा अनेक प्रकारची असूं शकते. आपण स्मरण सुलभार्थ ती ११ फूट × ११ फूट घेतली आहे. ] शेतीसाठीं मुलांना

जमीन वाटून द्यायची तर ती घट्याच्या मापात वाटून देऊं कोणाला एक घटा जमीन, तर कोणाला दोन घटे जमीन म्हणजे आगपल्या पिकावरून मुलाना पिकाचें एकरी प्रमाण काढणें सुलभ जाईल

एकराचें आपण खालून कोष्टक पाहिलें आता वरून पाहू एक फर्लांग चौरस चौरस जमीन ४८,४०० यार्ड भरते म्हणजे १० एकर झाली साधारण जमिनीचा तुकडा १० एकराचा समजतात, मध्यप्रदेश सरकारनें १० एकराहून ज्याची जमीन कमी आहे अशा शेतकऱ्याना वायदा रुपयाला दोन आणे माफ केला आहे ही गोष्ट शिक्षकानें मुलाना सांगितलेली आहे व यावरून दहा एकर म्हणजे सर्व-सामान्य शेत हा अभिप्राय मुलांच्या चित्तात बिंबवावा हिंदुस्थानात माणशीं १ एकर जमीन पडते हें वर सांगितलें च आहे कुटुंबात ५ माणसें धरलीं तर ती कुटुंबागणिक ५ एकर झाली हिंदुस्थानात आज ७५ टके शेतकरी आहेत ४० वर्षांपूर्वी ७० टके होते देशातले उद्योगधंदे ढासळत चालल्यामुळें अधिकाधिक लोकांचा भार शेतीवर च पडून ४० वर्षांत ७० चे ७५ टके शेतकरी झाले चांगल्या स्थितींत ५० टके लोकांचा भार केवळ शेतीवर पडावा, असें आपण समजू तशी स्थिति आज असती तर प्रत्येक शेतकरी कुटुंबाच्या वाट्याला सरासरी १० एकर जमीन आली असती एका बैल-जोडीला २० एकर जिराईत लागते पण काहीं जिराईत, काहीं बागाईत, अशी जमीन धरली तर १० एकराचा तुकडा एका जोडीला लहान पडणार नाहीं मिळून कोण्या हि प्रकारें १० एकर शेत हें सर्वसामान्य शेत ठरतें याला आपण "आगर" हें नाव देऊं आणि १० एकर म्हणजे १ आगर असें मुलाना कोष्टक शिकवू हें आगर नेमकें चौरस असलें तर १ फर्लांग लांब आणि १ फर्लांग रुंद राहील फर्लांग शब्दाचा मूळ अर्थ हा च आहे अशीं आगरें चौरस मैलात किती मावतील ? रुपयाचे जेवढे पैसे तेवढीं, म्हणजे ६४ १० एकर = १ आगर, आणि ६४ आगरें = १ चौरस

मैल. म्हणून ६४० एकर = १ चौरस मैल. ६४० हा आंकडा सूत कांतणाऱ्या मुलांच्या परिचयाचा असल्यामुळें त्या कोष्टकाचा मुलांना बोजा वाटणार नाहीं. एकर म्हणजे धंट्याची ३६० पट आणि चौरस मैलाचा ६४० वा हिस्सा. अशा दोन पकडींत एकर स्थिर होतो.

या ठिकाणीं हें सांगणें विनाकारण आवश्यक झालें आहे कीं गुंडींत ६४० तार असतात आणि चौरस मैलांत ६४० एकर असतात. अशा उपमेनें मुलांना कोष्टक समजावणें म्हणजे मूलोद्योगद्वारा समवाय साधणें नव्हे. एकराच्या कोष्टकाची गरज मूलोद्योगांतून निर्माण होणें हा समवाय. उपमेनें ज्ञान गळीं उतरविणें ही शिक्षकाची कला. ह्या कलेचें समवायाशीं वांकडें नाहीं, पण ती स्वतः समवाय नव्हे.

एकराचें चढतें उतरतें कोष्टक

| | |
|---|---|
| १२१ चौरस फूट = १ धंटा | १० एकर = १ आगर |
| ९ धंटे = १ गुंठा | ६४ आगर = १ चौरस मैल |
| ४० गुंठे = १ एकर | |
| ३६० धंटे = १ एकर | ६४० एकर = १ चौरस मैल. |

[ ग्रामसेवा-वृत्त, सप्टेंबर १९४० ]

: ३२ :

## स्वाध्यायाची आवश्यकता

खेड्यांत जाणाऱ्या आमच्या कार्यकर्त्यांत बहुतेक उत्साही तरुण आहेत. ते काम सुरू करतात उत्साहानें आणि श्रद्धेनें, परंतु त्यांचा तो उत्साह शेवटपर्यंत टिकत नाहीं. खेड्यांत काम करणाऱ्या एका गृहस्थांनीं मला पत्र लिहिलें होतें. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें कीं 'मी सफाईचें काम करतों खरें, परंतु सुरवातीला त्याचा जो परिणाम गांवकऱ्यांवर होत होता तो आतां होत नाहीं. उलट, ह्याला कोठून तरी पगार मिळतो म्हणून च हा सफाईचें काम करीत आहे असें ते मानूं लागले आहेत.' शेवटीं त्या गृहस्थानें विचारलें आहे कीं आतां हें काम सोडून दुसरें काम मी हातांत घेऊं काय ?

अशा प्रकारें कार्यकर्त्यांना आपल्या कामांत शंका येऊं लागतात. आणि ही स्थिति फक्त कार्यकर्त्यांची च नाहीं, मोठमोठे विद्वान आणि पुढारी ह्यांची हि ही च स्थिति आहे यांचें मुख्य कारण मला एक च दिसतें; तें म्हणजे स्वाध्यायाचा अभाव. येथें स्वाध्याय शब्द मी ज्या अर्थानें वापरतों तें सांगणें आवश्यक आहे. स्वाध्यायाचा अर्थ मी असा करीत नाहीं कीं एक पुस्तक वाचून फेकून दिलें आणि दुसरें घेतलें आणि दुसरें घेतल्यानंतर पहिलें विसरून गेलें. त्याला मी स्वाध्याय म्हणत नाहीं. जो सर्व विषयांचें आणि

कार्याचें मूळ आहे, ज्याच्यावर बाकीच्या सर्व विषयांचा आधार आहे, परंतु जो स्वत: दुसऱ्या कोणत्या विषयाचा आधीन नाहीं, अशा एखाद्या विषयाचा अभ्यास करणें याला मी स्वाध्याय म्हणतों. त्या विषयांत दिवसांतून थोडा वेळ तरी एकाग्र होण्याची आवश्यकता आहे. स्वतःला आणि कातणें इत्यादि आपल्या इतर कामांना तितक्या वेळेपुरतें अगदीं विसरून गेलें पाहिजे. आपल्या स्वार्थाच्या संसारांत जितक्या बाधा आणि अडचणी निर्माण होतात त्या सर्व ह्या परमार्थी कार्यांत हि येऊं शकतील आणि हा हि जगाचा एक धंदा बनेल. हें एक पारमार्थिक काम आहे त्यामुळें स्वार्थी संसाराच्या कटकटीं-पासून तें मुक्त असेल असें जर कोणी समजत असेल तर त्यांत धोका आहे. म्हणून थोडा वेळ संसारापासून अलग होण्याची जशी आवश्यकता असते, तशी ह्या कामापासून हि अलग होण्याची आवश्यकता आहे. कारण, तें काम केवळ भावनेचें नाहीं, त्यांत बुद्धीची हि गरज आहे. भावना तर ऐदवळांत हि असते, परंतु त्यांच्यांत बुद्धीची उणीव आहे, ती मिळविली पाहिजे.

बुद्धि आणि भावना दोन अगदीं वेगवेगळ्या वस्तु आहेत असें नाहीं. ह्यासंबंधीं मी एक उदाहरण देत असतों. सूर्याच्या किरणांत प्रकाश आहे आणि उष्णता हि आहे. उष्णता आणि प्रकाश तार्किक पृथक्करणानें अलग अलग करतां येतात. पण जेथें प्रकाश असतो तेथें उष्णता हि असते. तसें च जेथें खरी बुद्धि आहे, तेथें खरी भावना हि असली च पाहिजे, आणि जेथें खरी भावना आहे तेथें खरी बुद्धि हि असली च पाहिजे. बुद्धि आणि भावना यांचें पृथक्करण आपण करूं शकत नाहीं. कारण त्या एकरूप च आहेत. आम्हांला बुद्धीशीं कांहीं करायचें नाहीं, आम्हांला सेवा करायची आहे आणि त्याच्याकरितां भावना असणें पुरेसें आहे, असा कोणी विचार करील तर तो चुकीचा विचार होईल. ह्या बुद्धीच्या प्राप्तीकरितां स्वाध्यायाची आवश्यकता

आहे. विद्वानांना देखील अशा स्वाध्यायाची गरज आहे. मग कार्यकर्ते तर नम्र च आहेत ना ? त्यांना तर स्वाध्यायाची विशेष च गरज असली पाहिजे. ह्या बाबतींत पुष्कळशा कार्यकर्त्यांना वाटतें कीं मधून मधून शहरांत जाऊन पुस्तकालयांत जाणें, मित्रांना भेटणें इत्यादि गोष्टी ग्रामसेवेकरितां उपयोगी आहेत, त्यामुळें उत्साह वाढतो, आणि तो उत्साह घेऊन मग खेड्यांत काम करण्यांत अनुकूलता होते. परंतु ज्ञानाचें आणि उत्साहाचें स्थान शहर नाहीं हें ते जाणत नाहींत. शहर कांहीं ज्ञानी लोकांचा अड्डा नव्हे !

उपनिषदांत एक गोष्ट आहे. एका राजाला कोणीं सांगितलें कीं एक विद्वान् ब्राह्मण तुझ्या राज्यांत आहे. त्याचा शोध करण्याकरितां राजानें नोकर पाठविले. सर्व शहरांत तपास केल्यावर हि त्यांना तो विद्वान् ब्राह्मण मिळाला नाहीं. तेव्हां राजा म्हणाला, 'अरे, ब्राह्मणाचा जिथें शोध केला पाहिजे तिथें जाऊन शोधा.' तेव्हां लोक जंगलांत गेले आणि तेथें त्यांना तो ब्राह्मण मिळाला. शहरांत तपस्वी मिळूं च शकत नाहीं, असें नाहीं. कधीं कधीं शहरांत हि असा मनुष्य मिळणें शक्य आहे. परंतु तेथील वातावरण त्याच्या अनुकूल नसतें. आत्म्याचें पोषण-रक्षण आजकाल शहरांत होत नाहीं. खेड्यांत निसर्गाशीं प्रत्यक्ष संबंध येतो, तो उत्साहाकरितां अत्यंत आवश्यक आहे. शहरांत निसर्गाची भेट कशी होणार ? जंगलांत नदी, पहाड, जमीन सर्व तेथें च समोर दिसतात. आणि जंगलाजवळ खेडीं च असतात, शहरें नाहींत. उत्साह मिळविण्याकरितां ग्रामसेवकांना शहरांत जावें लागावें, ह्या ऐवजीं शहरांतील लोकांनीं च कांहीं दिवस खेड्यांत जाऊन कार्यकर्त्यांना भेटत जावें हें अधिक चांगलें होईल.

खरें पाहिलें तर उत्साह दुसऱ्या च ठिकाणीं आहे. आणि तें ठिकाण आहे आपला आत्मा. त्याच्या चिंतनाकरितां कमींतकमी रोज

एखादा तास तरी वेगळा काढला पाहिजे. चित्र काढणारा चित्र पाहण्याकरितां दूर जातो आणि तेथून त्याला चित्रांत जे दोष दिसतात ते जवळ जाऊन तो दुरुस्त करतो. चित्र तर जवळ बसून च काढावें लागतें. परंतु त्याचे दोष पाहण्याकरितां वेगळें घ्यावें लागतें. ह्याचप्रमाणें सेवा करण्याकरितां जवळ तर जावें च लागेल, परंतु काम पाहण्याकरितां स्वतःला अलग करण्याची हि गरज आहे. हा च स्वाध्यायाचा उपयोग आहे. ह्यांतून च उत्साह मिळतो, मार्गदर्शन मिळतें, बुद्धीची शुद्धि होते.

[ विनोबा के विचार, भाग १ ]

: ३३ :

# ज्ञानदेवाचा गीतार्थ

"सत्यकथे" च्या जानेवारीच्या अंकांत प्रभाकरचा लिपिसुधारणेचा लेख आलेला आहे. मला दाखविण्यासाठीं कुंदर तो अंक घेऊन माझ्याकडे आला होता. सहजपणें मासिक चाळत असतां "ज्ञानेश्वरीचा गीतार्थ" हा श्री. फाटक यांचा सुंदर लेख पाहण्यांत आला. त्यांत "यद् यद् विभूतिमत् सत्वं" या श्लोकावरील ज्ञानदेवाच्या भाष्याविषयीं गैरसमजूत दिसून आली. पुष्कळांची या बाबतींत अशी च गैरसमजूत झाली आहे. म्हणून हें लिहीत आहें. श्लोक असा आहे—

> यद् यद् विभूतिमत् सत्त्वं
> श्रीमद् ऊर्जितमेव या
> तत् तदेव अवगच्छ त्वं
> मम तेजोंश-संभवम् ॥

ज्ञानदेवाच्या भाष्याचा विचार करण्यापूर्वी या श्लोकाचा अर्थ पाहिला पाहिजे. टिळकांनीं त्याचा अर्थ असा दिला आहे :

"जी जी वस्तु वैभव, लक्ष्मी किंवा प्रभाव यांनीं युक्त आहे ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून झाली असें च तूं समज."

इतर हि टीकाकार असा च सारखा अर्थ करतात. पण श्लोकांतील सूक्ष्मता या अर्थात नाहीं. दहावा अध्याय विभूतींचा आहे. त्याच्या उपसंहाराचा हा श्लोक आहे. म्हणून येथें 'विभूतिमत्' च्या बरोबरीनें 'श्रीमत्' आणि 'ऊर्जित' बसविण्याचा प्रश्न च नाहीं. "जें जें विभूतिमत् तें तें मदंशरूप आहे" हें मुख्य वाक्य असून विभूतिमत्चे दोन प्रकार म्हणून श्रीमत् आणि ऊर्जित त्याच्या पोटांत सांगितलेले आहेत. म्हणजे ते पॅरन्थिटिकल किंवा कंसांत सांगितल्यासारखे आहेत. विभूति दोन प्रकारच्या—

(१) श्रीमत् म्हणजे वैभवयुक्त, साधन-सामग्री-संपन्न, नैतिक सद्गुणांनीं मंडित. संस्कृतांतील "श्री" शब्दाचा अर्थ इतका व्यापक आहे.

(२) ऊर्जित म्हणजे (बाह्य-वैभव नसून हि) अंतस्तेजानें, आत्म-ज्ञानानें संपन्न. हे च दोन प्रकार गीतेच्या सहाव्या अध्यायांत, योग अपुरा राहिलेल्या माणसाला पुढें कसा जन्म लाभतो तें सांगत असतांना, सुचविलेले आहेत. "शुचि श्रीमान्" विरुद्ध "धीमान् योगी" अशी तिथें भाषा आहे. तेथें विशिष्ट अर्थ आहे, येथें व्यापक वृत्ति आहे. विभूतीच्या या दोन प्रकारांची ऐतिहासिक उदाहरणें द्यावयाचीं तर अशोक आणि शंकराचार्य यांचीं देतां येतील. निसर्गांतील द्यावयाचीं, तर तारकापरिवारासह मिरवणारा चंद्र आणि एकाकी प्रकाशणारा सूर्य अशीं देतां येतील. ज्ञानदेवानें पहिली विभूति एका ओवींत विशद केली आहे—

"जेथ जेथ संपत्ति आणि दया
दोन्ही वसती आलिया ठाया
ते ते जाण धनंजया
अंश माझे"

मुळांतील 'श्री' शब्दाचें स्वारस्य प्रगट करण्यासाठीं संपत्ति आणि दया हे दोन शब्द योजिले आहेत. दया शब्द पदरचा म्हणून घातलेला नाहीं, किंवा 'ऊर्जित' शब्दाचा हि तो अर्थ केलेला नाहीं. तो 'श्री' शब्दाचा ६ व्या अध्यायानुसार उलगडा केलेला आहे. मग 'ऊर्जित' शब्दाचें विवरण कुठें आहे ? कारण या श्लोकावर एवढी च एक ओवी दिसते.

येथें एक दुर्दैवी घटना घडून आली आहे. तीमुळें ज्ञानदेवानें 'ऊर्जित' शब्दावर विस्तृत विवरण केलेलें असून तें लोपल्यासारखें झालें आहे. छापणारांनीं तें सारें विवरण या श्लोकाच्याऐवजीं पुढच्या श्लोकाखालीं छापून दिलें आहे. त्याचा त्या श्लोकाच्या अर्थाशीं काडीचा संबंध नसून हि कोणाला ते वाचतांना दिसत नाहीं. तें विवरण असें —

अथवा एकलें एक बिंब गगनीं । परी प्रभा फांके त्रि-भुवनीं
तेवीं मज एकाची सकळ जनीं । आज्ञा पाळिजे
तयातें एकलें झणीं म्हण । तो निर्धन या भाषा नेण
काय काम-धेनूसवें सर्व साहान । चालत असे
तियेतें जें जेधवां जो मागे । तें तें एकसरें चि प्रसवों लागे
तेवीं विश्व-विभव तया आंगें । होऊनि असती
तयातें ओळखावया हें चि संज्ञा । जे जगें नमस्कारिजे आज्ञा
ऐसे माहाति ते जाण प्राज्ञा । अवतार माझे

दोन्ही विभूतींत तर-तम-भाव च पहावयाचा तर 'श्रीमत्' पेक्षां 'ऊर्जित' विभूति श्रेष्ठ म्हणावी लागेल. तें सुचविण्यासाठीं पहिल्या विभूतीसंबंधीं "ते जाण धनंजया अंश" आणि दुसऱ्या विभूतीसंबंधीं "ते जाण प्राज्ञा, अवतार माझे" अशी भाषा ज्ञानदेवानें योजिली आहे. अंश आणि अवतार एक च, पण अवतार शब्द अधिक योग्यता सुचवितो हें उघड च आहे.

त्यांत च अर्जुनाला एकीकडे "धनंजया" आणि दुसरीकडे "प्राज्ञा" हें संबोधन योजून ज्ञानदेवानें ध्वनीची भर घातली आहे.

परंतु अशा प्रकारें विभूतींत तरतम-भाव करावयास शिकविणें हें या विभूति अध्यायाचें प्रयोजन नाहीं. उलट हें सर्व विश्व परमात्ममय आहे, ह्याची ओळख पटवण्यासाठीं साधन म्हणून विभूति-चिंतन करावयाचें असतें. तें च पुढें "अथवा बहुनैतेन" या श्लोकांत सांगितलें आहे. त्याचें व्याख्यान "आणि सामान्य-विशेष, हें जाणणें एथ महादोष" इत्यादि ओव्यांनीं ज्ञानदेवानें पुढें केलें आहे. परंतु ऊर्जित शब्दावरील व्याख्यानाचा आरंभ ज्ञानेश्वरींत "अथवा" शब्दानें झाला आहे, आणि "अथवा बहुनैतेन" या श्लोकांत हि "अथवा" शब्द आहे, या साम्यावरून तें व्याख्यान या च श्लोकाखालीं जोडलें गेलें. ही चूक वारकऱ्यांनीं छापलेल्या हि ज्ञानेश्वरींत आहे. याचा अर्थ त्यांच्या मूळ पोथ्यांत हि ती असली पाहिजे. राजवाड्यांच्या पुस्तकांत ही चूक नाहीं. पण हिच्या उलट चूक आहे. तेथें "अथवा बहुनैतेन" वरील भाष्याचा कांहीं अंश "यद् यद् विभूतिमत्" या श्लोकाखालीं लावून दिला आहे.

सारांश, "यद् यद् विभूतिमत् सत्त्वं" या श्लोकाचा जसा टीकाकारांनी ढोबळ अर्थ केला आहे, तसा ज्ञानदेवानें केलेला नाहीं, नेमका अर्थ केला आहे, आणि तो हि चांगला फोडून विवरला आहे, असें लक्षांत येईल.

इतकें लक्षांत आल्यानंतर ज्ञानेश्वरीचे छापणारे तदनुसार संशोधन छापतील अशी मीं आशा करावी काय ?

[ मराठा हरिजन, २-२-१९४० ]

## : ३४ :

# शाळेंतील धर्म-शिक्षण

श्री. आपटे गुरुजी लिहितात :

"लहान मुलांकरितां शाळांत धार्मिक शिक्षण कसें द्यावें हा प्रश्न वारंवार विचारला जातो. अनेक लोकांना याची नीट कल्पना नाहीं. संतांचीं वचनें मुख-पाठ असावीं यावर मतैक्य आहे, पण प्राथमिक व दुय्यम शाळेंत धार्मिक शिक्षणाची पद्धति कशी ठेवावी याविषयीं खुलासा व्हावयास पाहिजे आहे. सूत्र-रूपानें लिहिलें तरी चालेल."

धार्मिक-शिक्षण हा निःसंशय जिव्हाळ्याचा विषय आहे. पण धर्म शब्दाचा आज फार संकुचित आणि समाज-भंजक अर्थ झालेला आहे. म्हणून धर्म-शिक्षण शाळांत देऊं च नये असें मानण्याकडे विचारी माणसांचा कल आहे. माझ्या दृष्टीनें खरें धर्म-शिक्षण वाङ्मयाचा विषय च नाहीं. चारित्र्य-निष्ठा, ईश्वराविषयीं श्रद्धा आणि देह-भिन्न आत्म्याचें भान हें धर्म-सार आहे. आणि सत्पुरुषांचे संगतीनें च तें लाभत असतें. म्हणून शीलवान् शिक्षकांची योजना ही च माझी धर्म-शिक्षणाची योजना आहे.

संतांचीं वचनें मुखपाठ असणें हें लाभदायी तर आहे च., पण त्याला मी धर्म-शिक्षण म्हणणार नाहीं. त्याला विशुद्ध वाङ्मयाचें शिक्षण म्हणेन. त्यांत हि निवड करतांना व्यापक विवेकाची गरज राहील. "प्रार्थनेंतील विवेक" मागें मीं सुचविला होता तो च इथें हि लागू आहे.

सर्व-धर्म-समभावाची भूमिका धरून त्या त्या धर्मांतील सत्पुरुषांचीं चरित्रें, किंवा व्रतें उत्सव आदि चित्त-शुद्धि-साधक योजना, याविषयीं माहिती देतां येईल. पण याला हि मी धर्म-शिक्षण म्हणणार नाहीं. याला इतिहासाचें आणि समाजाचें अध्ययन म्हणतां येईल.

चित्तशुद्धीची पर्वा न करतां कांहीं तांत्रिक आचारांनीं आणि क्रिया-कलापांनीं परभारें पुण्य पटकावण्याच्या कल्पना, ज्या सर्व च धर्म-पंथांत रूढ आहेत, त्या मात्र नाहींशा झाल्या च पाहिजेत. दरेक गोष्ट अनुभवाच्या कसोटीवर घं कसून घ्यावची अशी संवय विद्यार्थ्यांना लागली पाहिजे. एवढी गोष्ट जर सिद्ध करतां आली तर सगळें धर्म-शिक्षण मला पावलें.

[ मराठी हरिजन, ता. ९ मार्च १९४७ ]

: ३५ :

## आमची मूर्तिपूजा

जो सगळीकडून तुच्छ मानला जातो, ज्याला स्थान नसतें आणि सन्मान हि नसतो, ज्याची अवहेलना ज्याचा तिरस्कार जग करतें, त्याला ईश्वर आपल्या जवळ करतो. त्याला वानर पाहिजेत, गौळी पाहिजेत, निरभिमानी मावळे पाहिजेत. परंतु आपण आतां मावळे राहिलों नाहीं. आपण मोठे झालों, राजश्री झालों. ईश्वराला हे नकोत. ज्यांना शिव्या मिळत आहेत, जे परित्यक्त आहेत, अशा निवडक लोकांना हाताशीं घेऊन ईश्वर आपलें काम करतो. प्रभूचें कार्य आपल्या हातानें व्हावें अशी आपली इच्छा असेल तर—

करिं मस्तक ठेंगणा । लागें संतांच्या चरणा ॥

म्हणजे मस्तक नम्र करा, इतकें नम्र कीं संतांच्या चरणावर जाऊन तें लागेल. हें आपण शिकलें पाहिजे. पाऊस पडत आहे तो थांबविण्याऐवजीं त्याचा उपयोग केला पाहिजे. मला खेड्यांमधें फिरलें पाहिजे हें पुष्कळ वेळा माझ्या मनांत आलें आहे. तुरुंगांतून सुटतांना हि हा च विचार होता. परंतु आज तर परिस्थिति वेगळी आहे. मला त्याचें दुःख नाहीं. जी स्थिति प्राप्त होते त्यांत मला आनंद असतो. माझ्या पायांना केव्हां गति मिळेल तें सांगतां येत नाहीं. एकदां गति मिळेली कीं ती थांबेल असें हि दिसत नाहीं.

खेड्यांतून आपण हिंडत च राहिलें पाहिजे. अस्पृश्यता ही धार्मिक चळवळ आहे. ती कोन्या-कोपऱ्यांत पोहोंचली पाहिजे. गांधीजींनीं देशभर प्रवास केला, तो पुरेसा नाही. हजारों लोकांनीं तें काम आपल्या अंगावर घेतलें पाहिजे. व्याख्यान नाही, आहुति द्या. खेड्यांतील जनता महादेव आहे. ती स्वयंभू महादेव आहे. तो खेड्यांत च राहणार, तुम्ही ह्या महादेवाचे उपासक असाल तर तुम्हांला त्याच्याकडे जावें लागेल. वीस वीस गांवें घेतलीं आणि सारखा फिरण्याचा सपाटा सुरू केला, असें झालें पाहिजे. भक्ताला जेव्हां देवाला एक हजार प्रदक्षिणा घालण्याला सांगण्यांत येतें, तेव्हां त्यांत भक्ताला कांहीं अनुचित वाटत नाहीं. मग जनतारूपी महादेवाच्या पूजेंत देखील भक्ताला तसा उत्साह कां वाटूं नये? देवाची एक प्रदक्षिणा करून भक्त एकदां देवाचें दर्शन करतो आणि दुसरी प्रदक्षिणा करण्याकरितां पुढें निघतो. पुन्हां दर्शन, पुन्हां प्रदक्षिणा, असा त्याचा क्रम चालू असतो. लोक-सेवकांनीं हि चौदा दिवस चौदा गांवें हिंडावीं आणि पंधरावे दिवशीं मुख्य केंद्रांत येऊन आपला अहवाल द्यावा आणि पुन्हां सज्ज होऊन प्रदक्षिणेच्या मार्गाला लागावें. भक्त प्रत्येक प्रदक्षिणेनंतर देवाच्या मूर्तीकडे पाहतो तेव्हां त्याच्या हृदयावर देवाची मूर्ति अंकित होत जाते, हृदयावर उमटत जाते, तिचें स्वरूप लक्षांत येत जातें. स्वरूप लक्षांत येतां च, ह्या देवाच्या भक्तीचा मार्ग कोणता आहे, पूजेची सामग्री कोणती आहे, ह्याचें ज्ञान होतें आणि नंतर भक्त असेल तर तो देवाशीं एकरूप होऊन जाईल, त्याचें हृदय देवाच्या हृदयाशीं मिळून जाईल. तेव्हां च देवाची कृपा होईल, त्याचा अनुग्रह होईल.

लोकसेवा ही आपली मूर्तिपूजा आहे. पांच-पंचवीस खेड्यांचा गट हें आपलें देवालय आहे. गांवांत काय काय आहे त्याची आपण यादी केली पाहिजे, मनावर हि आणि कागदा वर हि. ह्या यादी आपण जन-सेवकांनीं लिही

पाहिजे. त्यांनीं देवाचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. जाणलें पाहिजे कीं तो दिगंबर झाला आहे, धुळीनें मळला आहे. त्याच्या कपाळावरून घाम निथळत आहे. फक्त बैल च काय ती त्याच्याजवळ संपत्ति उरली आहे. आणि जंगलांत त्याची वस्ती आहे. ह्या देवाचें स्वरूप काय आहे, चेहरा कसा आहे, भाव कोणते आहेत, त्याच्या रुची आणि अरुचीच्या वस्तु कोणत्या आहेत, त्याचा नैवेद्य कोणता आहे, त्याच्यावर कोणतीं फुलें वाहिलीं जातात हें सर्व लोकसेवकांनीं जाणून घेतलें पाहिजे. हा सर्व परिचय झाल्याशिवाय पूजा होणार नाहीं. ही माहिती नसेल तर शिवावर तुळस वाहिली जाईल आणि विष्णूवर बेल वाहिला जाईल. देव-पूजेत घाई चालत नाहीं. तुम्हांला घाई असेल, परंतु देवाला घाई नाहीं. तो शांतीचा अवतार आहे. त्याच्या मस्तकावर एकदम घागर ओतल्यानें काम होणार नाहीं. त्याला तर थेंब थेंब पाहिजे. एकदम ओतण्यापेक्षां संतत धार धरल्यानें तो प्रसन्न होतो.

[ १९३४ मधील एका प्रवचनावरून. विनोबा के विचार, भाग २ ]

: ३६ :

## निष्ठेची उणाव

गांधी-युगाच्या साहित्याच्या चळवळींत अनेक गुण आहेत, पण त्यांत एक दोष हि आहे. ज्या उत्साहानें, प्रेमानें, निष्ठेनें मध्ययुगांत संतांनीं प्रचार केला त्या च निष्ठेनें आपण विचारांचा प्रचार करीत आहोंत, असें मला *वाटत नाहीं. जबरदस्तीनें, लाजेनें, अहंकारानें, उत्साहाच्या अतिरेकानें आणि* घाईनें मिशनऱ्यांप्रमाणें एकांगी, अंधवृत्ति ठेवून विचार-प्रचाराचें कार्य आपण केलें पाहिजे असें मी म्हणत नाहीं. तसें करणें बरोबर होणार नाहीं. परंतु निष्ठावंत संत गांवोगांवीं जाऊन हरिनामाचा गजर गाजवीत असत, तसें आपण करीत नाहीं. तसा निष्ठावंत प्रचार सध्यांच्या चळवळींत दिसत नाहीं. अर्थात् ही गोष्ट मला हि लागू आहे च. संतासारखा उत्साह आज हि पाहिजे. आजच्या चळवळींत योग्यतेची कमतरता नाहीं.' उद्धाराचें जे कार्य संतांनीं केलें तें च आज पुढें चालविलें जात आहे. परंतु संतांची निष्ठा अमर्याद होती, ती त्यांच्यांत मावत नव्हती, ती फुटून बाहेर पसरत होती. त्या तीव्रतेची त्या वेगाची निष्ठा आज सांपडत नाहीं. पाणी कोठें तरी अडलें आहे. पाऊस पडतो आहे, परंतु वाहत नाहीं, फळत नाहीं, तलाव बनवीत नाहीं, प्रवाहित होत नाहीं. शेती हिरवीगार होत नाहीं.

नारद तिन्ही लोकांत फिरत असत. ते खालच्या वर्गाच्या लोकांत फिरत, मध्यम वर्गाच्या लोकांत जात, उच्च श्रेणीच्या लोकांत पोंहचत. हा च लोक-समुदाय आहे. एक मित्र मला म्हणाला कीं आजचीं वर्तमानपत्रें 'नारद' आहेत. परंतु हे नारद नारद नसल्यासारखे आहेत. त्यांना पैशाची व्याधि आहे. समजवण्याची उपाधि आहे. परंतु देवर्षि नारद घरोघर आपणहून जात, मधुर वाणीनें आपले विचार लोकांच्या गळीं उतरवीत आणि नंतर त्यांचा च आभार मानीत. जे लोक विचार ऐकून घेत त्यांचा च ते उपकार मानीत. आपणाला आज भगवद्-दर्शन झालें असें ते मानीत. देवर्षीचें तें काम आज बरोबर होत नाहीं. होईल कसें ? आपल्या हृदयावर तें बिंबलेलें नाहीं. खादी, अस्पृश्यता-निवारण आणि राष्ट्रीय विचार ह्या सर्वांच्या प्रचाराकरितां कार्य-कर्ते पाहिजेत. परंतु ह्या विचारांचें तत्त्वज्ञान च आपल्या जवळ पुरेसें नाहीं. आपली माहिती च पुरेशी नाहीं. माहिती नसणें हें अज्ञान आहे. परंतु माहिती मिळविण्यांत बेपर्वा असणें दोष आहे. बापूंनीं नुकता च एक लहानसा लेख लिहिला होता. हिटलर देखील जर्मनींत यंत्रांचें महत्त्व कमी करीत आहे आणि मध्ययुगाप्रमाणें च चालू युगांत हि तो घरगुती उद्योग-धंद्यांना उत्तेजन देत आहे, असा त्या लेखाचा आशय होता. मीं एका चांगल्या कार्यकर्त्याला विचारलें, 'तुम्हीं तो लेख वाचला आहे काय?' त्यांनीं उत्तर दिलें, 'नाहीं.' पुष्कळदा ज्ञानाला समोर पाहून 'त्यांत नवीन काय असणार आहे' असें आपण म्हणतों, पण ही कल्पना घातुक आहे. महाभारताच्या वनपर्वांत एक कथा आहे कीं एकदा एक ऋषि धर्मराजाकडे आले. धर्मराज वनांत दुःख भोगीत होते, परंतु करुणा-मय अशा त्या ऋषींना पाहून धर्मराजाचें दुःख वाणीच्या द्वारें बाहेर पडलें. ते म्हणाले, 'असें दुःख दुसऱ्या कोणाला भोगावें लागलें नसेल!' ऋषि म्हणाले, 'रामाला आणि सीतेला हि असा-च वनवास भोगावा लागला होता.' धर्मराज

म्हणाले, 'मग ती रामाची कथा मला सांगा.' ह्या गोष्टीवरून धर्मराजाला रामाची कथा माहीत नव्हती असें कोणी म्हणूं लागला तर त्याच्या अज्ञानाची ती सीमा च म्हटली पाहिजे. ऋषींच्या मुखानें रामाची उज्ज्वल कथा पुन्हां ऐकावी असें धर्मराजाला वाटलें. पाणी तें च आहे, परंतु गोमुखातून आलेलें अधिक पवित्र होतें.

[ विनोबा के विचार, भाग २ ]

: ३८ :

## गरिबांशीं तन्मयता

**दोन प्रश्न**—(१) आमच्यापैकीं जे लोक आजपर्यंत मध्यम वर्गाचें जीवन जगत आले आहेत, परंतु आतां गरीब वर्गाशीं एकरूप होऊं पाहतात, त्यांनीं कोणत्या क्रमानें आपल्या जीवनांत परिवर्तन करावें, म्हणजे तीन-चार वर्षांत ते निश्चितपणें त्या गरिबांशीं एकरूप होऊं शकतील? (२) मध्यम किंवा उच्च वर्गाच्या लोकांनीं आपली सद्भावना कशाप्रकारें प्रगट करावी? गांधी-सेवा-संघाच्या सभासदांना खर्चाकरतां जी रकम मिळते, तिच्यांतून दर पंधरा रुपयांमागें चार रुपये गरिबांच्या घरीं पोंचवावे, असा कांहीं नियम करणें ठीक होईल काय?

**उत्तर**—आधीं आपण हें समजलें पाहिजे कीं आपण मध्यम आणि उच्च वर्गाचे समजले जाणारे 'प्राणी' आहोंत. अर्थात् आपण प्राणवान् बनूं इच्छितों, ज्यांची सेवा करूं इच्छितों त्यांच्यासारखे होऊं पाहतों. पाणी कोठलें हि का असेना तें समुद्राकडे च जाऊं इच्छितें—मग ते माझ्या स्नानाचें पाणी असो किंवा गंगेचें असो. दोहोंची गति समुद्राकडे च असते. दोन्ही निम्न-गतिक, नम्र, असतात. एखादें पाणी शक्ति कमी असल्यामुळें मधें च थांबलें आणि एखाद्या लहान झाडाला जीवन देण्यांत त्याचा उपयोग झाला, तर तें त्याचें भाग्य आहे. परंतु त्याची गति मात्र समुद्र च आहे. समुद्रापर्यंत पोहोंचण्याचें भाग्य गंगेसारख्या महानद्यांना च लाभतें. त्याप्रमाणे उच्च

वर्तमानपत्रांतील प्रसिद्धीनें त्याला महत्त्व प्राप्त होतें. तें च प्रसिद्धीचें काम आपण करूं लागूं तर त्यांच्या शस्त्राचा उपयोग आपण करीत आहोंत असें होईल. तें बरोबर होणार नाहीं. ज्या शस्त्रांत प्रतिपक्षी निपुण आहेत, त्या च शस्त्राचा उपयोग केल्यानें आपलें काम होणार नाहीं.

परंतु ह्या पेक्षां हि भयानक दुसरी एक गोष्ट आहे. ती ही की 'सर्व-धर्म-सम-भाव' वाढत आहे, नास्तिकता वाढत आहे. नास्तिकता शब्दानें तात्त्विक नास्तिकता मी म्हणत नाहीं. तात्त्विक नास्तिकतेला मी भीत नाहीं. परंतु पुस्तकें लिहिल्यानें काम होणार नाहीं. आम्हीं पुस्तकें लिहिलीं तरी कितीसे लोक तीं वाचतील? वाईट साहित्य वाचणारे तर हजारों आहेत. आपल्या जीवनांत आपण जी वस्तु उतरवूं शकूं तिचा च प्रचार होणार आहे. पूर्वी असें च होत असे. छापखाने येऊन शंभर वर्षें झालीं. ह्या अवधींत तुलसी-रामायण आणि तुकारामाचे अभंग यांप्रमाणें जनतेंत ज्यानें प्रवेश केला असें एखादें पुस्तक निघालें आहे काय? प्रकाशन प्रचाराचें एक साधन आहे हें खरें, परंतु धार्मिक प्रचारांत त्याची किंमत कमींत-कमी आहे. जी गोष्ट आपण आपल्या श्रद्धास्पद पुरुषांच्या तोंडून ऐकतों तिचा परिणाम अधिक होतो. केव्हां प्रकाशनामुळें विशेष लाभ होण्याची शक्यता दिसत नाहीं.

( २ ) जिथें आश्रम आहे तिथें सर्वधर्मांच्या प्रवर्तकांविषयीं प्रसंग विशेषीं चर्चा करतां येईल. परंतु माझी वृत्ति निर्गुण आहे. रामनवमी किंवा कृष्णाष्टमीच्या प्रसंगीं मी केव्हां केव्हां भाषणें केलीं आहेत, परंतु त्यांना उत्तेजन दिलेलें नाहीं. जेथें असे उत्सव होऊं शकतात, तेथें अशीं भाषणें ठेवण्याला हरकत नाहीं.

[ गांधी-सेवा-संघाच्या सावली संमेलनांत प्रगट केलेले विचार. १९३६ ]

: ३८ :

## गरिबांशीं तन्मयता

**दोन प्रश्न**—(१) आमच्यापैकीं जे लोक आजपर्यंत मध्यम वर्गाचें जीवन जगत आले आहेत, परंतु आतां गरीब वर्गाशीं एकरूप होऊं पाहतात, त्यांनीं कोणत्या क्रमानें आपल्या जीवनांत परिवर्तन करावें, म्हणजे तीन-चार वर्षांत ते निश्चितपणें त्या गरिबांशीं एकरूप होऊं शकतील? (२) मध्यम किंवा उच्च वर्गाच्या लोकांनीं आपली सद्भावना कशाप्रकारें प्रगट करावी? गांधी-सेवा-संघाच्या सभासदांना खर्चाकरतां जी रकम मिळते, तिच्यांतून दर पंधरा रुपयांमागें चार रुपये गरिबांच्या घरीं पोंचवावे, असा कांहीं नियम करणें ठीक होईल काय?

**उत्तर**—आधीं आपण हें समजलें पाहिजे कीं आपण मध्यम आणि उच्च वर्गाचे समजले जाणारे 'प्राणी' आहोंत. अर्थात् आपण माणसात् बनूं इच्छितों, ज्यांची सेवा करूं इच्छितों त्यांच्यासारखे होऊं पाहतों. पाणी कोठलें हि कां असेना तें समुद्राकडे च जाऊं इच्छितें—मग तें माझ्या स्नानाचें पाणी असो किंवा गंगेचें असो. दोहींची गति समुद्राकडे च असते. दोन्ही निम्न-गतिक, नम्र, असतात. एखादें पाणी शक्ति कमी असल्यामुळें मधें च थांबलें आणि एखाद्या लहान झाडाला जीवन देण्यांत त्याचा उपयोग झाला, तर तें त्याचें भाग्य आहे. परंतु त्याची गति मात्र समुद्र च आहे. समुद्रापर्यंत पोहोंचण्याचें भाग्य गंगेसारख्या महानद्यांना च लाभतें. त्याप्रमाणें उच्च

आणि मध्यम वर्गाचे लोक पहाड आणि टेकड्या यां सारखे आहेत आणि ज्यांची सेवा आपल्याला करायची आहे ते महान् समुद्र आहेत. ह्या महासमुद्रापर्यंत सर्व पोंचूं शकले नाहींत तरी इच्छा तर आपण ही च करायला पाहिजे कीं तेथें आपल्याला पोचायचें आहे. तेव्हां जेथपर्यंत पोंचूं शकलों तेवढ्यानें संतोष मानून घेऊं नये. ज्यांची सेवा करायची आहे त्यांना समोर ठेवून आपल्या जीवनाची दिशा आपण बदलत राहिलें पाहिजे आणि स्वतः *निम्न-गतिक, नम्र, झालें पाहिजे.*

परंतु ह्यासंबंधीं कांहीं स्थूल नियम करतां येत नाहींत. करणें शक्य असले तरी ते माझ्याजवळ नाहींत. आणि असे नियम करण्याचा प्रयत्न केला जावा असें मला वाटत हि नाहीं. चार किंवा पांच वर्षांत उच्च आणि मध्यम वर्गाच्या लोकांना गरीब वर्गाचे बनविण्याची कांहीं पद्धति नाहीं. आपल्याला गरिबांची सेवा करायची आहे हें समजून जागृत राहून शक्ती-नुसार काम केलें पाहिजे. यांत कांहीं नियम नाहींत, म्हणून च बुद्धीला, पुरुषार्थाला, वाव आहे. गेल्या सोळा वर्षांपासून गरिबांशीं एकरूप होण्याचा माझा प्रयत्न सुरू आहे. परंतु गरिबांसारखें मी आपलें जीवन बनवूं शकलों, असें म्हणतां येत नाहीं. परंतु ह्याचा उपाय काय? मी तसा होऊं शकलों नाहीं याचें मला दुःख वाटत नाहीं. मला तर प्राप्तीच्या आनंदापेक्षां प्रयत्नाचा आनंद अधिक वाटतो.

'शिवाची उपासना करायची असेल तर शिव बना' असें एक शास्त्रीय सूत्र आहे. त्याप्रमाणें गरिबांची सेवा करायची असेल तर गरीब झालें पाहिजे. मात्र ह्यांत विवेकाची गरज आहे. ह्याचा अर्थ हा नाहीं कीं आपण त्याचे दोष हि घेतले पाहिजेत. ते जसे दरिद्र-नारायण आहेत तसे मूर्ख-नारायण हि आहेत. त्यांच्या सेवेकरितां आपण हि मूर्ख झाले पाहिजे काय? शिव होण्याचा असा अर्थ नाहीं. ज्यांचें धन गेलें, त्यांची बुद्धि तर

त्याच्या आधीं च नाहींशी झाली आहे. त्यांच्यासारखे बनून आपण आपली बुद्धि घालावायला नको.

खेड्यांमधें शेतकरी उन्हांत काम करतात. लोक म्हणतात, 'बिचाऱ्या शेतकऱ्यांना दिवसभर उन्हांत काम करावें लागतें.' अरे, उन्हांत आणि उघड्या आकाशाखालीं काम करणें एवढें च वैभव त्यांचें शिल्लक राहिलें आहे. तें हि तुम्ही हिसकून घेऊं इच्छितां? उन्हांत व्हिटॅमिन पुष्कळ आहे. शक्ति असेल तर आपण हि त्यांच्यासारखें उन्हांत काम करणें सुरू केलें पाहिजे. परंतु रात्री घराला पेटी बनवून त्यांत स्वतःला बंद करून ते झोपतात. त्याची नक्कल आपण करायला नको. त्यांना हि आपण म्हटलें पाहिजे, कीं रात्रीं आकाशाखालीं झोपा, आणि नक्षत्रांचें वैभव लुटा. आपण त्यांच्या प्रकाशाचें अनुकरण केलें पाहिजे, त्यांच्या अंधकाराचें नव्हे. त्यांच्याजवळ पुरेसे कपडे नसतील तर आपण त्यांना इतकें समर्थ कां करूं नये कीं ते देखील स्वतः-करितां पुरेसे कपडे बनवू शकतील? त्यांना महिना महिना भाजी मिळत नाहीं, दूध मिळत नाहीं. आपण हि दूध आणि भाजी सोडून द्यावी काय? हा विचार बरोबर नाहीं. एक मनुष्य बुडत आहे आणि त्याला पाहून आपणाला दुःख होत आहे, तर आपण हि त्याच्या मागोमाग बुडून मेलें पाहिजे काय? त्यांत दया आहे, सहानुभूति हि आहे. परंतु जींत तारक बुद्धीचा अभाव आहे ती दया आणि सहानुभूति काय कामाची? खऱ्या कृपेंत तारक शक्ति असली पाहिजे. तुलसीदासानें त्याला 'कृपालु भलायक' म्हटलें आहे.

आपण आपल्या जीवनांतील दोष काढून टाकून तें पूर्ण बनविलें पाहिजे. तसे च त्यांचे दोष दूर करून त्यांचें जीवन हि पूर्ण बनविण्यासाठीं मदत केली पाहिजे. ज्यांत रस किंवा उत्साह आहे तें पूर्ण जीवन होय. भोगाला किंवा विलासाला त्यांत स्थान नाहीं. आपण गरिबांसारखें झालें पाहिजे कीं पूर्ण जीवनाकडे गेलें पाहिजे? लोक म्हणतात, असें केल्यानें आपलें जीवन

त्यागमय दिसणार नाहीं. परंतु 'तें कसें दिसेल' ह्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. आणि ह्याचा काय परिणाम होईल असा हि विचार करण्याचें कारण नाहीं. ह्या परिणाम परायणतेला आपण सोडून दिलें पाहिजे. आपली जीवनपद्धति त्यांच्या जीवनपद्धतीहून भिन्न आहे. आपणाला दूध मिळतें त्यांना मिळत नाहीं ह्या गोष्टीचें आपणाला दुःख व्हावें हें ठीक च आहे. हें दुःखाचें बीज तर आपल्या हृदयभूमींत असलें च पाहिजे. तें आपली उन्नति करील. मला ह्याचा कांहीं उपाय हि मिळाला तरी देखील दुःख होईल. जर कांहीं चमत्कारानें उद्यां च आपल्याला स्वराज्य मिळालें, तर त्यात आनंद नाहीं. आपल्या पुरुषार्थानें आणि विधायक शक्तीनें तारक बुद्धीचा प्रचार होऊन देशांतील सगळी जनता एक इंच भर हि पुढें जाऊं शकली तर आपण स्वराज्याच्या जवळ पोंचूं. नद्या समुद्राकडे वाहतात त्याप्रमाणें आपली वृत्ति आणि शक्ति गरिबांकडे वाहत राहिली पाहिजे. त्यांत च कल्याण आहे.

[ गांधी सेवा-संघाच्या सातवी संमेलनांत प्रगट केलेले-विचार, १९३६ ]

: ३९ :

# प्रासंगिकें

## १ मृत्यूची देणगी

मृत्यु ईश्वरी देणगी आहे. जेव्हां जवळांतले जवळचे नातेवाईक, मित्र, वगैरे— कोणी हि दुःखांतून सोडवूं शकत नाहीं त्यावेळीं तो सोडवितो. मृत्यूचें मानलें गेलेलें दुःख वास्तविक जीवनाचें दुःख आहे. रोगादिकांमुळे होणारें दुःख मृत्यूचें नसून जीवनातील असंयमाचें फळ आहे. मृत्यु त्यातून सोडविणारा आहे. मृत्यूचा त्याच्याशीं संबंध नाहीं. म्हणून मृत्यूच्या विनाकारण माथीं मारलेलें हें शारीरिक दुःख वजा केलें म्हणजे मानसिक दोन दुःखें शिल्लक राहतात. एक, पूर्व-पापांच्या स्मृतीपासून होणारें. दोन, आसपासच्या मंडळींना सोडावें लागणार ह्या आसक्तीचें. पहिल्यावद्दल मृत्यु कसा जबाबदार ? तें जीवनांतील पापाचें फळ आहे. दुसरें मोहाचें आहे. जर आपलें खरें प्रेम असेल आणि सेवा करण्याची तळमळ असेल तर देहत्यागानें आपण मित्रांच्या दूर जाणार नाहीं पण जवळ जाऊं. अगदीं त्यांच्या आंत प्रवेश करूं. देहाचा पडदा जोंपर्यंत उभा होता तोंपर्यंत कांहीं केल्या आपण इतक्या आंत जाऊं शकत नव्हतों. किती खोल सेवा केली तरी वरून वरून च होत होती. देहाचा पडदा दूर झाल्यानें आतां दुसऱ्याच्या अन्तरात्म्यांत मिसळून त्याची सेवा करतां येईल. पण सेवा करावयाची असेल तरची ही गोष्ट आहे. म्हणजे ह्याला निष्कामता पाहिजे.

आणखी एक दुःख उरतें; पण तें मृत्यूचें नसून आमच्या अज्ञानाचें आहे. मृत्यूनंतर काय होईल कोणास ठाऊक, अशी धास्ती वाटते. पण आपल्या मनांतील सद्वासनेच्या विरुद्ध मृत्यूनंतर कांहीं होणार च नाहीं, आणि कुवासना च असली तर जें कांहीं वाईट होईल तें त्या कुवासनेचें च फळ असेल, अशी श्रद्धा – म्हणजे ईश्वराच्या न्याय-बुद्धीवर श्रद्धा – असली तर तें काल्पनिक भय टळेल. सारांश, एकंदर दुःखें चार: (१) शरीरवेदनात्मक (२) पापस्मरणात्मक (३) सुहृन्मोहात्मक (४) भाविचिन्तात्मक. आणि याला उपाय अनुक्रमें— (१) नियत संयम (२) धर्माचरण (३) निष्कामता (४) ईश्वराविषयीं श्रद्धा.

मरणाचें निरंतर स्मरण असणें, बुद्धीमध्यें मरण-मीमांसा करून निःशंकता आणणें आणि रोज रात्रीं निजण्यापूर्वी मरणाभ्यास करणें असें त्रिविध साधन करीत राहिलें पाहिजे. पहिलें गीतेच्या १३ व्या अध्यायांतील ज्ञानलक्षणांत नमूद केलें आहे. त्यावरील ज्ञानदेवाचें भाष्य सुस्पष्ट आहे. दुसरें दुसऱ्या अध्यायांत प्रारंभींच आहे. तिसरें आठव्या अध्यायांत आहे.

[एका पत्रांतून, ग्रा. से. वृत्त डिसेंबर १९४०]

## २ गीता आणि लोकशाही

"डोक्यागणिक मत" हें हल्लींच्या लोकशाहीचें सूत्र आहे. "सर्वांभूतीं एक आत्मा" हे गीतेचें सूत्र आहे. "डोक्यागणिक मत" आणि "सर्वांभूतीं एक आत्मा" हीं दोन्ही तत्त्वें दिसायला वरून-वरून सारखीं दिसतात. पण पहिलें सूत्र भेदाची उभारणी करतें आणि दुसरें भेदाची संहारणी करतें असा फरक आहे. एक "पुष्कळांच्या सुखाकडे" पाहतें आणि म्हणून "थोड्यांच्या दुःखाची" परवा करीत नाहीं. दुसरें "सर्वांच्या हिताकडे" नजर देतें आणि म्हणून "एकाचें हि हित" विसरत नाहीं. एक मतामताची लढाई लढवतें. दुसरें सर्वांच्या मतांचा मेळ घालतें. एक शिरगणती करतें, दुसरें हृदय तपासतें. जुन्या प्लेगच्या दिवसांत प्लेगच्या हवेंतून आलेल्या माणसांना सक्तीच्या सुतकामध्यें रहावें लागे. एकदा कांहीं माणसांना अशा च रीतीनें शिपायानें अडकवून ठेविलें असतां, त्या माणसांना विशेष काम असल्यामुळें तें शिपायाजवळ आपल्याला सोडण्याविषयीं विनवणी करूं लागले. शिपाई म्हणाला "मीं सोडलें असतें पण अपसर शिरगणती करतो. त्यामुळें सोडतां येत नाहीं." ते म्हणाले, "आम्ही इतकीं च दुसरीं माणसें देवतों. मग झालें ना?" शिपाई म्हणतो, ' झालें; आम्हांला काय, "नंग से नंग" मिलती झाली म्हणजे झालें!" हें लोकशाहीचें तत्त्व. गीतेंत "देव बोलिले एक। जें दुजें नाहीं."

[ महाराष्ट्र धर्म, ता. १८-१०-१९२६ ]

## ३ प्रेमाचा आधार

प्रेम करतांना गुण-दोष पाहूं नयेत असें आपण म्हणवों, ह्याचा अर्थ काय? गुण दोष पाहूं नयेत, तर काय पाहावें? गुणावर प्रेम ह्याचा अर्थ सरळ आहे. गुण नसेल तरी प्रेमांत बाध येऊं नये ह्या म्हणण्यांत काय तात्पर्य? गुण सोडून दिले तर प्रेमाचें दुसरें अधिष्ठान कोणचें? नास्तिक पुरुषाला असें दुसरें कोणचें च अधिष्ठान सांपडणार नाहीं. पण आस्तिकाला तसें अधिष्ठान आहे. भूतमात्रीं हरीचा वास आहे; ह्या हरीवर नजर देऊन प्रेम राहिलें पाहिजे. भूताचे ठाईं ईश्वर राहतो हें एक कारण त्याच्यावर प्रेम करण्याला बस आहे. गुण सुद्धां चंचल असतात. दोषांवर प्रेम करावें असें तर कोणी च म्हणत नाहीं. म्हणून प्रेमाचें अधिष्ठान परमात्मा. एका च आईचीं लेंकरें हा प्रेमाचा आधार. ह्याची ओळख पटेल तेव्हां च विश्वव्यापी प्रेमाचा अनुभव येईल.

[ महाराष्ट्र-धर्म, २१-९-१९२५ ]

## ४ निसर्ग-सेवनाची दृष्टि

तुम्ही मंडळी हल्लीं निसर्गाच्या उपासनेचा आनंद घेत आहांत. हवा खाण्याची कल्पना निसर्गाचे पूर्ण फायदे मिळूं देत नाहीं. म्हणून केवळ तेवढी च कल्पना न ठेवतां त्याबरोबर दुसरी हि व्यापक कल्पना करतां आली तर अशीं स्थळें हरिदर्शन करून देऊं शकतात. डोंगर, नदी, इत्यादि स्थळीं शिमले, महाबळेश्वर इत्यादि विलासस्थानें निर्माण करणें ईश्वराचा अपमान आहे, तसा अपमान आपले पूर्वज करीत नसत. म्हणून त्यांना निसर्ग-देवीच्या कृपेनें आध्यात्मिक लाभ होत असे.

वैदिक ऋषि, उपनिषदें, गीता योग-शास्त्र, संत मंडळींचा अनुभव ह्यांतून एकांत-सेवनाचे आणि निसर्ग-परिचयाचे अनेकविध लाभ वर्णन केले आहेत.

"गजबजा सांडिलिया । वसती वनस्थळिया ।
आंगाचिया मांदिया । धुकलेया ॥"

इत्यादि ज्ञानदेवाचीं वचनें तुला माहीत आहेत च. मनुष्यसमाजाच्या सगळ्यांत जुन्या ग्रंथांतील एक वचन येथें देत आहें–

"उपह्वरे गिरीणाम् । संगथे च नदीनाम् । धिया विप्रो अजायत ॥"

–ऋग्वेद

ह्या मंत्राचा ऋषि 'वत्स काण्व' आहे. छंद 'गायत्री.' देवता 'इंद्र' म्हणजे परमात्मा. त्याला च ह्या मंत्रांत "विप्र" म्हणजे "ज्ञानी"

म्हटलें आहे. तो कुठें आणि कसा प्रगट झाला, तें ह्या मंत्रांत सांगितलें आहे. "पर्वतांतील दुऱ्याखोऱ्यांत आणि नद्यांच्या संगमावर, ध्यान चिंतनानें (धिया), ज्ञानी जन्मास आला."

ज्ञानी पुरुषाचा जन्म कुठें झाला आणि तिथे काय करण्यानें झाला, ह्या दोन्ही गोष्टी ह्या मंत्रांत आहेत.

[ ग्राम-सेवा-वृत्त, १५ जानेवारी १९४१ ]

## ५ सत्य आणि सौंदर्य

रवीन्द्रनाथ हे प्रतिभावान् कवि आणि नवीन विचारांचे प्रवर्तक म्हणून विश्वविख्यात आहेत. अशा माणसाच्या दरेक शब्दाकडे लोकांचें लक्ष लागणें स्वाभाविक आहे. मागें इटलींतून जाऊन आल्यानंतर इटलीसंबंधींचे आपलें निरीक्षण त्यांनीं लोकांपुढें मांडलें होतें. त्यांत कवीच्या सौंदर्यरसिक दृष्टीनें त्यांनीं इटलीचे मुख्य अधिकारी मुसोलिनी ह्यांच्याविषयीं अनुकूल अभिप्राय प्रगट केला होता. त्यावर वर्तमान-पत्रांतून टीका झाली. त्यासंबंधीं रविबाबूंनीं खुलासा प्रसिद्ध केला आहे. त्यांत ते म्हणतात— "मुसोलिनी ह्यांच्या कल्पना आणि कार्यपद्धति मला मान्य आहेत असें मानणें माझ्या संबंधीं गैरसमज करून घेणें आहे. कलारसिक दृष्टीनें मुसोलिनी ह्यांच्या व्यक्तित्वाचा माझ्यावर चांगला परिणाम झाला. पण त्यावरून त्यांच्या चळवळीं-विषयींच्या माझ्या नैतिक निर्णयाचें अनुमान होऊं शकत नाहीं. नैतिक निर्णय देण्यास अधिक पुराव्याची जरूर लागेल. असा पुरावा मी मिळवूं शकलों नाहीं. म्हणून नैतिक दृष्ट्या त्यासंबंधीं आज माझ्यापाशीं कांहीं च निर्णय नाहीं. एवढा खुलासा गैरसमज दूर करण्यास बस आहे."

पण आपल्याला ह्या खुलाशाकडे त्यांत जो नैतिक सत्य आणि सौंदर्य ह्यांचा भेद दर्शविला आहे तेवढ्यापुरतें च पहावयाचें आहे. रविबाबूंची दृष्टि म्हणजे सौंदर्यप्रेमी कलारसिक कवीची दृष्टि. जें सुंदर तें सत्य असावयाचें च

असें त्याचें मत मानलें जातें, आणि आहे हि. पण तें पूर्ण दृष्टीचें बोलणें झालें. सत्य आणि सौंदर्य ह्याचा विरोध असणें शक्य नाहीं हा सिद्धांत खरा च आहे- पण इतकें अद्वैत जोंपर्यंत आपल्या डोळ्यात बिंबलें नाहीं, तोंपर्यंत सौंदर्याच्या कसोटीवर विश्वसून चालणार नाहीं. अपूर्ण अवस्थेंत सौंदर्याची कसोटी फसवी आहे. म्हणून साधकानें एक तर (१) सत्य आणि सौंदर्य ह्याचें द्वैत स्वीकारून जें सत्य असेल तें च स्वीकारावयाचें, मग तें सुंदर नसलें तरी चालेल, असा नियम करावा, अथवा अद्वैत मानावयाचें तर (२) जें सत्य असेल तें सुंदर असावयाचें च, मग तें सुंदर न का दिसेना, असें अद्वैत मानावें; "सुंदर तें च सत्य" असें अद्वैत मानूं नये. "रुचकर तें च हितकर" हें शुद्ध जिभेचें अद्वैती सूत्र. अशुद्ध जिभेचें द्वैती सूत्र-"रुचकर निराळें, हितकर निराळें; पण रुचकरापेक्षा हितकर श्रेष्ठ." अशुद्ध जिभेचें हि अद्वैती सूत्र आहे. पण तें शुद्ध जिभेच्या अद्वैती सूत्राच्या उलट, म्हणजे—"हितकर तें च रुचकर" असें आहे. हा विवेक रविबाबूंच्या खुलाशावरून साधकानें शिकावयाचा आहे. रविबाबू सौंदर्योपासक असले तरी साधकाचा विवेक त्यांनीं सोडलेला नाहीं.

[महाराष्ट्र-धर्म, ता. १९-७-२६.]

## ६ नदी ईश्वराची वाहती करुणा

नदीकांठच्या लोकांत एकप्रकारची उदारता व प्रेमळपणा दिसून येतो. नदीच्या रूपानें ईश्वराची करुणा वाहत असते. नदीच्या कांठच्या लोकांना ह्या करुणेंत बुडी मारावयास सांपडते. नदीचें पाणी पितांना त्या पाण्याबरोबर ईश्वराची प्रेमळ करुणा प्यावयास सांपडते. त्यामुळें अंतःकरणें उदार बनतात. जी नदी माझ्या गांवाला मिळाली आहे, ती वरच्या गांवानें माझ्याकडे पाठविली आहे, आणि मला हि ती च परंपरा पुढें चालवून तिला खालच्या गांवाकडे पोंचती केली पाहिजे, अशी कृतज्ञ परोपकार-बुद्धि नदीकांठच्या लोकांना उपजत च असते. नदीकांठच्या लोकांत नदीविषयीं सात्त्विक अभिमान असतो. जसा माझ्या देशाचा अभिमान, तसा माझ्या नदीचा अभिमान. पण देशाचा अभिमान स्थावर किंवा सांचलेला असल्यानें आकुंचितपणा उत्पन्न करूं शकतो. नदीचा अभिमान जंगम किंवा वाहता असतो. त्यामुळें त्याच्या योगानें अंतःकरण व्यापक बनतें. महाराष्ट्रांतील कृष्णाकांठच्या किंवा गोदाकांठच्या लोकांत दिलदार उदारपणाची वृत्ति दिसून येते. कारण त्यांच्या प्रान्तांतल्या नद्या पर-प्रान्तांत गेल्या आहेत. तसें च गुजराथेंतल्या नर्मदाकांठच्या किंवा तापीकांठच्या लोकांत प्रेमळ कृतज्ञता-बुद्धि दिसून येते. कारण पर-प्रांतांतल्या नद्या त्यांना मिळाल्या आहेत. कृतज्ञतापूर्वक सेवा स्वीकारावी आणि उदारपणानें सेवा करावी असा नदीकांठच्या लोकांचा देह-स्वभाव असतो.

[ रोहणीची यात्रा, महाराष्ट्र-धर्म ता. २६-११-१९२४. संक्षेप करून ]

## ७ निर्भयतेचे तीन प्रकार

निर्भयता तीन प्रकारची आहे, वाकबगार निर्भयता, ईश्वरनिष्ठ निर्भयता, विवेकी निर्भयता. "वाकबगार" म्हणजे निरनिराळ्या प्रकारच्या भयाशीं परिचय करून त्यावर उपाय शिकणें ह्या मार्गानें जी निर्भयता येते ती. ही जितकी लाभण्याची शक्यता असेल तितकी कमावून घ्यावयाची असते. ज्याला सापाची ओळख झाली, निर्विष सविष ह्याची पारख झाली, साप पकडण्याची कला साधली, चावल्यानंतर करण्याचे इलाज कळले, साप कसा चुकवावा हें साधलें, त्याला सापाच्यापुरती बरीचशी निर्भयता येईल. ही अर्थात् सापाच्यापुरती राहील. प्रत्येकाला ती लाभण्याची शक्यता नसेल. पण ज्याला सापांत वावरण्याचा प्रसंग आहे त्यानें शक्य तर ती प्राप्त करून घ्यावी हें व्यावहारिक उपयोगाचें आहे. तसें च तें आध्यात्मिक उपयोगाचें हि आहे. कारण त्यामुळे येणारे धाडस माणसाच्या हातून अस्वाभाविक वर्तन होऊं देत नाहीं. पण ही निर्भयता मर्यादित आहे.

दुसरी "ईश्वरनिष्ठ". ही पूर्ण निर्भय करणारी आहे. पण दीर्घ प्रयत्न, पुरुषार्थ, भक्ति इत्यादि साधनें सतत आचरिल्याशिवाय ती लाभणार नाहीं. जेव्हां लाभेल तेव्हां दुसऱ्या कशाच्या हि मदतीची अपेक्षा राहणार नाहीं.

ह्या शिवाय तिसरी "विवेकी" निर्भयता आहे ती मनुष्याला भलतें च अनवश्यक साहस करूं देत नाहीं. आणि इतक्या उपर भय निर्माण

झालें च तर विवेकानें बुद्धि शांत राखण्याला शिकवितें. ही विवेकी निर्भयता, साधकानें आपल्या अंगीं बाणवून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ही कोणाला हि साधण्यासारखी आहे. समजा मी वाघाच्या हातांत सांपडण्याच्या बेतांत आहें. संभव आहे कीं माझें मरण आतां च लिहिलेलें नसेल, असेल च तर तें टळणार नाहीं. पण मी जर भयभीत न होतां बुद्धि शांत राखण्याचा प्रयत्न केला तर कांहीं तरी बचावाचा मार्ग निघण्याचा संभव आहे. किंवा तसा मार्ग न निघाला तरी, बुद्धि सावध राखता आल्यास, कदाचित् शेवटचे हरि-स्मरण साधता येईल. तसें झालें तर तो परम लाभ ठरेल. अशा प्रकारें ही दोन्ही बाजूंनीं लाभांत राहणारी विवेकी निर्भयता सर्वांच्या प्रयत्नाचा विषय असली पाहिजे.

[ उतारा नूतनाक्षत, ग्राम-सेवा-वृत्त, आक्टोबर १९४० ]

## ८ स्वातंत्र्याचा गुलाम

पाश्चात्य नीति-शास्त्रांत एक गमतीचा प्रश्न काढला आहे : " पूर्ण नीतिमान् पुरुषाला अनीतीनें वागण्याची शक्यता आहे कीं नाहीं ? " एका पक्षाचें म्हणणें,— " नाहीं. कारण, अनीतीची शक्यता आहे तो 'पूर्ण' नीतिमान् कसला ? जें 'शुद्ध' सोनें म्हटलें त्यांत भेसळ कुठली ?" दुसऱ्या पक्षाचें म्हणणें— " असली पाहिजे. जर 'पूर्ण'. पुरुषाला अनीतीची शक्यता च नसेल तर पूर्ण पुरुष म्हणजे एक नीतीचें 'यन्त्र' च झालें. जो ' नीतिमत्तेचा गुलाम ' बनला तो पूर्ण कसला आणि नीतिमान् तरी कसला ?" शंकराचार्यांनीं ईश्वराला 'सर्वज्ञ' म्हटलें; त्यावर आक्षेपकानें ह्या च वादाचा पेंच उभा केला आहे. तो म्हणतो— " सर्वज्ञ म्हणजे सर्व जाणणारा. ईश्वर ' सर्व जाणण्याचें ' काम कधीं करतो कधीं करत नाहीं असें म्हणावें तर जेव्हां तो हें काम करीत नसेल तेव्हां तो 'सर्वज्ञ' असणार नाहीं. बरें तो हें जबाबदारीचें काम नेहमीं च करतो असें म्हणावें तर तो ' ज्ञानाचा गुलाम ' झाला ! " कर्मयोगी कर्मयोगाचा गुलाम, नीतिमान् पुरुष नीतिमत्तेचा गुलाम, सर्वज्ञ परमेश्वर ज्ञानाचा गुलाम, आणि हा कोण ? "हा स्वातंत्र्याचा गुलाम."

[ महाराष्ट्र-धर्म, ता. ६ आगस्ट १९२४. ]

## ९ मुहूर्तं ज्वलितं श्रेयः

विठोबा पवनारचा, बिनशिकलेला, १७-१८ वर्षांचा एक मजूर. पण शुद्ध चित्ताच्या बळावर अनेक सज्जनांचें मन त्यानें ओढून घेतलें होतें. त्याच्या शेवटच्या आजारांत ज्यांनीं त्याची सेवा केली त्यांना त्या सेवेचा भार वाटला नाहीं, पण उपकार वाटला.

वर्ड्स्वर्थ कवि पुष्कळ वेळा आपल्या गांवाजवळच्या एका टेकडीवर फिरायला जात असे. त्या टेकडीवरचे दगड पाथरवट लोक निवडून निवडून आपल्या कामासाठीं घेऊन जात असत. मेल्यानंतर आपलें स्वतःचें स्मारक कसें केलें जावें ह्यासंबंधीं लिहितांना वर्ड्स्वर्थ म्हणतो, "त्या टेकडीवर एक दगड असा आहे कीं ज्याचें कोणा पाथरवटाला अजून आकर्षण वाटलें नाहीं. पण त्या च कारणामुळें मला त्याचें विशेष आकर्षण आहे. तो दगड माझ्या स्मारकाचा समजावा आणि "अनेकांपैकीं एक" इतकें च त्यावर लिहावें. वर्ड्स्वर्थची ही केवळ आकांक्षा होती. विठोबा प्रत्यक्ष च तसा होता.

विठोबाचें एका मुलाशीं वैर झालें. त्यांत विठोबाकडे विशेष दोष नव्हता. पण असें वैर असणें हा च एक मोठा दोष आहे, हें मीं त्याला समजावून सांगितलें आणि दोघांचे हात एकमेकांच्या हातांत दिले. तेव्हांपासून त्यानें वैरभाव विसरला आणि दोघे पूर्ण प्रेमानें वागूं लागले.

विठोबाच्या सद्भावाचीं अशीं अनेक स्मरणें माझ्यापाशीं आहेत. पण ती आतां विठोबांतून निघून आत्म-तत्त्वात लीन झालीं आहेत. मुळांत हि तीं तेथलीं च होती. ज्ञानदेवासारख्या थोरामोठ्यांनीं " माझें नाम रूप लोपो " अशी प्रार्थना केली आहे ती या च कारणासाठीं.

विठोबा रोज संध्याकाळीं काम आटोपल्यावर बहुधा मजकडे येत असे आणि माझ्या गोष्टी ऐकत बसे. एखाद्या संध्याकाळीं तो आला नाहीं तर आज का आला नसेल असें मला वाटे. हल्लीं हि तो माझ्याकडे येत असतो. पण पूर्वीप्रमाणें माझ्या गोष्टी ऐकण्याऐवजी मला तो आतां आपल्या गोष्टी सांगत असतो.

तो गेल्यापासून आज कितीक दिवस मी खालील वचन गुणगुणत आहे—

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपण चि देव होय गुरु
पढियें देहभाव, पुरवी वासना । अंतीं तो आपणापाशीं न्यावें

[ ग्राम-सेवा-वृत्त, ता. १५-८-१९३१ ]

## १० वृत्त लिहा

रामदासांचें वचन आहे–"दिसामाजि कांहींतरी तें लिहावें." आपण म्हणतों, "रोज थोडें तरी कांतावें." रोज लिहिण्यावर आपण भर दिला नाहीं. तसा देण्याची आज सर्वसामान्य आवश्यकता हि नाहीं. पण कार्यकर्त्यांचीं जीं पत्रें, अहवाल इत्यादि येत असतात त्यांतील मजकुराकडे पाहतां, रामदासांच्या त्या वचनाची उपयुक्तता लक्षांत येते. कार्यकर्ते म्हणतात, "लिहिण्यासारखें कांहीं नसतें." कार्यकर्त्यांपाशीं लिहिण्यासारखें कांहीं नसतें आणि अकर्त्यांच्या लिहिण्याचा कांहीं उपयोग नसतो. म्हणजे वाङ्मयाचा छेद च उडाला ! जर हें कार्यमयतेचें किंवा चिंतनमयतेचें चिह्न असतें तर त्यांत मला मुळीं च आपत्ति वाटली नसती. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. वस्तुस्थितीमध्यें तें चिंतनाच्या उणेपणाचें लक्षण दिसून येत आहे. विचार करण्याची हि एक संवय असते. संवईनें विचार वाढतो. रोजचें निरीक्षण, वृत्त, अनुभव रोज टांचून ठेवायचे असें म्हटलें म्हणजे स्मरणाची, चिंतनाची, अनुशीलनाची संवय लागते. लहान-मोठ्या प्रत्येक 'वृत्ता' मागें कांहीं तरी 'वृत्ति' असते. ती ओळखून वृत्ति-शोधन-पूर्वक सर्व लहान-मोठ्या वृत्तांचा संग्रह करावा. 'लहान' आणि 'मोठें' हा भेद च खोटा आहे. तसें च म्हटलें तर ह्या जगांत कधीं काय 'मोठें' घडत असतें ? विश्वाच्या गर्भांत मोठ्यांतलें मोठें वृत्त हि शून्य च आहे. पण आमच्या वृत्तीच्या विचारानें लहानांतलें लहान वृत्त हि महत्त्वाचें

असूं शकतें. हस्तेंद्रिय, वाचा आणि बुद्धि हे मनुष्यप्राण्यानें आपले विशेष मानले आहेत. तिहींचा एकमेकांवर परिणाम होत राहतो. तिहींचीं कार्यें उद्योग, जप आणि चिंतन आमच्या ठिकाणीं एकवटलीं पाहिजेत. तर आमची सर्व बाजूंनीं वेगानें प्रगति होईल. मला जें कार्यकर्त्यांकडून लेखन हवें आहे त्याला माझ्या दृष्टीनें जपाचें स्वरूप आहे.

['आश्रम-समाचार' १९३६ मधून पुनर्मुद्रित, ग्रा. से. वृ. नव्हेंबर १९४०]